# मराठ्यांच्या इतिहासाचीं साधनें.

## खंड १२ वा.

श्री.

### लेखांक १.

१६९२ माघ शुद्ध १२.

चिरंजीव राजमान्य राजश्री नारायणराव बल्लाळ यांसीः-

माधवराव बल्लाळ प्रधान आशीर्वाद. उपरी येथील कुशल जाणून स्वकीय लिहिणें. विशेष. बिचूमिया वगैरे कारवान हैदर नाईक याजकडे घोडीं वगैरे बैल मिळोन अडतीस सुमारीं घेऊन जात होते. त्यास, ता। सावनूर येथें तुह्मांस आढळलें तें जप्त करून सरकारांत हुजूर रवाना केलेंत. त्यास, ई॥ छ ६ रजब ता। छ २६ रमजान-पावेतों गु॥ नरसो बल्लाळ कारकून तालुके धारवाड चंदी वगैरेबरोबर खर्च जाला तो ता। कारवान मा। यांजकडे रुपये ४९५। च्यारशें सवा पंच्याण्णव रुपये खर्च लेहून देविले असत. तरी कारवान मजकूर याज-पासून सदरहू ऐवज हुजूर घेतला जाईल. तुह्मीं तालुके मारीं कारवान याचे तसल-मातीस खर्च लिहिणें. तुह्मांस मजुरा पड-तील. जाणिजे. छ २९ रमजान, सु॥ ईहिदे सबैन मया व अलफ. बहुत काय लिहिणें ? हे आशीर्वाद.

पौ छ ११ सवाल,
मंगळवार,
सु॥ ईहिदे सबैन,
माघ शु॥ १२,
दोन प्रहर दिवस.

---

श्रीवरद.

### लेखांक २.

१७०२ वैशाख शु॥ २.

सेवेसी विनंति. राजश्री बाळाजी गोविंद व गंगाधर गोविंद यासी लिहितां व कार-कुनाचे मुशारे देतां थकलों. परंतु पत्रोत्तर सहा सहा महिने न पाठवीत. मग बाकीचे रुा। वसुलीजमेचे गांव लाऊन देणें कळ-तच आहे ! कदाचित् पत्रोत्तर आलें तर आपला बोढा लिहून उमेदवारी लिहितात. याचा विस्तार पूर्वीं वरचेवर सो। विनंति लिहिली व उत्तरें त्यास ताकीदपत्रासहित आलीं ते त्यांजकडे पाठविलीं. उत्तरें येतील ते सो। पाठऊं, तूर्त सेवकास हजूर पात-शाहीची ठिमा घेऊन यावयाची त्वरा व वर्षाकाळ समीप आलियामुळें फैसात होईल. बहुत दिवस दर्शनलाभ न जाला, या उत्कंठेंत अत्यंत चिंताग्रस्तता. दुसरें, स्वा-मीस शत्रूचें पारपत्य करावयाचें अहिर्निसीं उद्देगाकरितां चित्त उद्विग्न. यांत सेवकानें आपली अवस्था लिहिणें परम संकट जाणून, विनंति लिहिली कीं, बुंदेल्याचे मातबर तेथें असतील त्याजपासून कर्ज रुपये दहा हजार स्वामीनीं घेऊन पाठवावे. तरच जी-वनोपाय होऊन दर्शनलाभ घडेल व स्वामींचा शब्द लागणार नाहीं व उर्जित होईल तो सुदिन करणार स्वामी समर्थ आहेत. कृपा केली पाहिजे. हजूर येणें व तेथें रहाणें खर्चाचे तंगीमुळें दुस्तर जालें. याकरितां दर पत्रीं विनंति लि॥. यांचा

अपराध क्षमा केला पाहिजे. केतकीचे फुलाचा अर्क एक सिसा सो। पावलें. प्रातःकालीं पूजनोत्तर अथवा जेव्हां सरबत घेणें मर्जीस येईल त्या समईं एक तोळाभर पाणियांत घालून घेतल्यास सुगंध येईल. घरीं तयार ब्राह्मणाकडून करऊन सेवेसीं रवाना केला असे. सुरक्षित पावल्याचें उत्तरीं कृतार्थ केलें पा. दर्शनलाभ घडेल ते सुघडी. हे विनंति.

---

श्रीवरद.

## लेखांक २.

पौ छ २५ रमजान

१७०२ ज्येष्ठ वद्य ३.

पुा श्रीमंत राजश्री पंत प्रधान स्वामींचे सेवेसीः—

विज्ञप्ति ऐसीजे:—पत्रीं आज्ञा कीः पातशहास अर्जी व नवाब नजबखान जुनफुकार द्दौलेबहादूर यांस सरकारांतून पत्रें यांचे तेंबीविशईं रवाना केलीं आहेत, द्दौलेबहादूर यांस राजश्री बाळाजी जनार्दन यांनीं विस्तारें लिहिलें आहे, हा मजकूर तुह्मांस समजावा सबब मसोदे पाठविले आहेत, त्याजवरून कळेल त्याप्रो बोलून इंग्रजांची मसलत लिहिल्याप्रो विच्कलित होऊन सरकारकाम अमलांत येईल तें करणें. सविस्तर बाळाजी जनार्दन लिहितील त्याजवरून कळेल. म्हणून पत्रीं आज्ञा. त्यास, स्वामींचे आज्ञेप्रो पादशहास वरचेवर उत्तेजन देऊन इंग्रजांचा यांचा स्नेह संपन्न होता तो तोडिला. सेवकासी पातशहांनीं व नबाब नजबखानांनीं शफत वाहून सांगितलें कीं जें नानांनीं लिहिलें आहे हेंच आमचे चित्तांत आहे. त्याप्रोच करूं, अमोन वचन दिधलें. परंतु सरकारांतील चार हजार फौजेनिसीं पातशहाचे तैनातीस राहणें आहे, त्याचा आमचा जोड आहे, आपले सरकारची फौज दोन हजार सेवकापासीं असिल्यास पातशहाचे मनास आल्हाद होईल, अतःपर पुढें श्रीमंतांस लेहून आपले सरकारची फौज हुकुमांत राहीसी जलदीनें हजुरांत येते करणें, ह्मणून सो। लिहावयासी सांगितलें तें लिहिलें असे. व आपला मातबर माणूस सेवकाचे समागमें देऊन सो। रवाना करितों ह्मणतात. अमलांत येईल तें मागाहून विनंति लिहूं. त्याची जागा या स्थलीं सरकारची फौज असिल्यास यांजवर दाब राहून शत्रूचे पारपत्याची तजवीज वरचेवर होईल तें सेवक करितील. प्रथम पातशहापासीं खर्चाची तंगी. त्यांत एक उमराव त्याजला दुसरियाचें बल नाहीं. त्यांत मोगल लोक काबूची. यास्तव सेवेसी विनंति लिहिली आहे. तर सलाह असालियासी एक दोन पथकें धोंडो दत्तात्रेय व पवार तरी सेवकाचे तैनातीस पा कीं, सरकारचे फौजांची आमदनी करून, याजला नवा प्रांत घेऊन खर्चाची तंगी दूर करावयाची उमेद दाखऊन, कंबर बांधऊन, डौल दाखल करऊन, होईल ते चाकरी करूं. इंग्रज तूर्त खर्चास रु॥ देऊं ह्मणतात. अह्मीं फारसी गोष्ट फौजेविना सांगून, नफे भारी दाखऊन, स्वामीचे आज्ञेप्रो आजवर इंग्रजाचा रुपया पातशहास घेऊं दिधला नाहीं व वचनींही गुंतूं देत नाहीं. पातशाह रुपया का मागत नाहींत, फौज आणा ह्मणतात. यास्तव सेवेसीं लिहिलें असे. गोहदप्रांतीं पथकें आहेत त्यांप्रो एखाद दोन पथकें सेवकापासीं राहिल्यास सरकार उपयोगी आहे. अंत होय. उत्तम असेल तें करणार स्वामी समर्थ आहेत. कृपा केली पाहिजे. हे विज्ञप्ति.

---

श्रीवरद.

## लेखांक ४.

१७०२ ज्येष्ठ वद्य ३.

पौ छ २५ रमजान.

श्रीमंत राजश्री नाना स्वामीचे सेवेसीः—

पो पुरुषोत्तम महादेव कृतानेक सा। नमस्कार विनंति येथील कुशल ता। छा। १६ माहे जमादिलावर मुक्काम दिल्ली जाणून स्वकीय लेखन करीत असिलें पाहिजे. विशेष. छ २६ रविलावरचीं पत्रें पाठविलीं ते छ २३ जमादिलावलीं पावलीं. पत्रीं आज्ञा कीं:—अलीकडे तुह्मांकडून पत्र येऊन वर्तमान कळत नाहीं. त्यास, सविस्तर वरचेवर लिहीत असावें. सरकारांतून पातशहास अर्जी व नबाब नजबखानास पत्रें व आह्मांकडून खानमजकुरास पत्रें पाठविलीं आहेत तीं त्यांस देऊन लिहिल्यापमाणें सर्व गोष्टी घडून येत तें करावें. फारसी पत्रांतील मजकूर तुह्मांस कळावे याकरितां मसुदे पाठविले आहेत त्यावरून कळेल. कितेक मा। अलाहिदा पु।—पत्रीं लि। आहे त्याप्रो अमलांत आणणें,ह्मणोन लि।. त्यास, पैदरपै विनंतिपत्र सु। पाठवितों, त्याचीं उत्तरेंही सेवकास येतात. व आज्ञेप्रो पत्रें आपलीं व सरकारचीं पातशहास व नजबखानास देऊन त्यांस इंग्रजाचे शासन करावेंसें वारंवार बोध करून ठेविला आहे. त्याचा त॥ सरकारांत विनंतिपत्रें लि। आहेत त्याजवरून ध्यानास येईल. सेवकाचेनें यथाज्ञानेंकरून जे चाकरी घडून येईल तीस अंतर करणार नाहीं. परंतु लोकांचें येथील देणें वारून स्वामिदर्शन घडे तें करणार आपण आहेत. खर्चाची आबाळ विशेष. यास्तव विनंति मान्य करणार स्वामी समर्थ आहेत. सविस्तर पुर्वणीपत्रावरून श्रुत होईल. नजबखानानीं स्वामीस पत्र बहुत स्नेहवृद्धीनें सरकार—उपयोगी लि। आहे. याचे उत्तरीं विशेष लोभानें व पातशहास इंग्रजाचे मोहिमेस घेऊन निघता ह्मणोन सेवकानें तुमचे जबानीं लि। त्यावरून बहुत संतोष जालियाचें त्याहावयासी आज्ञा करावी. कृपा केली पाहिजे. दर्शनलाभ होय तो सुदिन. हे विनंति.

---

श्रीवरद.

## लेखांक ५.

१७०२ ज्येष्ठ वद्य ३.

पौ छ २५ रमजान.

विनंति कीं:—स्वामीचे आज्ञापत्राप्रमाणें नजबखानासहित पातशहा यांमीं इंग्रजांचे पारपत्याची तहबीर करावयाची शफत घेतली. व श्रीमंत स्वामींनीं सामील व्हावयासी निजाम अलीखानास त्यांचे वकिलाकडोन नजबखानानीं लिहिलें. त्याचीं पत्रें स्वामींस व श्रीमंतांस घेऊन पाठविलीं आहेत. त्याजवरून पातशहाचा शुका पाऊन वृत्तांत श्रुत होईल. तात्पर्य, अंतःकर्णांतून इंग्रजाची नड पातशाहींतून काढावी व सरकारचे फौजेस सामील व्हावें. परंतु कदाचित आपण तिकडे सलूख केला तर इकडे इंग्रज यांसी समीप आहेत, हे त्यांचें पारपत्य करितीलसें दिसत नाहीं, पेंचांत येऊं, यांत शंकित. तेच सेवकांनीं खातरजमा केली. फिरोन सेवेसीं विनंति लि. त्यासी बहुत ममतेनें नजबखानास सांगितले. ते श्रीमंत स्वामींचे सेवेसी विनंति लिहिली आहे. त्याजवरून श्रुत होईल. मुख्याचे मनांतील भाव, इंग्रजासीं आपण सलुख न करावा, ते जेर जालियावर यांनीं त्यांचे प्रांतासी खलष करावयाचे समई सरकारचा एक सरदार मातबर फौजेचा, निःकपट, पातशहापासीं असल्यास नजबखान चाकरी करील, यांत संदेह नाहीं. इंग्रजाची ताबे-

लिहिलें आहे. मसवद्यावरून कळेल त्या-अन्वयें बोलून, लिहिल्याप्रो अमलांत यावें. सरकारकाम करून दाखवावयाचा समय आहे. तुह्मी कराल, हे खातरजमा; तथापि सूचना लिहिली आहे. इंग्रजाचें पारपत्य होऊन, नक्षा मोठा व्हावा, ऐसा समय आहे. असें पुढें करूं गेलियास होणार नाहीं. ईश्वरें ज्यांस मोठेपण दिल्हें त्याणीं मोठें कार्य केलियास नक्षा व कितेक दिवस कीर्ति राहावी, ऐसेंच करावें हें उत्तम. या गोष्टीस गई गुजरल्यास टोपीवाले कांहीं दिवसांत पातशहात घेतील. मग पश्चात्ताप होऊन फळ नाहीं. असें आहे म्हणून पत्रीं आज्ञा. त्याजवरून आज्ञेप्रो पातशहास व नबाब नजबखानास सविस्तर अक्षरशाए मा एक दोनदां समजाऊन, यथामतीनें दूरअंदेसीचे प्रकार खचित करून, इंग्रजाचे रुपयावर नजर न देतां त्यासीं विवाद करावा हे गोष्ट शपतपूर्वक ठराऊन, डेरे-बाहीर करावें हा निश्चय केला आहे. फरा-सखाना व तोफखाना वगैरे स्वारीच्या तयारीस पातशहानीं आज्ञा केली. डेरे-दाखल होतील तेसमई सेवेसी लिहूं. कृपा केली पाहिजे. हे विज्ञाप्ति.

---

श्रीवरद.

## लेखांक ७.

१७०२ भाद्रपद वद्य १४.

पौ. छ २२ सवाल इहिदे समानीन, मा। अजूरदार.

श्रीमंत राजश्री पंत प्रधान स्वामीचे सेवेसीः—

विनंति सेवक पुरुषोत्तम महादेव कृतानेक सां। नमस्कार विज्ञापना येथील कुशल ता। छ. २७ माहे रमजान मुक्काम दिल्ली स्वामीचे कृपावलोकनेंकरून यथास्थित असे. विज्ञा. सरकारचें आज्ञापत्र छ १७ जमादिलाखरचें आलें तें छ १६ रजबीं पावलें. पत्रीं आज्ञा कीं इंग्रज फार बदमामली आहेत. प्रथम गरीबीनें गोष्ट बोलून आपला कबजा करावा हे चाल त्यांची आहे. मागें चिनापट्टण व चंदीचंदावर वगैरे मुलूक त्यांणीं हस्तगत केला. व बंगाल पातशाही मुलूक घेऊन असफद्दौला यासीं कोणें प्रकारें सलूख राहिला, हें सर्व पातशहाचे ध्यानांत असेलच. या गोष्टी सर्व मनन करून, दक्षणचे सर्व रयासतदार एकविचारें होऊन, जागोजागा टोपीकरांस ताण बसविल्या. शिक्षा चांगलीच होईल. याप्रो तुह्मीं मिर्जा नजफखानबहादुर यासीं बोलून पातशहास विनंति करून, टोपीकरांचे पारपत्याचा निश्चय करावा. पातशहानीं खेमेदाखल व्हावें. व नजफखानानीं शीख वगैरे सर्व जमाव करून इंग्रजास तंबी करावी. समय हाच आहे. असफद्दौलाची दौलत हस्तगत जालिया नफे फार आहेत. सरकारतर्फेनें गोहद प्रांतीं इंग्रजाचे तंबीस पंचवीस हजार फौज आहे व आणखी मातबर सरदार फौजसुद्धां रवाना करावयाची तरतुदींत आहे. जलदीनेंच येऊन पावतील. व नजफखानासारिखे दूर-अंदेश व मुखत्यार व नबाब निजामअली सारिखे व आह्मांसारिखे फिदवी एकनिष्ठ हुजूरचे एकविचारें असल्यास फिरंगी यांनीं काय करणें आहे? राजेरजवाडे व निजामअलीखान व भोसले यांस फरमान पाठवावे. व उभयतां सरदार गुजराथ प्रांतीं पन्नास साठ हजार फौजेनिशीं व तोफखाना जंगी सरंजामसुद्धां इंग्रजांचे पारपत्यास जाऊन, त्यांनीं रसदबंद करावी. त्यांचे लष्करांत धान्य महाग आहे. इंग्रज मोठे संकटांत येऊन पडले आहेत. ह्या दिवसीं सरदार निकट

करतील त्या दिवशीं इंग्रज जीवें वांचून जाणें कठिण पडेलसें आहे. व नवाब—निजामअलीखान—बहादूर यांणीं सिकाकोळ राजबंद्राकडे आपला पुत्र फौजसुद्धां रवाना केला आहे. व रा॥ रघोजी भोंसले सेनासाहेब सुभा यांणीं आपले बंधु रा॥ खंडोजी भोंसले सेनासुभा यांस बंगालियांत रवाना केलें. व हैदरखान चेनापट्टणाकडे जाणियास डेरेदाखल जाले. फौज पुढें रवाना केली. याप्रो॥ चहूंकडून इंग्रजास ताण बसून, पेंचांत येत, या गोष्टीनें बहुत नफे आहेत, म्हणून पातशहांस व नजबखानांस समजाऊन अमलांत ये तें करणें. म्हणून विस्तारें पत्रीं आज्ञा. त्यास, विस्तारवत् आज्ञेप्रो॥ व यथामतीनें समर्पक सुचलें तें पातशहांस व नजबखानांस श्रुत केलें. बहुत संतोषी होऊन बोलिले कीं, आमचे मनोदयानरूपच श्रीमंताचाही इरादा आहे. परंतु तूर्त तथातथ करून इंग्रज सुरतेस गेले व सरदार उजनीस इंदुरास आले. व गोहदेकडील सरदार आपलाले ठिकाणीं गेले. आह्मीं आपली फौज पाठवावी तर वर्षाकाळ, नदीनाले चहडले आहेत. या दिवसांत फौज व तोफखाना कैसा जातो ? यास्तव वर्षाकाळानंतर श्रीमंतांचे सरकारची फौज आल्यास आह्मीही फौज रवाना करितों. आमचा व सरदारांचा इमानप्रमाण करून देणें कीं, पुढें अन्तर न पडे. व इंग्रजासीं आह्मीं इकडे बिघाड केलियावर तुम्हांकडील आश्रा पक्का न राहिला तर आम्ही एकले पडून त्यांचे काबूंत सांपडूं, तें न करावें. तेव्हां आह्मीं पुरती खातरजमा केली व आपली कैसी खातरजमा होईल हें पुसिलें. तेव्हां बोलिले कीं, त्यांचा आमचा कौलकरार जाहला ह्मणजे खातरजमाच आहे. याप्रमाणें बोलणें जाहलें आहे. हालीं इंग्रजांची मोहीम अपुरी सोडून सरदार उज्जनी इंदुरास आले. यास्तव यांस संवशय—वाढ होऊन पातशहाकडून कमर नामें खोजा व नजबखानानें आपलेकडील इसमास नामें खोजा वजिरास नालकी व इंग्रजास वस्त्रें, जवाहीर व पत्रें व आसफदौलाचे मातुश्रीस व आजीस वस्त्रें देऊन अयोध्येस रवाना केलें. तेसमईं आम्हीं पृछा केली कीं, हा सिष्टाच्यार करावयाचें कारण काय ? तेव्हां बोलिले कीं, वजिराची आबरू वाढावी आणि इंग्रजांनीं वजिरास ग्रासिलें आहे तें तूर्त आमचे खातीर—दास्त केवळ ग्रासून चुकणार नाहींत तोंवर सरकारची फौज या प्रांतीं आलियावर त्यांचे आमचे विच्यारें जें करणें तें करूं, एविशीं तुम्हीं आपले चित्तांत संदेह न मानावा. याप्रमाणें आमची खातरजमा केली व पूर्वीं पातशहानीं डेरेदाखल व्हावें व अंतर्वेदींत उतरावें हें ठरलें होतें. याचें कारण हेंच कीं, सरदारांनीं इंग्रजास सुरत प्रांतीं सरकारचे फौजेनें घेरलें होतें या प्रतापावर हे बहुत उछाहयुक्त होते. आतां सरदार फौज घरोघर गेले व एक दोन स्थळीं फौज इंग्रजांनीं मोडली व या प्रांतीं गोहदेकडील फौजेवर शहखून पडला. सरदार वीस हजार फौज असतां आपसांत फुटून गेले. अंबाजी इंगळे यांनीं ग्वाल्हेरसारखा किल्ला गमाविला. इंग्रजांनीं घेतला. आपले फौजेचें बळ नाहींसें जाणून हे शशांकित होऊन बाहीर निघणें राहिलें. वर्षाकाळानंतर सरदार मातबर फौजेनें आलियावर त्यांचे आमचे सला हें जें उत्तम असेल तें करूं, ह्मणतात. जें वर्तमान आह्मांस कळत नाहीं तें बातनी पुणियाहून कुवरसेन नामें कोणी आहे तो. तेथून दिल्लीस नजबखानास वगैरे चहूंकडे

बातनी लिहितो. व उज्जनची हीं बातनी कच्ची पक्की वरचेवर अनुपगीर गोसाव्याकडे येते. तो यांस श्रुत करितो. तें वर्तमान आह्मांस नजबखानानीं सांगितलें. तेव्हां आमचे कर्ण सिथळ जाहले. परस्परें पातशहांस व नजबखानांस याप्रमाणें बातमी येते ते वेळेस हे ह्मणतात कीं, हे आपले सरकारच्या गोष्टी उजमाच्या सांगतात. परंतु तेथील लिहिणार लिहितात ह्या गोष्टी सत्य आहेत. याप्रमाणें इकडील जालेलें वृत्त श्रवण व्हावें ह्मणून विनंति लिहिली असे. व सेवटीं आह्मी यांसी बोलिलों कीं, इंग्रजाची नड कायम ठेवलियास आमचे सरकारचें नुकसान नाहीं, परंतु पातशाहीस ठीक नाहीं. तेव्हां बोलिले कीं, श्रीमंतही त्यांचे पारपत्यास सिद्ध होत आहेत व आम्हांस तेंच आपले मकदुराप्रमाणें कर्णें प्राप्तच आहे. वर्षाकाळानंतर श्रीकृपेनें सरकारचे फौजेसहित सरदार आलियास त्यांचेच विच्यारें जें कर्णें तें करूं. याप्रमाणें यांसी पक्कें केलें आहे. पुढें इंग्रजांची यांची तुटातूट होऊन, त्यांचे प्रांतावर मोहीम करीत, तें करावयासी सरदारांस सेवकानें लिहिलें व पातशहा नजबखानाकडूनही लिहिलें व वचनीं गोविलें आहे. इंग्रजास चहूंकडून ताण बसल्यास जेर होतील. यास्तव एक सरदार मातबर एप्रांतीं पाठविणार स्वामी समर्थ आहेत. कृपा केली पाहिजे. हे विज्ञाप्ति.

---

श्रीवरद.

### लेखांक ८.

१७०२ भाद्रपद वद्य ३०.

पुरवणी श्रीमंत राजश्री पंतप्रधान स्वामीचे सेवेसीः—

विज्ञापना ऐसीजेः—ग्वालेरचे किल्यास्तव नजबखान बहुत कष्टी जाले व म्हणाले कीं, आमचे स्वाधीन करता तरी किल्ला तुमचा कायम राखिला जाता. आतां तेथें कोठी करून गोहद व झांसी उज्जनपावेतों प्रांत घेतील. बैजापूरकर रजपुतांनीं इंग्रजांकडून पैगाम केला आहे कीं, एक कंपू जैपुरास पाठवा, आह्मी पुढें प्रांत देऊं. टोंक वगैरे ठाणीं रजपुतांनीं सरदारांचीं घेतलीं. आमचें नांव केलें. शेवटीं आह्मांकडील महमुद अलीखान याणें ताकीद करून रजपुतांकडून ठाणीं सोडविलीं असतां ...?............ ... ठाणीं सोडून गेले. जागा खालीं पडल्या आहेत ह्मणून नजबखानानीं मजकूर हाही सांगितला कीं, हैदरनाईकाची फौज कांहीं इंग्रजाचे जिल्यास गेली होती, त्याची शिकस्त जाली, यास्तव आणिक फौजेस पाठविणार, भोंसले कटकाकडे गेले आहेत, परंतु कांहीं त्याजला जरब पोंहचली नाहीं, पुढें काय करतील व बातमी येईल ते सेवेसी विनंति लेहूं. याप्रमाणें उत्तर विनंति लिहावयास सांगितलें. श्रुत होय. कृपा केली पाहिजे. हे विज्ञाप्ति.

---

श्रीवरद.

### लेखांक ९.

१७०२ आश्विन वद्य ९.

पुा श्रीमंत राजश्री पंतप्रधान स्वामीचे सेवेसीः—

विज्ञापना ऐसीजेः—छ १९ सावानी इंग्रजाकडील वकील फाजलअलीखान नामें कांहीं जाबसाल घेऊन आला आहे. तात्पर्य हेंच कीं, आमचे कोठीस दिलीस आगरियास जागा यावी व खर्चास दोन लक्ष रुा दरमहा घेत जावें. पूर्वील बंगालियाचें वर्षासनाचे बाकीचे शनैःशनै देऊं व कोठीस जागा मागी. याचे नजरेस ठरावयासी वकील खानमा आला आहे.

पुढें जो अंतस्थ ठरेल तो शोध घेऊन सेवे पाठवितों. मुख्य गोष्ट पूर्वीपासून इंग्रज जागा कोठीस जैपूर दिल्ली आगरे वगैरे स्थलीं इछितात. आतां ग्वाल्हेर त्यांचे हातास गेली. याकरितां इंग्रज सर्वां स्थलीं अंमल जाहालासें जाणतात. श्रीइच्छा प्रमाण! यास्तव फौज या प्रांतीं जलदीनें आल्यास प्रिथ्वीपतीस खातरजमा होऊन इंग्रजासीं बिघाड करीत. हें स्थल सरकारचे व पातशाहाचे काबूंत राहतें, श्री स्वामीचे प्रतापें करो (न). कृपा केली पाहिजे. हे विज्ञप्ती.

---

श्रीगणराज.

## लेखांक १०.

१७०२ कार्तिक शु॥ १३

पौ छ १९ जिल्काद.

श्रीमंत राजश्री नाना स्वामीचे सेवेसीः—

पो देवराव माहादेव कृतानेक सां नमस्कार विनंति येथील कुशल ता छ १२ जिल्काद स्वामीचे कृपेकरून यथास्थित असो. विशेष. कृपा करून पत्र छ १९ रमजानचें पाठविलें तें पावोन परम संतोष जाला. पत्रीं आज्ञा कीं, सरकारचा जाबसाल होणें यास्तव राजश्री पाटीलबावाचा निरोप घेऊन पुण्यास येणें, ह्मणून पेशजी तुम्हांस लिहिलें होतें. परंतु त्याचें उत्तर न आलें. त्यांस, तुह्मीं कोठें आहां? काय करतां,? वर्तमान काय,? तें सविस्तर लिहून पाठवावें, ह्मणून आज्ञा. त्यास, पुण्याहून स्वामीपासून आज्ञा घेऊन जांबगांवीं आलों, तेथून राजश्री पाटील—बावाची स्वारी गुजराथ प्रांतीं जावयाची आली, ते साकल्य विनंति लिहिली. त्याची उत्तरें आलीं. आज्ञा येण्याविसीं जाली. त्याजवरून यावें. परंतु पांच वर्षे यांचे संग्रहीं राहिलों. त्यांणीं सरकारचे सनदेप्रमाणें दरमाह व आपले तर्फेनें विशेष करून वरात संवस्थान कोटें येथें करून दिधली. त्यास, पांच वर्षे जाली. पैशास ठिकाण नाहीं. पदरचे सुखीं आह्मीं कोणे प्रकारें व काय अवस्थेनें दिवस काढितों. ते अवस्था स्वामीचरणापासीं लोपली नाहीं. चार दिवस येथें काळ—हरणार्थ आलों तों येथील नेमणूक दरमाहाचा दरमाहा द्यावीसी केली. त्यास पांच वर्षे समूळ ठिकाण नाहीं. तेव्हां येथें लोकांचें देणें पोटामुळें जालें. कुटुंबसहित येथें फसावा जाला. निघणें संकट यास्तव कोंहाइबारीपर्यंत समागमें आलों. वरातीची ताकीद होऊन कार्य होईल. नित्य विनंति केल्यास उत्तर हेंच कीं, देवितों. ज्यांचें देणें तेंही लस्करांतच. त्यांचा आग्रह वरातीस ठिकाण लाऊन आमचा निकाल पाडून जावें. तेव्हां निरोपाय होऊन वारी उतरणें प्राप्त जाली. वरातीचें उत्तर निस्तोष होत नाहीं. हेंही होईना. वकैड कोण्ही अनकूल होऊन, ममता धरून, हटकून कार्य करून निकाल पाडून द्यावा व साहुकाराचे संबंधानें च्यार गोष्टी बोलून करावें, तर अनुकूल होते ते देखील प्रतिकूल जाले. त्याचें कारण जालें तें जांबगांवाहून साकल्य विनंति सेवेसीं लिहिलीच होती. निरोपाय होऊन, गुजराथ प्रांत पाहून, संपूर्ण मुलुखगिरी, महर्घता, शरीरास समाधान नाहीं, हे सोसून मधें सोबत पाहून, हरएक ही प्रकारें च्यरणापासीं यावेंसें योजिलें. परंतु निर्फळ होऊन उज्जनपर्यंत येणें प्राप्त जालें. येथें ये तों दीड दोन महिने शरीरास पीडा प्राप्त प्राणांतिक झाली. स्वामीचे कृपें—करून

उलगडलों. संवस्थान कोटें येथील कमाविसदार येथें आले. नित्य ताकीदीनें हटाकितां, आज उद्यां करितां, आजपर्यंत झालें. शेषट प्रतिकूळ होते ते अनुकूळ करून घेण्यास, यांची मर्जी कायम करून देण्याविषई जाण्यास प्रयत्न करितां, सांप्रत जावसाल सोईस येऊन कमाविसदारास ताकीद मागील बाकी देण्याविषई व पुढें चालविण्याविषई जाली आहे. आतां कमाविसदाराकडून तजविजेनें साहुकारासीं गांठ घालून त्याची खातरजमा करून यावें, हें बाकी आहे, त्या उद्योगास लागलों आहें. स्वामीकडील सिफारस आणून कार्य करून घ्यावें, तर तेंही प्रकार येथें उपयोगी पडणार नाहीं. हें जाणून सेवेसी विनंति लिहिली. आपली एकाकीचें वारंवार वर्तमान लिहावें तर मर्जी दिक होईल कीं, वारंवार रड लिहितात. सेवकाचें लक्ष तों च्चरणापासीं, कीं कोणेही प्रकारें उलगडून यावें. आमचे भय—त्राता ईश्वरस्थानीं आपण. इह—लोकीं संवसार सर्व आज वीस वर्षें सेवकाचा स्वामिच्चरणाचे आधारावर. स्वामींनीं कृपा करून शरीर—संरक्षण व आब्रू—संवरक्षण केलें व करितात. दैवदृशा बलवत्तर आहे ! इतःपर मासपक्षांत सर्व कुटुंबसुद्धां देशास यावें, चिरंजीव आठा नवा वर्षांचा आहे, त्यास स्वामीचे शागीर्दीस म्हणून हातीं द्यावें, व्यार कामें असील त्याचा मार्ग स्वामीचे मर्जीस येईल तेसा करतील, अगत्यास श्रीइच्छा म्हणून स्वामीची आज्ञा घेऊन एकाकी श्री काशीयात्रा अथवा तीर्थवास करून जन्म सफळ करावा, हाच निजध्यास. एविषई विनंति समक्ष केलीच आहे. येणें करून * * * * * * स्वाधित स्वामिस्वरूपानें कृपेनें आजला होईल, हा निजध्यास अहर्निशीं लागला आहे. येथील उलगडा पाडावा, परंतु स्वामीचे कृपेनें सांप्रत कांहीं सोईस आला आहे. मासपक्षांत निकाल पाडून, स्वार होऊन, यांची स्वारी जलदीनें जाल्यास यांजसमागमेंच येतों. कदाचित् दिवसगती खाले असल्यास विनंति लिहिल्याप्रमाणें येथील गुंता उरकून येतों. साकल्य च्चरणदर्शनाअंतीं निवेदन करीन. पत्रीं लिहितां विस्तार आहे. तीर्थस्वरूप राजश्री पुरुषोत्तमपंतनानाकडील पत्रें व गुजरद कासद आला, त्याची रवानगी उदैक सेवेसी करितों. त्याजवरून साकल्य कळेल. त्यांचें संवरक्षण व आमचें करणार स्वामी समर्थ आहेत. इतःपर सत्वर येतों. येथें एक—एक घटका युगवत् जाते त्याचा विस्तार काय लिहा ? विशेष काय लिहिणें ? कृपा केली पाहिजे. हे विनंति. वेदमूर्त राजश्री गोविंदभट तात्या स्वामीस सा। नमस्कार विनंति. लिखितार्थ परिसोन कृपा करावी. येथून उलगडून निघावें व पत्राचें उत्तर पाठवावें, यास्तव उत्तर न लिहिलें. परंतु ग्रहदशा बलवंत. तरी आणखी मासपक्षाचा अवकाश पाहून उत्तर लिहिलें. अहर्णिशीं निजध्यास हाच आहे. हे अगर सत्वर कोणेही प्रकारें येतों. कळावें लोभ कीजे. हे विनंति.

---

श्रीवरद.

## लेखांक ११.

१७०३ ज्येष्ठ शुद्ध ६.

श्रीमंत राजश्री नाना स्वामीचे सेवेसीः—

पो। पुरुषोत्तम महादेव कृतानेक सां। नमस्कार विनंति येथील कुशल ता। छ ५ माहे जमादिलाखर मु। दिल्ली जाणून स्वानंद लिहिला पाहिजे. विशेष. छ १५ सा-

वलचीं पत्रें सरकारचे जोडीसमागमें पाठविलीं ते छ ५ माहे मजकुरीं पावलीं. त्यास,इकडील वर्तमान पैदरपै विनंतिपत्रें हजूर पाठविलीं ते पावून वृत्त श्रुत जालेंच असेल. हालीं वर्तमान तरीः पातशाहा व नजबखान दिल्लींतच आहेत. व राजश्री महादजी शिंदे शिपरीकोलारसेस आहेत. इंग्रजांचीं सा पलटणें ग्वालेरीचे व शिपरीचे दरमियान मुक्काम करून आहेत. इंग्रजांचे व यांचे लष्करांत महागाई आहे. पाटिलबावापाशीं इकडील रांगडी व देशची भारी फौज आहे. पुढें होईल ते विनंति लिहूं. वरकड वृत्त पुरवणीपत्रावरून श्रुत होईल. नबाब नजबखान यांनीं स्वामीस पत्र लिहिलें आहे व पातशाचा शुका सो।। पाठविला आहे त्यावरून वृत्त कळेल. उत्तरीं कृपा करून लिहावयास आज्ञा करावी कीं,लिहिलेप्रमाणें सत्वर अमलांत आणावें. म्हणजे लिहिल्याचें व सेवकाकडून वारंवार फौजेचा बोझ लिहिल्याचें सार्थक होईल. विशेष मर्जीस येईल तें ल्याहावें. सेवाश्रम केलियाचें सार्थक होईल तो ईश्वरकृपेनें सुदिन. विलायती आनारें या दिवसांत तेथवर गर्मीमुळें न पावतील, यास्तव रस काढून रुवा करून पा।। आहे. हे विनंति.

---

श्रीवरद.

## लेखांक १२.

१७०३ ज्येष्ठ शुद्ध ६.

पु।। श्रीमंत राजश्री नाना स्वामीचें सेवेसीः—

विनंति ऐसीजेः पातशहा व नजबखान दिल्लींत आहेत. याजकडील सरदार मिरजा सफीखा नामें कुंजपुऱ्याकडे पाठविले होते. त्यांणीं गणपतसिंग जाटाचा मामला सहा लक्षांचा करून, त्याप्रों तीन लक्ष रुो वसूल घेऊनें, त्याचे पुत्रास वोलीस ठेवून, त्यास पत्रें देऊन मार्गस्थ केलें. तीन लक्ष रुो राहिले ते किस्तीप्रों. येथील कलकत्याकडील बातमी आली कीं, मिस्तर इष्टीन यांस कांहीं नक्र होवून वेडा जाला. ++++++++++++ याप्रों लेखन लिहून वर्तमान आलें कीं, इंग्रजांनीं वजिरास सांगितलें जे आमच्यानें तुमचा मुलूक राखवत नाहीं, तुह्मी आपली फौज ठेवून मुलुकाचें संरक्षण करणें. त्याणीं उत्तर दिल्हें कीं, आमची फौज होती ते तुम्हीं खराब केली, आतां आह्मी नवी फौज ठेवावी तरी आम्हांपासीं पैका नाहीं. याप्रों उत्तर देऊन, स्वार होऊन, सिकारीस गेले व कारभारी यास आज्ञा केली कीं, फौज मिळेल ते ठेवणें. याप्रों वजिराकडील वृत्त आलें तें श्रुत व्हावयास लिो असे. इंग्रजाकडील जहाज कलकत्यास इष्टीनचे बदलीचा सरदार येत होता तें जहाज आंग्रे यांणीं मारिलें बुडविलें, हें वृत्त कलकत्तेकरानें श्रवण करून संतोषी जाले. पुढें येईल ते विनंति लिहूं. दर्शनलाभ होय तो सुदिन. कृपा केली पाहिजे. हे विनंति.

---

श्रीवरद

## लेखांक १३.

१७०३ ज्येष्ठ शुद्ध ६

पु।। श्रीमंत राजश्री नाना स्वामीचे सेवेसीः—

विनंतिपत्रीं आज्ञा कीः नवाब नजबखान यांचें जाणें शिंद्याकडे न होय तरी कोण्ही उमदा सरदार त्याजबरोबर फौज पोतख सामान देऊन जरूर रवाना करावा, ह्मणजे तिकडील फौज मिळोन दुहिरी शहानें इंग्रेजी पलटणें शिकस्त होतील.

ह्मणून लिहिलें. त्यास, याअन्वयें लिहिल्याप्रमाणेंच बोलून, महमद बेगदानी ढवळपुरी आहे त्यास पत्र व अनुपगीर गोसावी जैयपुरीं नजबखानाकडून मामलयाचे ऐवजास वसूलें करावयास गेला आहे त्यास पत्रें नजबखानाचीं कीं, तुह्मीं आपले फौजेनसी सरंजामसुद्धां जाऊन राजश्री पाटीलबावास सामील होणें, व पाटीलबावाचे नांवें पत्र कीं, तूर्त दोन्हीं पथकें तुह्मांकडे रवाना केलींच आहेत ते येऊन सामील होतील. बाइजबरसात शिखाकडील फौज रिकामी झाली ह्मणजे आह्मीही पातशहासहित बाहेर निघतों. याप्रमाणें तीन पत्रें तयार केलीं. इतक्यांत कलकत्त्याहून हालसाहेब इंग्रेज आला होता, त्याजकरितां ते पत्रें आह्मांपाशीं न देतां आपलेपाशींच ठेवून घेतलीं. आतां तो गेलियावर फिरोन ह्याटकिलें. त्यावरून पुन्हां पत्रें चावीसें ठराविलें आहे. पत्रें हातास आलियावर पाटीलबावाबरोबर रवाना करितों. परंतु हे इंग्रजास भितात. फार खुलून बोलत नाहींत. पुढें अमलांत येईल ते मागाहून विनंति लिहूं. कृपा केली पाहिजे. भेट होय तो सुदिन. हे विनंति.

---

श्रीवरद

## लेखांक १८.

१७०२ ज्येष्ठ शुद्ध ६.

पु॥ श्रीमंत राजश्री नानासाहेब स्वामीचे सेवेसीः—

विनंति कीं: पूर्वी सरकारासीं इंग्रजांनीं इमानप्रमाण देऊन किल्ले व प्रांत त्यांणीं घेतला आहे तो सोडवणें मान्य केलें. व दोघे गोरे सरदार ओलीस देऊन मदरास स्वामीपासोन येऊन सुरतेस गेले व तेथें जाऊन करणेल गाडर इकडून गेला त्याचे विच्यारें फिरोन बेमानी केली. त्या वेळेस सोडिले यास्तव व त्यांचे बेमानीस्तव आजवर झुंज लागलें. तेच समई मारून ताराज केले असते तरी जेरबंदी होती. या दिवसांत नजबखान पुसत होता कीं, पूर्वी श्रीमंतांचा त्यांचा कौल–करार कसला ठरला? त्याचें उत्तर आह्मीं दिधलें कीं, त्यांणीं इमान सोडल्याचा तपसील काय, त्यांचे दोघे गोरे सरदार आजपावेतों ओलीस आहेत, इतकें श्रवणांत आलें आहे. वरकड तपशील श्रीमंतांस लेहून पाठवावयास आपले मर्जीप्रों लिहितों. इतकें बोलोन सेवकानें यांजला सांगितलें कीं, त्याची भानगड आपण करावया योग्य ते नाहींत. तेव्हां बोलिले कीं, त्यांजला शरमिंदे करावयास्तव व बेमानी त्यांची त्यांचे अंगीं लावावयास्तव तुह्मांस वर्तमान पुसिलें, तें तुह्मीं लेहून उत्तर आणावें. सलाह यास मारण्याची आहे; फौजेचे जोरानेंही मारावें व याजपासून हो येऊनही यास मारणें प्राप्त, हस्तगत करावा, तपसील कसकसा करारमदाराचा जाहला होता तो जरूर लेहून आणवणें कीं, असफदौला त्याचे इमानप्रमाणावर सर्वस्व गेलें असतां गाफील आहेत त्यास फोडून आपले नरम येऊं, व पठाण रोहिले मिळून आहेत. याप्रों बोलोन सेवेसी ल्याहावयास सांगितलें, त्याप्रों लिहिलें असे. उत्तरीं तपसील लिहिणार स्वामी समर्थ आहेत. कृपा केली पाहिजे. दर्शनलाभ होय तो सुदिन. हे विनंति.

---

श्रीवरद.

## लेखांक १५.

१७०३ ज्येष्ठ शुद्ध ६.

पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीः—

विनंतिपत्रीं आज्ञा कीं:—गाडर वसईहून मगरूरीनें दहा बारा पलटणें, कवाइती, हजार गोरा, वीस पस्तीस तोफा, या सरंजामानिसी घाट चढून वर आला. त्याचे मुकाबिल्यास राजश्री हरिपंत व तुकोजी होळकर व परशरामपंत वगैरे फौज व सरंजामानिसी होते. त्यास, इंग्रजांस मयदानांत काढून सजा करावी ही तजवीज होती. परंतु सरकारी फौजेचे लढाईचे मुकाबिल्यामुळें मैदानांत यावयाची जुरत न करतां घाटमाथां अडचणीच्या जागा पाहून राहिला. तेव्हां राजश्री परशरामपंत यांस फौजेसुद्धां घाटाखालीं इंग्रजांची रसद बंद करून महासरा यावयाकरितां पाठविलें. त्यास, परशरामपंत याणीं इंग्रजी रसद येत होती त्यास महासरा करून, सातआठ हजार बैल गल्ल्याचें कुल लुटून आणिलें व कित्येक इंग्रेजी लोक यांस तंबी करून गारत केलें. याजउपरी पनवेलीहून पांच सहा पलटणें, आठ दहा तोफा, ऐसे सरंजामसुद्धां घाटरुखें गाडर याचे कुमकेस येतात, ही बातमी सरकारची आली. त्यावरून राजश्री हरिपंत यास बमय हुजुरात फौज, तोफा व गारदी घाटावर गाडराचे मुकाबिल्यास येऊन तुकोजी होळकर यांस बमय फौज सरंजाम घाटाखाले पाठविलें. त्यास तुकोजी होळकर व परशरामपंत याणीं पनवेलहून पलटणें येत होतीं त्यांस महासरा देऊन लढाई दिल्ही. होळकर याणीं शुतरनाळांची व करोलची मारगिरी दिल्ही व लढाई चांगली जाहली. इंग्रजांकडील कवायती लोक व गोरे पांच सहासें ठार, सिवाय जखमी जाहले. सरकारचे लोकही फार कामास आले. सेवटीं पलटणें झाडीचा आश्रय करून बहुत मुशकिलेनें गाडर याजपासीं जाऊन पोहोंचलीं. त्या दोहों दिवसांत हरिपंत याणींही घाटावरून निकड करून गाडरासी मुकाबिला केला. दुतर्फां लढाईची निकड बहुत जाली. रसद बिलकुल पोहोंचेना. तेव्हां बेताबा होऊन छ २३ रबिलाखर रात्रौ घाट उतरून × × × × × × × फौजसुद्धां घाटाखालीं गेले. येकीकडून हरिपंत याप्रमाणें व येकीकडून होळकर व परशरामपंत याप्रमाणें इंग्रजांसी दुतर्फां घेरून, दोन तीन लढाया निकडीच्या जाहाल्या. तोफा व बाणाची मारगिरी जाली. लोकांनींही घोडे घालून लगट फार केली. याजमुळें इंग्रज बहुत घाबरा जाहला. येक तोफ व बंदुका व दारूगोळ्याचे संदुक व छकडे, रथ वगैरे सरंजाम बेशुकर पाडाऊ आला. मिस्तर पारकल नामें गाडराचे बराबरीचा सरदार लढाऊ व तरतूदकार होता तो गोळीची जखम लागून जायां जाला. गोरे व कवायती लोक मिळोन सात आठसें पडले. सिवाय जखमीही बहुताद आहेत. सरकारचीहि घोडीं व लोक बहुत कामास आले. शेवटीं गाडर ज्यान बच्याऊन पळाला. थोडका आसबाब पनवेलीद्र्यानें आसरियास जाऊन पोहोंचला. सरकारच्या फौजाही पनवेलीजवळ मुक्काम करून आहेत. तुह्मास कळावें ह्मणून लिहिलें असे. बादशहा व नबाब नजबखान यांसही कळवावें. इंग्रजांची सिकस्त श्रीमंताचे प्रतापेंकरून मोठी जाली व त्याचा नाशही फार जाला, ह्मणोन लि॥. त्यास आज्ञेप्रमाणें

या पत्राची फारसी करून पातशहास व नवाब नजबखानास सविस्तर मार समजाविला. वाचून बहुत संतोष पाऊन उत्तर केलें कीं, ईश्वर हमेश त्याप्रोंच श्रीमंताची फत्ते करो व इंग्रजांचा कदम पादशाहींतून निघून लयातें पावो. ह्मणून आशीर्वाद ममतापूर्वक देऊन नजबखानास आज्ञा केली कीं, तुह्मीही कांहीं उद्योग कराल किंवा नाहीं? नजबखान याणीं अर्ज केला कीं, तोफखाना वगैरे सर्व तयारी आहे, कुंजपुरीयाकडील फौज रिकामी जाली ह्मणजे सर्व गोष्टी मर्जीनुरूप घडण्यांत येतील. याप्रमाणें बोलिले. पुढें आमलांत येईल तें मागाहून विनंति लिहूं. इंग्रजांचा निःपात करणियाची तदबीज नवाब बहादूर विशेषच सांगतात. परंतु स्वामीचे प्रत्ययास येऊन आह्माकडून लिहविलें व यांनीं सेवेसी लिहिलें तें खरें होय तो सुदिन! कृपा केली पाहिजे. हे विनंति.

---

श्रीवरद.

## लेखांक १६.

१७०३ ज्येष्ठ शुद्ध १०.

पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामीचे सेवेसीः—

विनंति आमचें वर्तमान तरः—ज्येष्ठ शु॥ १० दशमीस यमुनास्नानास निगबोधास गेलों होतों. त्यास, यमुनातीरीं, लताफत-अली-खान लगून खोजा फजीराकडील दों पलटणांनिशीं पातशहाचे तैनातीस आहे त्यास, परस्परें कजिया गणसामाणसी जाला. त्याजकडील जमाव भारी. दोन माणसें मारलीं गेलीं. आह्मा-कडील एक खिजमतगार मारला गेला व त्याचा एक जखमी जाला व इतर सात जखमा जाल्या व आह्मास च्यार जखमा जाल्या. भुंवईवर एक व हातावर एक व पोटावर एक व पाठीवर एक, ऐशा चार जखमा जाल्या त्यांत पोटावरील जखम भारी होती. परंतु आपले प्रतापें व पुण्येंकडून वांचलों. जखमा बऱ्या जाल्या. एक महिना मानसिक स्नान जालें. आतां स्नान करीत असतों. तात्पर्य, आज आठ दहा वर्षें जालीं, सरकारची फौज इकडे आली नाहीं आणि नजबखान बळावला. याजकरितां व इंग्रजी पलटणें पुण्यासमीप आलीं त्यांचें पारपत्य खातरखा न जालें व ग्वालेरीपाशीं पलटणें आहेत त्यांचें पारपत्य अद्यापि खातरखा होत नाहीं, हा रंग रांगडे पाहून आपलाले ठिकाणीं बदमस्त जाले आहेत. कोण्हास खातरेस आणीत नाहींत. व आह्मापाशीं जमाव तों तैनाती बाळाजी गोविंदाकडील सरकारांतून देविला तो त्यांनीं न दिधला. जुजबी माणसें व दक्षणी कोण कोठें आहेत, हा मजकूर कोणाचे ध्यानांत राहिला नाहीं. परंतु या काळांत आपले प्रतापेंकडून पूर्वील पारटीवर भ्रम न सर्वांसी स्नेह आहे त्यावर जीव आबरू आहे. कपर्दिकेची प्राप्त याजकडून नाहीं इतकेंही असोन सरकारकामास्तव जडाव राखून आपली अब्रू रखून स्वामीचे नांवयशाप्रमाणें आजपावेतों श्रीनें रक्षिलें. पुढें पोख्तर काम होऊन शत्रूचें पारिपत्य सेवकाचे हातें करविणार स्वामी समर्थ आहेत. कृपा केली पाहिजे. दर्शनलाभ होय. तो सुदिन. हे वि.

---

श्रीवरद.

## लेखांक १७.

१७०३ ज्येष्ठ शुद्ध ६.

श्रीमंत राजश्री पंतप्रधान स्वामीचे सेवेशी:—

विनंति सेवक पुरुषोत्तम महादेव कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना येथील कुशल तागाईत छ ५ जमादिलाखर मुक्काम दिल्ली स्वामीचे कृपावलोकनेंकरून यथास्थित असो. विशेष. कृपा करून छ १५ रविलावलचें पत्र पाठविलें तें छ ५ माहे जमादलावली सरकारचे कासिदा—समागमें पावलें. पत्रीं आज्ञा कीं, तुह्मीं पातशहासी व नबाब नजबखानासी बोलून इंग्रजांचे तंबीचा आहद—पैमान घेऊन पाठवणें, वरकड सविस्तर राजश्री बाळाजी जनार्दन यांनीं लिहिलें आहे त्यावरून कळेल ह्मणून आज्ञा. त्यास आज्ञेप्रमाणें याजपासून आहद—पैमान सरकारचे नांवें लिहून घेतला आहे. त्याप्रमाणें राजश्री महादजी शिंदे यांचे नांवें मागतों. पाटीलबावा यांनीं ग्वाल्हेर प्रांतीं इंग्रजाची लढाई मारली ह्मणजे याजवर दाब बसून पूर्वीं कौलनामा लेहून दिधला आहे त्याप्रमाणेंच वर्तणूक करतील व सरकारचे सरदाराचे सामीलही होतील. वरकड सविस्तर राजश्री बाळाजी जनार्दन यांचे पत्रीं लिहिलें आहे त्यावरून श्रुत होईल. सदैव कृपा करून हस्ताक्षर—पत्रामृतीं सनाथ करणार स्वामी समर्थ आहेत, दर्शनलाभ होय तो सुदिन. कृपा केली पाहिजे. हे वि.

पैा छ १६ रजब सन समानीन बाा सरकारची जोडी.

———

श्रीवरद.

## लेखांक १८.

१७०३ ज्येष्ठ शुद्ध ६.

पुरवणी श्रीमंत राजश्री नाना स्वामीचे सेवेसी:—

विनंतिपत्रीं आज्ञा कीं, इंग्रजांचा सहवास नजबखानास बहुत. पादशाहींत त्यांचा कदम न सीरावा हें आहेच. श्रीमंत राव पंतप्रधान हजूरचे फिदवीयाची फते असावी हेंच रात्रंदिवस चित्तांत आहेच; यांत संशय नाहीं. टोपीकराचे वकिलास रुकसत दिल्ही, हे फार नेक सलाह केली. तुह्मीं लिहिल्यावरून मूळीची व हजूरची इनायत याजवरून इकडील खातरजमा आहेच. सरकारचे सरदार आजपों पोंहचले असते. गुंता नव्हता. परंतु दरम्यान इंग्रजी पलटणें आलीं, तो शह पडला, ह्मणून दिक्कत पडली. याची तर्तूद अलाहिदा लिहिली, त्याप्रमाणें अमलांत यावें. ह्मणजे सर्व गोष्टींत उभयपक्षीं खातरजमा होवून, योजिली मसलत सिद्ध झाली. गाडर कोंकणांतून घाट चढून आला होता, त्यास सरकारचे सरदारांनीं शिकस्त दिल्ही. त्याचा तपशील अलाहिदा लिहिला आहे त्यावरून कळेल. ह्मणून लिों. त्यास, आज्ञेप्रमाणें हा मार सविस्तर नजबखानास समजावून प्रसंग पाहून, संतोषातें पावले. तेव्हां, बहुतेक ममतेनें पूर्वीं वचनें दिधलीं आहेत तीं बुहराहून बोलोन त्याणीं उत्तर दिलें कीं, श्रीकृपेनें बादजबरसात काय घडून येतें तें प्रत्ययास येईल, इंग्रजांची वें आमची बरोबरीची लढाई आहे, त्यास आमचा तोफखाना व पलटणें सन्मुख व तुह्मांकडील फौज करोलीस उपराल्यास असलिया सहा महिन्याचें काम आठ दिवसांत

फडशा करूं, इंग्रज काय वस्तु आहेत ? याप्रमाणें बोलून आपल्यास व श्रीमंत स्वामीस खलिता पत्रें दिल्हीं. त्याजवरून ध्यानारूढ होईल. पुढें अमलांत येईल तें मागाहून विनंती लिहूं. कृपा केली पाहिजे. हे विनंति.

---

श्रीवरद.

## लेखांक १९.

१७०३ ज्येष्ठ शुद्ध ६.

पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामीचे सेवेसीः--

विनंतिपत्रीं आज्ञा कीं, इंग्रजासीं विवाड करून मसलत करणें. तेव्हां शिखासी विवाद करावयाचा नव्हता. जाला असो. हालीं हरयंजेनें शिखास सामील करून घ्यावें, ही मसलत फार चांगली. जरूर लिहिल्याप्रमाणें अमलांत यावें. इंग्रजांचें पारपत्य केल्याखेरीज पातशाहींत कोणास चैन पडणार नाहीं, हें पुरतें समजावें. याप्रमाणें बोलावें, म्हणून लिहिलें. त्यास, आपले आज्ञेप्रमाणें यांशीं भाषणें केलीं व लिखित केलें. याणींही पूर्वी गजपतसिंग जाट यास मर्जा-सफीखान याची फौज कुंजपुरियाकडे आहे, येथें धरून कैद केलें, याचा तपसील पूर्वीच विनंतिपत्रीं पाठविला होता. त्यास हालीं नजबखान याणीं गजपतसिंगास दिल्लीस बोलावून आणून, आ लक्षांचा मामला फडशा करून त्यास पर्वे व शिरपेंच, जवाहीर पालखी यासीं बहुत सन्मान करून, पुत्रास व त्याचे कारभारी यांस व भावाबंदास यथायोग्य वस्त्रें देऊन [illegible] आणिले [illegible] शिखाचा मुलूक [illegible] मी शिखाकडे [illegible] आणि [illegible] नाहीं आपले फौजेनिशीं सामील [illegible]

बोलून त्यास छ १५ रजबीं रुकसत करून कुंजपुऱ्याकडे मार्गस्त केलें. व यापूर्वी जाबेत-खानासही छ ५ माहे मारीं याच कार्यानिमित्त रुकत केलें. ते गासगडास गेले आहेत. त्यास जाबेत-खान व गजपतसिंग एकत्र होऊन, शिखाशीं सलूख करून, तिकडील फौज मिर्जा सफीखान सुद्धा रिकामी करून अंतर्वेदींत मेरट प्रांतीं छावणी करावी हा विचार ठरला आहे व तोफखान्याचीही तयारी आहे. बादज बरसात पातशहा सुद्धा बाहेर निघतों, म्हणोन आम्हांसी बोलतात; परंतु कानूचा रंग पाहून आहेत. अमलांत येईल तें मागाहून विनंति लिहूं. कृपा केली पाहिजे. दर्शनलाभ होई तो सुदीन. हे विनंति.

---

श्रीवरद.

## लेखांक २०.

१७०३ ज्येष्ठ शुद्ध ६.

पुरवणी श्रीमंत राजश्री नाना स्वामीचे सेवेसीः--

विनंतिपत्रीं आज्ञा कीः राजश्री बाळाजी गोविंद खांसीकर याणीं तुमचे गांवाविशीं ऐनमाविसी जाबसाल केले त्याचा तपसील लिहिला तो सविस्तर समजला. ऐशियासी, येविशीं त्यांचे कारकुनास येऊन निक्षून ताकीद केली, म्हणोन पत्रीं लिहिलें. त्यास, सरकारांत हमेशा विनंतिपत्रें लिहितों. त्यांत एक पत्रीं [illegible] आपले [illegible] लिहिलीच आहे, त्यांनी [illegible] यासीं त्यास ताकीद केल्याची येतात. परंतु कांहींही कमाविसदारांस ताकीद पावल्याचे येत नाहीं. आणि आम्हीं येथें [illegible] [illegible] [illegible] पाहिजे. [illegible] [illegible] नाहीं व [illegible]

खर्चही नाहीं. परंतु बाह्य मात्र नीट राखणें प्राप्त. नेमणुकीप्रों खर्च ठेविला यास्तव कर्जदारी जाली. स्वामींनीं जहागीर बुंदेलखंडांत लावून दिधली. ते बाळाजी गोविंद याणीं उरई परगणा कालपीसमीप दहा कोस आहे तेथें विसा हजारांची कमाल-जमेची चाळीस वर्षे जालीं. जे गांव उज्याड पडले होते ते लावून दिल्हे. त्याची, आज पांच वर्षे जालीं, लावणी -जुराणीकारितां पांच सात हजार काचे बनारसचे जमेवर आले ते रो। दिलीचे बारा आणे होतात. या प्रकारें वसूल होत होता. त्यास, हालीं कालपींत इंग्रजांचा अंमल जाला. त्याजमुळें आमचेही गांवची बद-अमली होवून कपर्दिक यंदां पदरीं पडली नाहीं. व झांसीकरांनीं नगदी पांच हजार दो वर्षांपासून बंद करून गांव लावून दिल्हे होते तेही त्याणीं जप्त केले. स्वामींनीं फाजलाप्रों उभयतां सरदारांवर निमे वरात दिल्ही कीं हरएक ऐवजीं रुपये देणें. त्यास, सरदारांनीं जेपुरावर पुढें वरात दिल्ही व निमे सरकारांतून जाटावर वरात दिल्ही. दोन जागा कमपेश तीस तीस हजारांच्या वराता फाजलाप्रों व तलबाप्रों वीस हजार रुपये जाटावर वरात दिल्ही. येकूण कमपेश ऐशीं हजार रुपये वराता. ते दोनीं स्थलें नजबखानाकडे गेलीं. याप्रों अमदानीचा प्रकार आहे. तेव्हां आम्हीं काय करावें ! कर्ज कोठपावेतों घ्यावें ? कर्जही कोणी देत नाहीं. बाळाजी गोविंद याजकडोन, झांसीकरांकडोन व बुंदेलखंडचे जहागिरीकडोन व फाजलाचे वरातीप्रों कोठूनही रुपये आल्यास येथें मागील देणें लोकांचें भारी जालें त्याप्रों वीस हजार तूर्त देणें जरूर आहे तें वारून सेवेसी येऊं. पुढें नित्यानीं पोटास पाहिजे व कर्जदाराचे तगादे सरवत याचा तपशील पत्रीं कोठवर लिहावा ? स्वामी धणी जर या समयासी आपण खबर घेत नाहीं, तर प्राणासी गांठ पडली. येथून निघोन स्वामीपासीं येणें व येथेंही रहाणें कठिण जालें. या प्रकारची अवस्था येऊन लागली. तारणार स्वामीच आहेत. दुसरा आश्रय परमेश्वराचा किंवा स्वामीचा आहे. यास्तव निखालस फडणिसी दप्तरची वसुली जमेचे गांव देणें ह्मणून सनद पा किंवा गांववसुली जमेचे हातास आले तर कर्ज तऱ्ही मिळेल व स्वामीस लिहिणें न पडे. सरकारांतून ऐवज बाकीचा देणें. त्याची वरात हरकसी जागा करून द्यावी कीं, रो हातास येऊन कर्जदारापासून सुटका होय ते करणार स्वामी समर्थ आहेत. याद अलाहिदा पा आहे. त्याजवरून श्रुत होईल. कृपा केली पाहिजे. दर्शनलाभ होई तो सुदिन. हे विनंति.

---

श्रीवरद.

## लेखांक २१.

१७०३ ज्येष्ठ शुद्ध ९.

पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामीचे सेवेसी :—

विनंतिपत्रीं आज्ञा कीं, हैदर-अलीखान-बहादूर याजकडील मा॥र पेशजी लिहिण्यांत आलाच आहे. इंग्रजांस जरब त्यांनीं फार दिली. हालीं गंटूर देवाणापटण ह्मणोन बंदर-किनारा जागा अडचणीची आहे, तेथें जमीयतसुद्धां करनेल कोट आहे. हैदरखान यांनीं सभोंवता माहसरा दिल्हा आहे. बंदी केली. फरासीसही सरंजाम पोख्त जलद येणार. फरासिसाचें राजकारण खानाशीं पक्कें जालें आहे.

सरकारांतही फरासिसांचा शिलशिला अ-व्वलीपासून आहे. याप्रों तिकडील वर्तमान आहे. तुह्मीं हुजुरांत अर्ज करावा व नजबखान यांसही सांगावें. त्याचेही परभारें अखबारेवरून वर्तमान येतच असेल, म्हणून लिहिलें. त्यास आज्ञेप्रों पातशहास व नजबखानास हें वृत्त श्रवण केलें. ऐकून बोलिले कीं, या दिवसांत हैदरअलीखानें याजपाशीं फौजेचा व पैक्याचा सरंजाम पोख्त आहे, त्यावरून सर्व गोष्टी अमलांत येत्यात. आह्मी बोलिलों कीं, सर्व गोष्टी मेहनतीच्या व जुरतीच्या आहेत, पूर्वीपासून जो कोण्ही जुरत मेहनत करीत आला आहे त्यास मुलुकास व खजान्यास व फौजेस कमी नाहीं. म्हणून बोलिलों. त्यांचें उत्तर हेंच केलें कीं, सत्य आहे. याप्रों हरयेक समईं उत्तेजन देतों. आतां बादबरसात पातशहासुद्धां बाहेर निघतों, म्हणून आम्हासी करार करितात, व तोफखाना वगैरे सरंजामही तयार करितात, व कुंजपुरियाकडील फौजही रिकामी करावया तरतूद केली आहे. परंतु अमलांत येऊन सरकारचे मसलतीस उपयोगी पडत, याच विचारांत रात्रंदिवस आहेत. अनुभवास येईल तें मागाहून विनंति लिहा. कृपा केली पाहिजे. दर्शनलाभ तो सुदिन. हे विनंति.

---

[illegible].

## लेखांक २२.

१७०२ ज्येष्ठ शुद्ध ८.

पुरुषोत्तम महादेव यांचें पत्र नानांसः-

विनंति कीं, महंमुदअलीखान यांणीं मौजा धामणा अद्र-प्रांतीं नवाबखानांनीं [illegible], [illegible] [illegible] [illegible] यांणीं सरदारी मोडून अनुपगीर गोसावी यास ते प्रांतीं पाठविलें. वास्तव ते अजुर्दा होऊन मकाणास गेले. ५-७ लाख रुपये आपले पदरींचे खर्चून फौज जमा केली. प्रांत हस्तगत केलेला गेला. पुढें याजपासून नाउमेद होऊन ते प्रांतीं आले आहेत. नजबखानांनीं बहुत मित्रता केली; परंतु न मानिलें. येथून चलते समईं स्वामीस विनंति लिहावयास सांगून पत्रें दिधलीं ते पाठविलीं आहेत. मर्जीस आल्यास उत्तरीं सनाथ करावें. वजिराकडील प्रांतास बाकी-फकार, व सिपाई, व सरदारीचा ठसा त्याच्याकडे कुरेप्रांतीं चाललाच आहे. वास्तव मर्गतेंत येऊन स्वामीचे कृपेचे उमेदवार केले. त्यासी करार केला आहे कीं, गला पाहून स्वामीपासीं जाणें, तुमचे योग्यतेप्रमाणें मातबर सरदारी तुम्हांस पुढें पाठवून येऊन जातील, व कांहीं फौजेची सरदारी देऊन अंतर्वेदीचे अथवा हरयेक मुजाचे कामास तुम्हांस पुढें करितील. याप्रों बोलून रवाना केलें. ते कदाचित् आपलेपाशीं आले तर ममतापूर्वक आदरसत्कार करून संग्रहीं ठेवावे. या प्रांतीं त्याचे सलुकानें इसमें मातबर फुटून सरकारचे अंकित होतील. पत्रोत्तरें पाठवावीं. त्याचे बंधू येथें आहेत त्यांजपाशीं पावतें करतील. म्हणजे खातरजमेनें सेवेसी येतील. श्रुत होय. या दिवसांत यशवंतराव वाघळे यांणीं अद्र-प्रांतीं येऊन प्रांतांत दंगा केला. तेव्हां महाराज अदरकरांनीं फौज पाठवून झुंजांत पळून गेले. त्यांचा पुरा हार आला. दोनतीनसें घोडीं लूट [illegible] [illegible] [illegible] [illegible]. व [illegible] किल्ल्यावर राजे [illegible]-राम [illegible] आहे तेथेंच त्यामध्ये बैठे आहे. व २ मासानीं [illegible] [illegible] [illegible] [illegible] [illegible]

त्याचीं पत्रें नजबखान वगैरेस आलीं तें बजिनस धरून पाठविलीं आहेत. तेथें शहरांत असतां इंग्रजांची वरिष्ठता लिहितो. याकरितां पूर्वीही पत्रें धरून घेऊन सेवेशीं पाठविलीं व हालीं पाठविलीं आहेत. नजबखानास अर्जी लिहिली आहेत त्यावरून वृत्तव्यंग लिहिलें तें श्रुत होईल. बरकडाचीं पत्रें आहेत त्यांचा विस्तार त्यांचेच पत्रांवरून विदित होईल. गरीब पोटार्थी आहे. यास्तव हरकोठें पांच सात रुो दरमा करून तेथून दूर ठेवावें. तेथें राहिल्यास स्वामीचें राज्य श्रीमहादेवाचें आहे, उत्कर्ष अधिक, गुह्य गोष्टही प्रकट होते, यास्तव लिहिलें असे. श्रुत होय. कृपा केली पाहिजे. दर्शन-लाभ होय तो सुदिन. छ ११ साबानीं वर्तमान आलें कीं, राजश्री महादजी शिंदे यांनीं इंग्रजांची फौज मारून ताराज केली, हजार बारासें माणूस राहिलें तें दो ठिकाणीं कोंडिलें आहे. बरकड गोहदकर व भदावरकर वगैरे व त्यांचे लोक गछ करून गेले तें वृत्त शेवेसी पावलेंच असेल. ईश्वर स्वामीचा प्रताप अधिकोत्तर करो. दर्शन-लाभ होय तो सुदिन. हे विनंति.

---

श्रीवरद.

## लेखांक २३.

१७०३ ज्येष्ठ शुद्ध ६.

पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामीचे सेवेसीः—

विनंति कीं: इंग्रजांकडील वकील पेशजी आला होता व हालीं इंग्रज एक आला होता व हमेशा पत्रें चकत्या त्याजकडील येत्यात. त्याचें परिमार्जन करून आपले सरकारच्या स्नेह व ममता पातशहासीं व नबाब नजफखानासी धरितां आजपावेतों ठेविली व पुढेंही स्नेहवृद्धीची पैवंदी करीतच आहों. हें वृत्त इंग्रजांनीं लखनऊस श्रवण करून, लताफत—अलीखान खोजा जो पलटणानसी पातशहाचे तेनातीस वजिराकडून येथें आहे त्यास सांगून पाठविलें कीं, फलाणे वकील दिलींत श्रीमंतांकडून आहेत ते पातशहाची व नबाब नजबखानाची मर्जी इंग्रजांकडे ठीक राहूं देत नाहींत, त्या अर्थी एयेक बहाणा करून त्याचें पारपत्य करणें, ह्मणून खोज्यास पत्र आलें. त्यावरून माणसा माणशीं ज्येष्ठमासीं खटपट करून आह्मांवर हात घातला. हें वृत्त लखनऊस आपले सरकारचे परम स्नेही व त्याचे मुत्सदे आहेत यांनीं लिहिलें त्यावरून श्रुत व्हावयास लिहिलें असे. त्याचा तपसील पुरवणीपत्रावरून श्रुत होईल. तात्पर्य, इंग्रेज ऐसे मात्रागमनी कीं, जीव घ्यावयास देखील चुकले नाहींत. परंतु आयुष्य होतें व स्वामीचे प्रतापेंच वांचलों व पुढेंही रक्षणार स्वामीचें पुण्य समर्थ आहे! कृपा केली पाहिजे. दर्शनलाभ होय तो सुदिन. हे विनंति.

---

श्रीवरद.

## लेखांक २४.

१७०३ श्रावण वद्य ११.

पु। श्रीमंत राजश्री नाना स्वामीचे सेवेसीः—

विनंतिपत्रीं आज्ञा कीं, नबाब नजबखान बहादूर याचा खलिता व पातशाही शुके नबाब निजामअलीखानबहादुर व खंडोजी भोंसले यांचे नांवें पाठविले ते

करावा, कदाचित् इंग्रेजांनीं बदलून सलूक केला तरी पुढें सरंजाम करून प्रांत घ्यावयासी चुकणार नाहीं, याजकरितां सलाहच आहे कीं इंग्रेजांस मारून त्यास नेस्त-नाबूद करावें, यांतच सर्वांचें रूप आबरू आहे, नाहीं तर जळचर पृथ्वीचे धणी जाले तर घोड्यास पागोट्याची आबरू रहात नाहीं! याप्रमाणें बोलून आपले ईश्वराचें नांव घेऊन श्रीमंतास आशीर्वाद दिधला कीं, ईश्वर त्यांस यश दे आणि इंग्रज नेस्तनाबूद होत, यांतच सर्वांचें कल्याण आहे! याप्रमाणें भाषणें जालीं. व हेही बोलिले कीं, माधवराव जाधवराई कोण आहे त्यास इंग्रेजांचे ...बिल्याप्रमाणें सलुकास पा, त्यास ... ठरलें? तेव्हां आह्मीं उत्तर दिल्हें ..., सलुकास पाठविलें नसेल, यांनीं बोलाविलें असेल; तर त्याचा मनोदय व लांबीरुंदी पहावयाशीं पाठविलें असेल. हें वृत्त आह्मास आलें नाहीं, लिहून उत्तर येईल ते अर्ज करूं ह्मणून बोलून सेवेसी श्रुत व्हावयासी विनंति लि॥ आहे. तरी कृपा करून जाबसाल काय लागला आहे ते लिहावयासी आज्ञा करणार स्वामी समर्थ आहेत. कृपा केली पाहिजे. दर्शनलाभ होय तो सुदिन. हे विनंति.

श्रीवरद.

## लेखांक २६.

१९०३ श्रावण वद्य ११.

पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामीचे सेवेसीः—

विनंतिपत्रीं आज्ञा कीः—इंग्रेजांचा फदूर पातशाही मुलुखांत बहुत जाहला व त्यांची तंबी होऊन खारीज करावें यांतच बेहीसत. सबब त्याचे तंबीचा नक्षा सरकारांतून ठरवात आला. व चहूंकडून इंग्रजांस ताण देवजे नसेल, तेव्हां हे शकल सलतनतीचे बेहबुदीची व पातशाहीचे दाब–रोबाची सरकारांतून अमलांत आली. त्याचा संतोष पातशहास व नवाब मौसूफ यांस चित्तापासून आहे. त्यापक्षीं सरकारची खातरजमा होय ऐसे आहदपैमान घावयास पशोपेश करणार नाहींत. या मसलतीविसींची खातरजमेचीं पत्रें इकडून पेशजी पाठविलींच आहेत. त्या बमोजीं तुम्हीं त्यांची खातरजमा केलीच असेल. त्याजकडूनही पोख्तगीचे आहदपैमान घेऊन सरकारांत पाठवावे ह्मणून पत्रीं आज्ञा. त्यास, आज्ञेप्रों या पत्राचा मजकूर नवाब नजबखानाशीं बोललों. त्यांनीं उत्तर दिधलें कीं, याद कौलनाम्याची ठरवून दिधली आहे, ते तुम्हीं श्रीमंताकडे पाठवून त्याप्रों कौलनामा लिहून आणवणें, म्हणजे आम्हीही लिहून देऊं. त्यांजवरून आह्मीं उत्तर केलें कीं, पेशजी कौलनामा आपले मोहरेनसी लिहून दिधला आहे, तो असतां आतां दुसरी याद कौलनाम्याची लिहून दिधली त्याप्रों कैसा कौलनामा होतो, कदाचित् आह्मीं ती याद श्रीमंताकडे पाठविली तर श्रीमंत म्हणतील कीं तेव्हां नवाब दुसरे होते आणि आतां आणिक कोन्ही आहेत कीं काय, थोराचीं बोलणीं कांहीं दोन नसतात, जें जाहलें तें जालें, आतां आपण दुसराच मोड बोलतां याजवरून श्रीमंताचे ध्यानांत आलें कासुचीवच येईल, याजकरितां आह्मी ती याद श्रीमंताकडे पाठविली नाहीं, त्यास ज्यादा पेशजीचा कौलनामा श्रीमंताचे नांवें दिला आहे त्याप्रों हालीं राजश्री पाटीलबावाचे नांवें लिहून द्यावा. म्हणून यांशीं पष्टमतीनें बोलून, ताकवान केलें. मग

उत्तर केलें कीं, दुसरी याद लिहून देतों. त्याप्रों लिहून आणवणें, तोंवर आम्ही आपली फौज लौकरच शिखाकडील मसलत आटोपून रिकामी करितों व तुम्हांस कौलनामा लिहून देतों, आणि पाटीलबावाचे शामील फौज व आह्मी लौकरच होतों. ह्मणून धातुपोपणाच्या गोष्टी बोलून आम्हांस धंदरीं लाविलें आहे. परंतु यांचा भाव हाच आहे कीं, रा। पाटीलबावा यांनीं इंग्रेजांचें पारपत्य करून अंतर्वेदींत उतरले म्हणजे कौलनामाही लिहून द्यावा आणि आपण व फौजही शामील व्हावें. ऐसा याचा मनोदय दिसतो. जोंपावेतों इंग्रेजांचें पारपत्य होत नाहीं, तोंपावेतों इंग्रेजांसी सिखुली दुशमनी करावयास भितात. पुढें अंमलांत येईल ते मागाहून विनंती लिहूं. श्रुत होय. कृपा केली पाहिजे. हे विनंति.

---

श्रीवरद.

## लेखांक २७.

१७०३ श्रावण वद्य ११.

पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामीचे सेवेसीः--

विनंतिपत्रीं आज्ञा कींः रा॥ बाळाजी गोविंद यांस सरकारचीं ताकीदपत्रें परभारां पाठविलीं आहेत. त्यास, मारनिल्हे तुह्मांस ऐवज सत्वर क्षेप-निक्षेप देतील. म्हणून पत्रीं आज्ञा. त्यास, पेशजी ताकीदपत्र सरकारचे मारनिल्हेचे नांवें आलें कीं, दाहजार रुो जागिरीचे कमतीचे ऐवजीं देणें. त्यास ताकीदपत्र व दोन कारकून व माणसें पाठविलीं. त्यास च्यार महिने पदरचे खाऊन त्याजपाशीं राहिले. पत्राचें उत्तर मिळणें दूर. संभूत जाबदेखील न देत. निदानीं उत्तर दिल्हें कीं, आह्मापासीं खर्च भारी, मुलुकांत गढेमंडळेकराचा दंगा, याजकरितां पैका नाहीं. म्हणून उत्तर देऊन मार्गस्थ कारकून व माणसें रिकामीं आह्मांकडे पाठविलीं. त्यांस फौजेंचा खर्च म्हणावा तर रा॥ बाळाजीपंत श्रीनगरी तीनसें पागेचे रावतानिसीं आहेत व गंगाधरपंत दोनशें स्वार पागेचे व दोनशें शिलेदार मिळून चौशा रावतांनिसीं कोचकनारप्रांतीं आहेत. आपले आपले ठिकाणीं स्वस्थ आहेत. या दिवसांत आपले ठिकाणीं हे आपल्यास चवव्या राज्यारजवाड्याप्रमाणें जाणतात. सरकारची आज्ञा यांचे ध्यानांत नाहीं. कोण्ही सरकारचे तर्फेनें जबरदस्त होवून येईल त्यासी बनेल त्या रीतीनें रजावंदी पैका देऊन करूं, ह्मणून विलग बोलणीं नानाप्रकारें बोलून झांसीकर व हे एक विच्यारें आहेत. या उभययतांपासीं फौज नाहीं. उगेच कमाविसदारी वहागे मात्र करून आपले ठिकाणीं आहेत. रा॥ महादजी शिंदे यांचे भेटीस देखील न गेले; पुढें जाणार आहेत. स्वामीनीं कृपा करून विसा हजारांची जागीर बुंदेलखंडांत देविली, ते मारनिल्हेना कमाल निम्मेची लावून दिधली. त्याप्रों आतां पांच हजार रुपये दिल्लीचे पदरीं पडताल. आणि येथें परदरबारीं राहणें खर्च भारी. रुपया खर्चास पुरत नाहीं. याजकरितां येथें पंधरावीस हजार कर्ज लोकांचें देणें जाहलें आहे. नित्यानीं पोटाचें संकट येऊन पडतें. कर्जदाराचे तगादे. या गोष्टीचा तपशील पत्रीं कोठवर लिहावा? स्वामीचे प्रतापें व पुण्येंकरून आबरु व प्राण वांचले. नाहीं तर, ईश्वरें नेमिलें असेल तें घडेल. या समयांत सांभाळ करणार स्वामी समर्थ आहेत. पूर्वी सेवेसी विनंति पैदरपै लिहिली कीं, बाळाजी

गोविंद रुो आह्मांस देत नाहीं, हुजूर घेऊन सेवकांस पाठवाल तर जीव आबरु राहील, स्वामींनीं त्यास ताकीद केली ते न मानीत, यास उपाय तेवेंत विनंति लिहितो. इतके आयास येऊन लिहावयास कारण, अवस्था परम कठिण जाली आहे. आह्मे आजपावेतों आपले कृपेनें जतन केला. पुढें कृपा करून संरक्षण करणार श्रीकृपेनें स्वामी समर्थ आहेत. लाइलाजास्तव विनंति लिहिली मान्य केली पाहिजे. येथून राजश्री महादजी शिंदे यांजपावेतोंही जावयास कर्जेदाराचे ताडातोडीमुळें न बने. नित्याची संभून चालणें व ठरणें. उत्तरीं सनाथ कराल तींवर ईश्वरें काय नेमिलें असेल तें होईल. श्रुत होय. स्वामीसेवेंत जीव शरीर अर्पिलें. अबरु रक्षणार मायबाप आपण दया केली पाहिजे. दर्शनलाभ घडेल तो सुदिन. हे विनंति. वरकड वृत्त वेदमूर्ति राजश्री गोविंद भटजीचे पत्रावरून श्रुत होईल. कृपा केली पाहिजे. हे विनंति.

---

श्रीवरद.

## लेखांक २८.

१७०३ श्रावण वद्य ११.

पुरवणी श्रीमंत राजश्री नाना स्वामीचे सेवेसीः—

विनंति ऐसीजेः पूर्वीं याजपासून कौलनामा लिहून घेतला आहे त्याची नकल व हालीं याणीं याद लिहून काढली आहे त्याची नकल, ऐशा दोनी नकला हिंदवी करून पो आहेत, त्याजवरून ध्यानांत येईल. तात्पर्य, पहिले याजपासून लिहून घेतलें आहे त्या कौलनाम्यावरून अंतर्वेद सरकाराचे पदरीं पूर्ववत्प्रमाणें पडती. याजकरितां यांचा जीव हुसियार नाहीं कीं, यानीच दुसरा कौलनामा राजश्री महादजी शिंदे यांचे नांवें लिहून घ्यावा. प्रथम कौलनामा लिहून दिल्हा आहे, त्यांत शफत लिहून दिली आहे, तीस अंतर पडोन बेइमानी पदरीं पडते. याजकरितां इंग्रजांसी मिळूं सकत नाहीं. आणि आम्ही नित्यानीं तगादा करितों कीं, पाटीलबावा समीप आले होते, तुह्मींच चालून सामील व्हावें किंवा आपली फौज त्यांचे सामील पा. त्यास, ह्या गोष्टी ऐकोन टाळाटाळ करितात. त्याचें कारण हेंच कीं इंग्रेजांसी भितात. खोलून त्यासी बिघाड करूं सकत नाहींत. अंतस्थ आह्मासी बोलणीं मात्र बोलून आजपावेतों बोलत गेले. व सरकारांतही लिहीत गेले. त्याप्रोंच आतां इकडून ठेविलें आहे. याचें मानस कीं, इंग्रजांचीं पलटणें पाटीलबावांनीं मारून अंतर्वेदींत उतरलेस व सरकाराची फौज व सरदार जबरदस्त पडलेस जाणतील तेव्हां सामील होतील आणि पेशजी कौलनामा लिहून दिला आहे त्याजवरच कायम रहातील. जोंपावेतों ग्वालेरप्रांतीं इंग्रेज आहेत त्याचें पारपत्य जहालियाखेरीज हे दिल्लीबाहेर निघत नाहींसें दिसतें. पहिलें वचन गुंतलें आहे, याजकरितां इंग्रजांसही सामील होत नाहींत, दोहींकडे मेळ ठेवितात. परंतु अंतःकर्णपूर्वक इंग्रजाचें पारपत्य व्हावें, म्हणोन कायावाचामनेंकरून याचें बोलणें शफतपूर्वक आहे. व पूर्वीं कौलनाम्याप्रमाणें अंतर्वेदींतील माहाल मुलूक दिल्लीसमीप आहे तो जानो ह्मणून आतां आशा उत्पन्न जाली आहे. व तूर्त यांची फौज शिखाकडेही अटकली आहे. याजकरितां दुसरेकडे खास करूं शकत नाहींत. श्रुत होय. कृपा केली पाहिजे. हे विनंति.

---

श्रीवरद.

## लेखांक २९.

१७०३ श्रावण वद्य ११.

पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामीचे सेवेसीः—

विनंति ऐसीजे. येथून कासीद पत्रें देऊन रवाना करितो. त्यास तीन महिने होतात. परंतु अजुरा मिळून पत्राचे जाब सत्वर येत नाहींत. याजकरितां सेवकाचें चित्त बहुत साशंकित असतें. तरी कृपा करून अजुरा सत्वर कासिदास द्यावा. व उत्तर समर्थ करणार स्वामी समर्थ आहेत. कृपा केली पाहिजे. हे विनंति.

---

श्री.

## लेखांक ३०.

१७०३ श्रावण वद्य ११.

नवाब नजबखान बाहादूर याजकडून पूर्वी कौलनामा लिहून घेतला आहे, त्याची नकल.

श्रीमंत पंतप्रधानसाहेबासी व आम्हासी दोस्ती व इखलास कदीम आहे, त्यांत किमपि अंतर नाहीं, ह्मणोन दुहराऊन कौलकरार दिनइमानची शपतपूर्वक लिहितों कीं, तुमचा मित्र तो आमचा मित्र, तुमचा शत्रू तो आमचा शत्रू. व आजपर्यंत जो मुलूक आमचे व आपल्या कबज्यांत आहे, त्यांत खलश रतीभर न व्हावा *

---

श्री.

## लेखांक ३१.

१७०३ श्रावण वद्य ११.

नवाब नजबखान बाहादूर हे हाली याप्रमाणें कौल लिहून देऊं ह्मणतात, त्याची नकलः—

१ मेरट वगैरे महाल व इटावा वगैरे माहाल व कडाकुरा कदीम पातशाही भोजनखर्च व तोफखाना वगैरेचा तनखा आहे तें बदस्तूर आम्हाकडे असावें.

१ बंगाला वगैरे मुलूक कदीम पातशाही आहेत. दुशमनाकडून काढून बदस्तूर आम्हाकडे असावा.

१ सहारणपूर वगैरे मुलूक बदस्तूर आम्हाकडे असावा.

१ सिपारस जाटाची न करावी.

१ सुबे इलाहाबाद आमचा आहे तो बदस्तूर आम्हाकडे असावा.

१ नबाब वजिरांनीं मुलूक हालीं घेतला आहे. व कदीम आहे तो नबाब वजिराकडे असावा.

१ अहमदखान बंगश याचा मुलूक वजिरांनीं घेतला आहे. बंगश माराचा पुत्र चाकरीस हजर जहालियासी पातशाही बंदा आहे. वजिराची खातरदास्त त्याचा प्रांत सोडावा.

१शिखांकडील मुलूख आमचा व तुमचा फौजेचे इतफाकानें हस्तगत होईल त्यांत निम्मे हिस्सा वांटून घेऊं.

१ग्वालेरचा मुलूक इंग्रजांनीं घेतला आहे. त्यास, ग्वालेर किल्ला पातशाही आहे. तो बदस्तूर पेषकेष हजूरची करावी.

१ राजे जैपूर व राजे मारवाड कदीम बंदे पातशाही आहेत. हाली हजूर चाकरीस हजीर जाहालियासी आपले कदीम मुलकावर सरफराज रहातील. जर बागी होतील तर त्यांची तंबी करूं. जैयपूरचा मामला आह्मांकडे असावा व मारवाडचा मामला आपणांकडे असावा.

१ इंग्रजांनीं दक्षणचा मुलूक हालीं घेतला आहे व कदीम आहे त्यांत निम्मे वांटून घ्यावा. श्रीमंत राजश्री पंतप्रधान-

* येथून पुढें मजकूर गहाळ जहाला आहे.

साहेबांचे खातरदास्त सुभेदारी श्रीमंत पंत-प्रधानसाहेबाची असावी.

१ सुभे अजमेर आपणांकडे असावा.

१ जो तुमचा मित्र तो आमचा मित्र, तुमचा शत्रू तो आमचा शत्रू, त्याची तंबी करावयासी अंतर करूं तर शफत असे.

१ राजे गोहदकडील व आणिक तिकडील मुलूक तरवारेचे जोरानें हस्तगत होईल. जर तिकडील राजे हजर जहालियासी मामला आह्मांकडे असावा. बागी जहालियास तंबी करून निम्मे मुलूक वांटून घेऊं. उमराव राजे तालुक्यांत शाहाचे बंदगींत हजर होतील, त्यांसी न बोलावें व अमुल हुकमी केलियास त्यांचे तंबीस शामील राहूं.

१ मुलूक कालपी व झांसी आपणाकडे असावे.

१ कोणी आमचा चाकर उठोन तुह्मांकडे जाईल त्यास तुह्मी चाकर न ठेवावा व तुमचा चाकर आह्मांकडे येईल तरी आह्मी चाकर ठेवणार नाहीं.

१ तूर्त तुह्मांस मोहीम रुबकर आहे. त्यास, हुजूरचे फौजा व खर्चास तुह्मीं यावें. पुढें ऐ करार असे कीं, आमची फौज तुमचे कुमकेस जाईल तरी तुह्मीं खर्चास यावें. तुमची फौज आमचे कुमकेस आली तर आह्मी खर्चास यावें.

छ २३ जमादिलाखर संवत् १८३८ सन २२ पातशाही.

---

श्रीवरद.

## लेखांक ३२.

१७०३ श्रावण वद्य ११.

पुा श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीः—

विनंति ऐसीजे. राजश्री बाळाजी गोविंद यांजकडून विसा हजारांचे जागिरीचे कौ-तिचें ऐवजीं रुपये दहा हजार येविले. त्यास लिहितां व कारकून पाठवितां थकलों. परंतु कवडी खर्च न पाठवीत. यास्तव येऊन उलगडा पाहून स्वामीपाशीं येणें दुस्तर जालें आहे. आपण कृपा करून त्यांचे वकिलास तेथेंच ताकीद होऊन कौ येऊन पाठवाल तर जीवनोपाय. होईल तें करणार स्वामी समर्थ आहेत. व राजश्री रघुनाथ हरि यांजकडून सालाबाद पांचा हजारांचे नेमणुकीचे कौ × × × × ×. यांनी या ऐव-जास गांव लावून दिल्हे होते त्या × × ×नें वसूल होत होते. ते येऊन आम्हापाशीं सरकारांत विनंती न केली. हालीं मारनि-लेनीं गांव जप्त केले. त्यावरून सरकार-विनंति लिहिली. सरकारांतून मारनिलेचे नांवें ताकीदपत्र आलें तें त्यांकडे पाठ-विलें. त्यांनीं साफ उत्तर दिल्हे कीं, आ[illegible] तालुक्यापैकीं परगणे रा। पाटीलबावाकडे गेले, आतां राहिला मुलूक तो आमचे किल्ल्याचे खर्चास पुरत नाहीं [illegible] सरकारच्या नेमणुका [illegible] याव्या? यासि[illegible] पत्रें हुजुरांतून पाठविली आहेत. तेथें ×××× नेमणूक करार होऊन येईल त्याशीं ×××× पाटीलबावाशी बो-लणीं बोलून आमचे कारकुनास व [illegible] निरोप करून दिल्हे. [illegible] बुंदेले व झांसीकर [illegible] राजेरजवाडे तेथे आपण [illegible] तात व नानाप्रकारें [illegible] [illegible] [illegible] [illegible]

यांचे नाथ आपण आहेत. कृपा करून उत्तरीं पालन करावयास स्वामी समर्थ आहेत. दर्शन—लाभ होय तो सुदिन. हे विनंति.

---

श्रीवरद.

## लेखांक ३३.

१७०३ श्रावण वद ११.

पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामीचे सेवेसीः—

विनंतिपत्रीं आज्ञा कीः सरकारांतून उमदा सरदार चमय फौज पातशहाचे हुजूरांत येऊन पातशहांनीं व सरकारचे फौजेनें मिळून अंतर्वेद, बंगाला वगैरे मोहीम मातबर करावी, ऐसें होतें. परंतु प्रस्तुत बरसात दोन चार महिने राहिली आणि इंग्रजी पलटण जमा होऊन शिकरीवर आली, त्याची तंबी करणें प्राप्त आहे, याकरितां राजश्री महादजी शिंदे व शिवाजी विठ्ठल मातबर फौजेनसी इंग्रजी पलटणाचे पारपत्यास गेले आहेत. या समयांत पातशहाची हुजूर फौज दहा बारा हजार चमय सरंजाम जंगी व एक सरदार वाकफ याजपाशीं रा महादजी शिंदे यांजकडे येऊन मारनिले यांनीं व त्यांनीं मिळून शिकरीवर पलटणें आलीं आहेत त्यांचें पारपत्य करावें. बरसातीस चार महिने अवकाश आहे, याजसंबंधें या पलटणाचें पारपत्य करून गारत करावें, हें नेकसलाह. याजकरितां तुह्मी पातशहास व नजबखानास मसलतीचे मार्ग बोलोन, फौज इंग्रजाचे पारपत्यास लवकर ये, ऐसें करावें. बरसात जालियावर मातबर मुहीम करावी. तूर्त बरसातीस थोडे दिवस राहिलिया हें काम करावें. येणेंकरून फार चांगलें आहे. म्हणून पत्रीं आज्ञा. त्यास आज्ञेप्रमाणें पातशहास व नवाब नजबखानास समजावून उत्तेजन बहुत प्रकारें दिलें कीं, तुह्मी श्रीमंतास पत्रें लिहीत गेला व आह्माकडून लिहवीत गेला, आतां तुमचे लिहिल्याप्रमाणें रा पाटीलबावा आले आहेत; त्यांचे शामील आपली फौज पाठवावी. यांनीं उत्तर केलें कीं, उगेच आह्मास कशास लाजवितां, आह्मांपाशीं फौज आहे ती शिखाकडे अटकली आहे तिकडून रिकामी जालियावर श्रीमंताचे मनोदयानरूप अमलांत येईल. म्हणून बोलतात. अनुभवास येईल ते मागाहून विनंति लिहूं. इंग्रेजाकडील हो येऊन त्यास शामील न जाले ते एक पातशहाचे भयानें व स्वामीचे सेवेंत वचनीं गुंतले आहेत, त्या शरमेनें आजवर राखिले आहेत. पुढें सेवकाचा पाय येथें ठरणें कठिण जालें व याजला त्याचें आव्हान वरचेवर येतच आहे. ते बातनी ठेवून वारंवार यासी अर्ज करितों कीं पागोटियाची आबरू सोडून टोपी घालाल तर पुर्ती टोपी बसेल. तुमचे नसीबानें झुंज लागलें, नाहीं तर आजपावेतों दिल्लींत अंमल करते, आतां आपला नक्षा राखणें तर राजश्री महादजी शिंदे यांस शामिल होणें, नाहीं तर आतां कळीच दाखवून पुढें ग्रास करतील तेव्हां पस्ताव कराल व आमचें बोलणें स्मराल, तें न करणें. असें प्रातःकाळ सायंकाल नित्यानित्य तऱ्हेतऱ्हेची ममता दृढ करून उत्तेजन देत आहों. पुढें अमलांत येईल तें विनंति लिहूं. ईश्वर सत्वर शत्रूचा नाश करो व स्वामीचा प्रताप अधिकोत्तर होई ते सुवडी. कृपा केली पाहिजे. हे विनंति.

श्री.

## लेखांक ३४.

१७०६ वैशाख वद ११.

श्रीमंत राजश्री पंतप्रधान स्वामीचे सेवेसीः—

विनंति सेवक गोविंदराव पुरुषोत्तम कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. येथील कुशल ता। छ० २४ माहे जा।खर मुक्काम श्रीमथुरा जाणोन स्वानंदें लेखनाज्ञा केली पाहिजे. विशेष. पूर्वी छ० १७ जमादिलावलीं इकडील सविस्तर वृत्त विज्ञापना लिहिली होती. त्यावरून श्रुत जालेंच असेल. हालीं इकडील वर्तमान सविस्तर राजश्री नानाचे पत्रीं विनंति लि॥ आहे त्यावरून ध्यानास होईल. बहुत काय लिहिणें कृपा केली पाहिजे हे विज्ञप्ती.

पै॥ छ २८ रजब सन खमस समानीन ज्येष्ठ मास.

---

श्री.

## लेखांक ३५.

१७०६ आषाढ वद्य ११.

पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामीचे सेवेसीः—

विनंति ऐसीजेः— पातशहास मिरज्या फीखान यांणीं विनंति केली कीं, आपण स्वारी अगरियाकडे चालावें. त्यास पातशहांनीं उत्तर केलें कीं, तुह्मी एकांत एक नाहींत, या तुमचे भरवशावर निघोन येखाद्री मसलत करून फजीत व्हावें कीं काय ? त्याजवरून रद्बदली होता सिहेमासको पातशाजाद्यासमागमें द्यावें, असें ठरलें. तेव्हां पातशाहा ह्मणू लागले कीं, मशीं तुह्मी अंतर करूं नये. त्यांस मर्जासफीखान व अफरा—शाहाखान व अबदूल अमदखान व जेनुल—आबदीखान व मेहेदी—कुलीखान कुराणावर माहोरा करून दिल्या कीं, आह्मी हजरतीशीं अंतर करणार नाहीं. त्याचे कुराणावर पातशानीं मोहर केली कीं, आह्मी अंतर करणार नाहीं. याप्रों परस्परें शफत प्रमाण होऊन शाहाजाद्यास समागमें घेऊन गेले. याचें कारण कीं, पातशहा सोडून दूर गेल्यावर पातशहानें दक्षण्यांसी किंवा इंग्रजासी किंवा शिखासी जाबसाल लावूं नये. कोणा कडून आमचें पारपत्य करील ह्मणोन त्यांचे मनांत शंवशय येऊन, पातशाहाजादा आपले हातीं असावा व महंमद्बेग हमदानी व राव राजा प्रतापसिंग जेपुरकर वगैरे किरकोळी राजेरजवाडे कोणी मानितात नाहींत, याजकरितां तारा समागमें असलियास सर्व आदब करून ताबेदारी करतील, हे जाणोन पातशाहाजाद्यास समागमें घेऊन गेले आहेत. त्यास आगियास गेलियावर महमद्—बेगानें ताबेदारी केली तरी उत्तम, नाहीं तरी त्याचे पारपात्य करावें, हा एक विचार. व तो ताबेदारी होऊन यांचे [illegible] असल्यास, राजश्री पाटीलबावाची फौज हलकी असलियास, राव याजकडील जाबसाल लागलाच आहे. त्यासीं राव यास सामील होऊन पाटीलासी विग्रह करावा, हा एक विचार. जर पाटीलबावाची फौज भारी असली व न तोले, तरी त्याचे व पाटील बाबांचे मध्यस्तीत पडून त्यांचा यांचा सलोख करून देऊन ग्वाहेरीचा किल्ला व पहिला [illegible] आहे त्यासीं मुलूख [illegible] वगैरे राजश्री पाटीलबावास देऊन, त्याचे—घा अंतर्संगीत उत्पन्न, पुढें [illegible] चाल करावी, हा एक विचार. व [illegible] विग्रह न करितां [illegible] [illegible] [illegible] [illegible] [illegible] [illegible] [illegible] [illegible]

गेले आहेत. त्यास, अग्रियास गेलियावर कोणती गोष्टींतून दरपेश येईल व काय मसलत करतील तें प्रत्ययास आल्यावर विनंती लिहूं. व श्रीमंतसाहेबांस व आपल्यास खलिते पत्रें स्नेहवृद्धीचे नबाब अफराशाबखान यांणीं लिो आहेत. याचीं उत्तरें आपणही कृपा करून स्नेह-वृद्धीचीं पाठवावीं. बहुत काय लिो ? कृपा केली पो. हे विनंति.

---

श्री.

## लेखांक ३६.

१७०६ आपाढ वद्य ११.

पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामीचे सेवेसी विनंति ऐसिजे:- वाट-साहेब इंग्रजानें हैदरनाइकाचे पुत्राकडील मामला तीन कोडीवर फैसल करून मद्राजचे किल्याची लढाई महकुब करविली. व मुलूक हैदर-नायकाचे पुत्रानें घेतला आहे तो याजकडे बदस्तूर बाहाल असावा याप्रमाणें फैसला करून, मद्राज किल्यांतून कलकत्त्यास आला. मेचफाससाहेब यास फोडून वर्तमान सांगितलें. त्यांणीं उत्तर दिल्हें कीं, जे सर्वांचे मनास कबसलियांचे मनास आली ते गोष्ट आह्मांस मान्य आहे. हैदर-नाइकाचे पुत्रासी सलूक करणेंच योग्य आहे, ह्मणोन बोलण्यांत आलें आहे. व महमद अलीखान, आरकाटचा सुभा, याचें पत्र कलकत्त्यास मेचफाससाहेबास आलें कीं, फौजेची व खर्चाची खबर घेता तरी हा सलूक रहातो, नाहीं तरी हैदरनाइकाचे पुत्र आल्यावर गालबा आहे, या दिवसांत खबर घेणें योग्य आहे. ह्मणोन लि॥ आहे. याप्रमाणें वर्तमान लेख लिहून आले त्याजवरून विनंति लि। आहे. बहुत काय लिो ? कृपा केली पाहिजे. हे विनंति,

सेवेसी विनंति शेवक शंकराजी सखदेव कृतानेक सांा नमस्कार मिज्ञापना. लिहिलें परिसोन कृपा करणार स्वामी समर्थ आहेत. हे विज्ञप्ती.

---

श्री.

## लेखांक ३७.

१७०६ आपाढ वद्य ११.

पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामीचें सेवेसी:-

विनंति ऐसीजे:- राजश्री पाटीलबावानीं आपलेकडून खिलत वस्त्रें रवाना केलीं तितपशील:-

१ मंजूर- अलीखान नाजर यासी दिलीस पाठविली साता पारच्यांची खिलत, वस्त्रें, मोत्याची कंठी, व जगा शिरपेंच, व हत्ती, व घोडा, व तरवार येणेंप्रमाणें.

१ सीतलदास मारानिलेचा पेषकार. त्यासी पाचा पारच्यांची खिलत व जगा व शिरपेंच येणेंप्रमाणें.

१ हसन-रजाखान वजिराचा कारभारी. यासी पाचा पारचांची खिलत, वस्त्रें, व जगा, व शिरपेंच, येणें-प्रमाणें.

१ हैदर-बेगखान वजिराचा मुत्खियार. यासी साता पारच्यांची खिलत व जगा, शिरपेंच, येणेंप्रमाणें.

१ राजश्री सदाशिवपंत बक्षी पाटील-बावाकडील वकील. यासी पाचा पारच्यांची खिलत, वस्त्रें, व जगा शिरपेंच, येणेंप्रमाणें.

---

५

एकुण पाच खिलत रवाना केले आहेत. व या दिवसांत हापडसाहेब इंग्रेज, पारमर-साहेबाचा बदली, होवून मेघफासन-सा-

हें याजकडून कलकत्त्याहून लखनऊस आला आहे म्हणून वर्तमान आहे. पुढें विशेष वर्तमान ऐकिल्यास विनंति लिहूं. बहुत काय लिहिणें ? कृपा केली पाहिजे. हे विनंति.

---

श्री.

## लेखांक ३८.

१७०६ आषाढ वद्य ११.

पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीः—

विनंति ऐसीजेः—महाराव निंबाळकर याची स्त्री आनंदीबाई राजश्री पाटीलबावाची वहीण याजसमागमें नवाब निजाम—अली-खान यांजला खिलत, वस्त्रें सात, पारचे, व हत्ती—घोडा, व मोत्याची माळ व शिरपेंच व झगा बमय परगीरी व तरवार व ढाल येणेंप्रमाणें पातशाकडून राजश्री पाटीलबावांनीं रवाना केलें आहे. स्वामीस श्रुत [illegible]. बहुत काय लिहिणें ? कृपा केली पा॥. हे विनंति.

---

श्री.

## लेखांक ३९.

१७०६ आषाढ वद्य ११.

पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामीचे सेवेसीः—

विनंति ऐसीजेः—येथील मकार तरीः हिंदुस्थान निःक्षत्री जालें. शीख आहेत त्यांत फूट आहे. कोणी कोणाचे स्वाधीन नाहीं. दबाव पडल्यास जमीदारी करावयासही लागतील. जेर—जबरदस्तीनें पे॥ तरी लुटीत फिरत आहेत. हें शिखाचें वर्तमान आहे. वजिराचा मकार म्हणावा तर इंग्रजांवर त्याची दौलत आहे. त्यास सावंत इंग्रजांचा मकार हलका दिसतो. हिष्टिन विलाइतीस गेला. त्याचे बदली नवे आहेत म्हणोन आले आहेत. याचा बंदोबस्त हिष्टिनाप्रमाणें नाहीं. वस्त नेकदी पूर्ववत्प्रमाणें नाहीं. परंतु पहिली फरपट चालत आली आहे त्याजप्रमाणें कारभार चालतो. व पातशहाचा मकार म्हणावा तरी, येक लाख तीस हजार रु॥ दरमहाचा चाकर आहे. तितका पैका अक्षत मरीट मिळाला म्हणजे त्यास एका गांवासीं व बिघाभर जमिनीसीं गरज नाहीं. याप्रमाणें हिंदुस्थानची अवस्था आहे. त्यास, अवघे हिंदुस्थानचे बंदोबस्ताचा बोझ येकल्या राजश्री पाटीलबावावर आहे. जितका बंदोबस्त यांचे जिवेंकरून नीतीनें करणें तो केला आहे व करावयाचा तो करितात. परंतु यांचे पदरीं कोणी मनुष्य नाहीं कीं, यांचे सरदारीचा सरदारांतून मुलकी बंदोबस्त करून, पैका उत्पन्न करून, दौलत सांभाळी ऐसा मनुष्य नाहीं. याजकरितां स्वामीस सूचनार्थ विनंति लि॥ आहे. जो मकार दृष्टीनें पाहिला आणि प्रतियास आला, तो जाणोन विनंति लिहिली आहे. पुढें उत्तम जाणतील ते करणार स्वामी समर्थ आहेत. बहुत काय लि॥ ? कृपा केली पा॥. हे विनंति.

---

श्री.

## लेखांक ४०.

१७०६ आषाढ वद्य ११.

पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामीचे सेवेसीः—

विनंति ऐसीजेः—राजश्री कृष्णराव गोविंद यांचे पुत्राकडे [illegible] कारभार होता. तो त्याजकडून काढून राजश्री म-[illegible] [illegible] [illegible] [illegible] [illegible] [illegible] भार सांगितला. त्यास हत्ती, घोडा, शि-

पेंच, गांव, वस्त्रें, येणेंप्रों देऊन सन्मान करून, बिदा केलें आहे. परंतु कागदापत्राचा बंदोबस्त होणें ह्मणून राहिले आहेत. आठा पंधरा रोजांनीं जाणार. बुंदी, कोटे, उदेपूर, ऐशा तीही संस्थानच्या मामलती व चवथाईचे अमलाचा मामला मारनिलेकडेस करार जाली. मागील हिशेबाचे कांहीं फडशे जाले. कांहीं शेष बाकी फडशा होणें आहे तो करून जाणार. व रामगडाकडे रायाजी पा॥ फौजसुद्धां गेले आहेत, त्यांनीं कोळेचे शहरांत ठाणें बसविलें. तेथें दोन पलटणें, चाळीस तोफा होत्या त्यापों एक पलटणवाला फुटून याजकडे जाबसाल लाविला. त्याची खातरजमा रायाजी पा॥ याणीं केली. त्यामें कोळेचे दोन दरवाजे उघडून दिल्हे. त्या मार्गे याजकडील फौज व पलटणें आंत शिरून, एका पलटणासी लढाई होवून, याजकडील जखमी व जाया च्यारसें माणूस जालें. पलटण पळून गेलें. चाळीस तोफा वगैरे सरंजाम सरकारांत आला. मौजे कोळे येथील ठाण्याचा बंदोबस्त करून, रामगडास घेरा घालून, रायाजी पा॥ आहेत. कांहीं कांहीं दिवसा रामगड खालीं होईल. आंत जमादार व पळटणवाले आहेत, त्यांत फूट आहे. त्याजकडीलही बोलणीं लागलीं आहेत. प्रत्ययास येऊन गड खालीं जालियावर विनंति लिहूं. बहुत काय लिहिणें ? कृपा केली पाहिजे. हे विनंति.

---

श्री.

## लेखांक ४१.

१७०६ आषाढ वद्य ११.

पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामीचे सेवेसीं:—

विनंति ऐसीजे: मोहरसिंग शीख यांस रावराजा प्रतापसिंग मुजबर तनखा करून पत्रें दिधलीं आहेत कीं, पावणे तीन लक्ष रुपयांचे प्रगणे जेपूरपैकीं लावून देणें. म्हणून पत्रें लिहून देऊन करारमदार जाला कीं, पातशाही खालशाचा मुलूक आहे त्यांत धामधूम करूं नये. व राखी घेऊन ठेवलेंप्रों वर्तणूक करून जेपूरचे महालीं रावराजाकडील देईल तो ऐवज घेऊन स्वस्थ असावें. सरकारचा अंमल सरहिंदेकडे जाईल त्या समई पांचा हजारा स्वारांनसीं समागमें असावें. तिकडील मुलूक सुटेल त्याप्रों दहा लक्षांची जागा आणिक लावून देऊं. म्हणून करारमदार होवून, त्यास वस्त्रें देऊन, बिदा केलें. त्यास मोहोरसिंग व कुज्यारसिंग हे दोघेजण लष्करास असतां, याप्रों बोलणें बोलत असतां, व सरंजाम लावूं देणें व दिल्हा ऐसें असोन, यांचें निसबतीचे शीख अंतर्वेदींत मेरटेकडे जाऊन दर रुपयास दोन आणे येणेंप्रों तमाम अंतर्वेदींत तहशील केली व करितात. याप्रों वर्तमान आहे. मुलूक मोठा. कारभार मोठा. परंतु अद्यापि खातरखा बंदोबस्त नाहीं. प्रत्ययास आलियावर विनंति लिहूं. बहुत काय लिहिणें ? कृपा केली पाहिजे. हे विनंति.

---

श्री.

## लेखांक ४२.

१७०६ आषाढ वद्य ११.

पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामीचे सेवेसीं:—

विनंति ऐसीजे: बाबाराव नामें गृहस्थ नवाब निजाम अलीखान यांजकडून राजश्री पाटीलबावाकडे वकिलातीस आले आहेत. यांचें कारण कीं, हैदराव

पलीकडे सरहदेस कांहीं नवाबाचे परगणे आहेत ते इंग्रजांनीं पूर्वीं इजारा करून घेतले होते. त्याचा पैका प्रथम दिल्हा, आतां देत नाहींत. हिशेब करितां येक करोड सवा लक्ष रुो इंग्रजांकडून नवाबाचे निघतात. त्यास, इंग्रजाचा सलूक श्रीमंतासी राजश्री पाटील यांचे विद्यमानें जाहला आहे, यांचा इंग्रजाचा स्नेह आहे. ह्मणून याजकडे आपला गृहस्थ जाबसालास पाठविला आहे कीं, याचे हातून कांहीं सामदामानें इंग्रजाकडून ऐवज पदरीं पडला तर उगवून घ्यावा. म्हणून याजकडेस पाठविला आहे. त्यास, राजश्री पाटीलबावानीं इंद्रसेनासी बोलून आपलीं पत्रें व इंद्रसेनाचीं पत्रें कलकत्यास पाठविलीं आहेत. तेथून अद्यापि जाबसाल आला नाहीं. म्हणून बाबाराव रा पाटीलबावापासींच आहेत. त्यास, यासी व नवाब निजाम अलीखान यासी स्नेहवृद्धि व्हावी म्हणून हत्ती एक व घोडा एक मोत्याची माल व झगा, सिरपेंच, किन. । साहा व शालजोडच्या ६ व तरदाम बंगाली थान ६ व फुलचरी बदामी थान ६ व तीन हजार रुो नख्त दिल्हे कीं, बऱ्हाणपुरीहून शेला पागोटीं कच्च्या रंगाचीं बऱ्हाणपुरीं घेऊन जावीं. म्हणून कारकुनास आज्ञा. नवाबाकडील मुखत्यार कारभारी यास घोडा येक व किनखाप ४ व शालजोडच्या ४ व तरदाम ४ व फुलचरी ४ व मोत्याची कंठी व झगा, शिरपेंच येणेंप्रों सरंजाम आपला कारकून समागमें देऊन रवाना केला. व याची बहीण आनंदीबाई महाराव निंबाळकर यांस दिल्ही होती, ते याचे भेटीस आली होती. तीस या प्रांतीं पन्नास हजार रुो कर्ज जालें. त्यास ते याची आज्ञा घेऊन मागारा जाऊं लागली. ते समईं पन्नास हजार रुपये सावकाराचे वारून, पंचवीस हजार रुपये मार्गी खर्चास देऊन विदा केली. ते ग्वाल्हेरीसमीप जाऊन मृत्य पावली. तिच्या नातीं दोघी मुली समागमें होत्या व सरंजाम सुखरूप देशीं कऱ्हाणरावकडे याजपाशीं जाऊन पोहचावा ह्मणून येथून कारकून विदा केला आहे. तो पावता करील. बहुत काय लिहिणें ? कृपा केली पाहिजे. हे विनंति.

---

## लेखांक ४३.

१७०६ मार्गशीर्ष शुद्ध ११.

श्रीमंत राजश्री नाना स्वामीचे सेवेसीः—

विनंति सेवक शंकराजी सखदेव कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना येथील कुशल ता॥ छ ९ माहे मोहरम जाणून स्वानंद-लेखन-आज्ञा केली पाहिजे. विशेष. स्वामींनीं कृपा करून छ २६ जिल्कादचें पत्र पाठविलें तें पावलें. शिरसा वंदून सनाथ जालों. इकडील वृत्त पेशजी छ १९ व छ २१ जिल्हेजचीं विनंतिपत्रें पाठविलीं आहेत ते पावून सविस्तर श्रुत जालेंच असेल. हालीं वर्तमान बारीक गोष्टी आमचे ध्यानास आली ती विनंति लिहिली आहे त्याजवरून स्वामीस रूढ होईल. येथील देणें राजश्री पुरुषोत्तमपंत नाना यांचे हातचें याचा प्रकार पूर्वीं दोन च्यार वेळां विनंति लिहिली होतीच. राजश्री देवराव—तात्यास राजश्री गोविंदरावानीं लिहिलेंच आहे. त्यास तेच पत्र वजिन्नस आपणास मुखसिद्धीद लिहा विनंति करितील, त्याजवरून श्रुत होईल. कृपा करणार स्वामी समर्थ आहेत. बहुत काय लिहिणें ? कृपा केली पाहिजे. विज्ञापना.

---

श्री.

## लेखांक ४४.

१७०६ मार्गशीर्ष शुद्ध ११.

श्रीमंत राजश्री नाना स्वामीचे सेवेसीः—

पो गोविंदराव पुरुषोत्तम कृतानेक सां नमस्कार विनंति येथील कुशल ता। छ ९ माहे मोहरम जाणोन स्वानंद—लेखनाज्ञा केली पो. विशेष.आपण छ २६ जिलकादचें आज्ञापत्र पाठविलें तें छ ३० जिल्हेजीं पावोन सनाथ जहालों. पत्रीं आज्ञा कीं, पातशहा अग्रियास दाखल जहालेच आहेत, तेथून पुढें गेले किंवा तेथेंच आहेत तें ल्याहावें, व राजश्री महादजी शिंदे यांच्या व पातशहाच्या भेटी कधीं होणार, शिंद्यास येथून वरचेवर लिहीत जात असतात, तुह्मींही होईल ते मजकूर मारनिल्हेस वरचेवर सुचवीत जावें, ह्मणून पत्रीं आज्ञा. त्यास,आज्ञेप्रों विशेष वृत्त आढळल्यास पाा- बावास लिहितों व श्रुत करीत असतों. इकडील बारीक—मोठें वृत्त छ १९ व छ २१ माहे जिल्हेजीं पै दरपै विनंतिपत्रें पाा तीं पावलीं असतील. त्यावरून श्रुत जालेंच असेल. हालीं वर्तमान तर महमद बेग हामदानी यास आणून कैद केलें आहे. त्याचा असबाब तोफा पंचावन्न व हत्ती बारा १२ वगैरे सरंजाम होता त्याप्रों कांहीं राजश्री पााबावानीं आपले सरकारांत घेतला. कांहीं हिंमतबहादुर याजकडील तोफा महमदबेगानें पेशर्जी लुटून नेल्या होत्या त्या त्यास दिधल्या. राहिला सरंजाम : अफराशाहाबखान याचा घरचा आहे. त्याजपासून कांहीं पैका घेणें. त्याणीं राजश्री पााबावाशीं करारमदार केला आहे कीं, आमची सरदारी आह्माकडे असावी. त्यावरून करारमदार करून त्याचे पुत्रास सरदारी करार केली आहे. त्याचें नांव हुसेनुद्दोला बाहादूर. महमद-हुसेनखान गालबज्यंग ह्मणून किताब देऊन वस्त्रें मातम पुरसीचीं व पैका आणावयास अलिगडास माणसें पाा आहेत. व तो मूल तीन वर्षांचा आहे, त्यासही लस्करांत बोलाविलें आहे. व मोगली वगैरे सरदार यास हिंमतबहादर आणि नारायणदास याणीं जाबसाल लाविला आहे कीं,तुह्मी बहुता दिवसांपासून सरंजाम खातां, आतां कांहीं पैक्याची तुह्मींही कुमक करावी, म्हणून महमदबेगसुद्धां जितके सरदार मोगली वगैरे आहेत त्यांस तगादा आहे. त्यांचे लष्करचे असल्यास राा पाटीलबावांचीं पलटणें व फौजेचा चौका आहे, तेही पासीं आहेत. हिंदुस्थानचे यवनाच्यासिवाय पातशाहात शांत जहाली ! कांहीं त्यांत जीव राहिला नाहीं ! पातशहाची मर्जी सर्व प्रकारें राजश्री पाटीलबावाकडे मुतवजे आहे. छ ४ तारखेस पातशहासी व राजश्री पाटीलबावासी खलबत जालें. पातशहानीं आज्ञा केली कीं,तुह्मी आमचे घरची मुख्त्यारी कबूल करा. याणीं उत्तर दिल्हे कीं, ताजियाचे दिवस आहेत, गेलियावर विनंति करीन. म्हणून बोलून आपले डेरियास आले. पुढें अंमलांत येईल ते विनंति लिहूं. बहुत काय लिहिणें ? कृपा केली पाहिजे. हे विनंति.

---

श्री.

## लेखांक ४५.

१७०६ मार्गशीर्ष शुद्ध ११.

पु। ।श्रीमंत राजश्री नाना स्वामीचे सेवेसीः—

विनंति ऐसीजेः— नवाब अफराशाहाबखान मारला गेला त्याचा आरोप जैनूज

अहदीखान याजकडे आला. त्यावरून त्यास कैद करून, गाढवावर बसवून, तोंड काळें करून, लस्कराचे आसपास फिरवून, भीक मागवून, कैद करून, ग्वाल्हेरीस पाठवितील. दुसरें खुशालराम वकील राजे जेनगरकर याचा लष्करांत होता तो पेशजी रावराजा प्रतापसिंग याचे दुंचाल्याची दिवाणागिरी मुखत्यारी करून होता. अलीकडे नजबखानासी मिळून मागें रावराज्यास लुटविलें होतें म्हणून त्याची व याची आकस होती. त्यास एका ×× यानें मारून टाकिलें तो ×××× व राजा प्रतापसिंग याचे दुमेवर आला त्याजवरून त्याचे लस्करावर दोन हजार फौजेची चौकी राजश्री पाटीलबावानीं पाठविली आहे. पुढें जें ठरेल तें विनंति लिहूं. तात्पर्य; पैका मेळावयाचे दिवस आहेत. श्रीमंत राजश्री पंत-प्रधान-साहेब दैववान आहेत कीं, त्यांचे प्रतापें यश सेवक लोकांस यत्न न करतां येतें. ईश्वर त्यास सलामत बेसलामत राखो आणि दिवसेंदिवस अधिक प्रताप होवोत. बहुत काय लिहिणें ? कृपा केली पाहिजे. हे विनंति.

---

श्री.

## लेखांक ४६.

१७०६ मार्गशीर्ष शुद्ध ११.

गु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामीचे सेवेसीः—

विनंति ऐसीजे: छ २६ माहे जिल्हेजी पातशाहा आग्रियाहून कुच करून शिक्क कित्ती दर-गाजात भरती करून, मीगे फत्तेपूरसमीप लस्कर अकबरशाहादाबलान यांचे होतें तेथें दाखल जाले. राजश्री पाटीलबावा भरतपुराचेनजीक होते, तेथून कुच करून पातशहाचे लस्करासमीप आठ कोसांवर येऊन मुक्काम केला. छ २९ रोजी मिरजा अकबरशाहा यास पातशहानीं नबाब वझीरमखानास समागमें देऊन सामोरा पा' राजश्री पाटीलबावानीं आपले लस्कराबाहेर डेरा उभा केला होता तेथें अकबरशाहास बसविलें. एक हत्ती, एक घोडा, सात किरमिजी पोशाक वस्त्रें, व एक शिरपेच जवाहीर व एकशें एक मोहोरा नजर व हमराही सरदार राजश्री कृष्णाजी पवार वगैरे याणीं माफक मरातब नजरा देऊन, त्याजसमागमें पातशहापाशीं येऊन, पातशहाची मुलाजमत जहाली. पायावर डोई ठेवून एकशें एक मोहोर नजर केली. पातशहाजाद्यास पांच मोहरा नजर केल्या. याजसमागमील सरदार कृष्णाजी पवार आदिकरून किरकोळी होते, त्याणीं माफक मरातब अवघ्यांनीं नजरा केल्या. राजश्री पाटीलबावा यांचे पाठीवर पातशहानीं बहुत ममता-पुरस्कर हात ठेवून आज्ञा केली कीं, तुम्ही उरबरा बसा. त्याजवर राजश्री पाटीलबावा बसले. पातशहानीं पारच्या खिलत, जगा बमय, परगिरी व शिरपेंच व मोत्यांची कंठी व हत्ती, घोडा, तरवार, ढाल, येणेंप्रों सन्मान केला. हमराही कृष्णाजी पवार वगैरे सरदार होते त्यास खिलत पांच पान पारच्याचे, बमय, शिरपेंच व जगे सुध्दां सुमार खिलत ५० पन्नास व दुशाले सुमारें दोनशें व मोहरदार दोनशें व येणेंप्रों तरवारीही कपडे पवार व वर्षे देऊन, सन्मान करून, दोन घटका पातशहासीं एकांत करून, रुखसत होऊन, आपले डेरियास आऊन, पातशाचे अंदरूना व अकबरशहादयाचे खर्चाचा बंदोबस्त आपली पहिलें प्रमाणें केला. शिवाय पाटीलबावाचे दरमहाशिवाय देऊन तिकडे आहे पाहत नाहीं. पातशहाचे

लष्करचे लोक अफराशहाबखानाचे लस्करांत कोणी जाऊं पावत नाहीं. याप्रों बंदोबस्त करून पैका कराराप्रों आणवण्याचा तगादा आहे. पुढें पातशहाचे विच्यारें राजश्री पाटीलबावा मसलत ठरवितील ते विनंति लिहूं. बहुत काय लिहिणें ? कृपा केली पो हे विनंति.

---

श्री.

## लेखांक ४७.

१७०६ मार्गशीर्ष शुद्ध ११.

पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामीचे सेवेसीः—

विनंति ऐसीजेः छ ३ मिनहूस पातशहा, अफराशाबखान याचे लस्करांतून कूच करून अंबाजी इंगळे याचे व पाटीलबावांचे लस्कराचेमधें जाऊन मुक्काम केला. डेरियास दाखल जाले त्यासमयीं राजश्री पाटीलबावांनीं एकवीस मोहरा नजर केल्या. पाटीलबावांचे लस्करांत पातशहा दाखल जाले. हिंदुस्थानी लस्कर दरोबस्त एकीकडे आहे. पाटीलबावा, पातशहा, अंबाजी इंगळे ऐसे एकीकडे आहेत. या नक्षानें मुक्काम करून आहेत. च्यारशे तोफा व दहा हजार स्वार व तीस पलटणें एकूण चाळीस हजार स्वार प्यादा, विना तलवार पादाक्रांत होवून जैसी पाण्यांत माती पडून विरून जाती त्याप्रों यवनाचे फौजेची अवस्था जाली आहे. कोणी कोणांत मिळत नाहींत, याप्रमाणें जालें. पुढें अमलांत येईल ते विनंती लिहूं. बहुत काय लिहिणें ? कृपा केली पाहिजे. हे विनंति.

---

श्री.

## लेखांक ४८.

१७०६ मार्गशीर्ष शुद्ध ११.

पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामीचे सेवेसीः—

विनंति ऐसीजेः—इष्टिन साहेब इंग्रेज पातशाहाजाद्यास घेऊन श्रीकाशीस गेले, हें वर्तमान विलायतेस कंपनीनें ऐकून इष्टिनास पत्र लिहिलें कीं, तुह्मी हिंदुस्थानचे पातशाहाजादा समागमें घेऊन येतां, त्यास तुमचा काय इरादा आहे ते लिहून पाठविणें, एकतर दक्षणी सरदारांचा आमचा सलुक जाला आहे आणि त्यांचे मर्जीशिवाय त्यांसी बदसलूकी करून पातशहाजाद्यास विना त्यांची मर्जी घेऊन आला हें ठीक नाहीं, तर देखत—पत्र पातशहाजाद्यास माघारा रा॥ पाटीलबावापासीं बिदा करणें, ते पातशहास विनंति करून पातशाहाजाद्याची तकसीर माफ करून त्याचे स्वाधीन करितील, तुह्मी या बखेड्यांत न पडणें. म्हणून लिहिलें होतें. त्याजवरून इष्टिन इंग्रेज यानें पातशाहाजाद्यास समागमें दोन पलटणें देऊन, रा॥ सदाशिवपंत बक्षी रा॥ पाटीलबावाकडील याजसमागमें बिदा केलें. ते लखनऊस आले आहेत. पुढें लस्करांत दाखल जालियावर विनंति लिहूं. बहुत काय लिहिणें ? कृपा केली पाहिजे. हे विनंति.

---

श्री.

## लेखांक ४९.

१७०७ अधिक चैत्र वद्य ५.

पै॥ छ २० जमादिलाखर सन खमस समासीन.

श्रीमंत राजश्री पंतप्रधान स्वामीचे सेवेसीः—

विनंति सेवक गोविंदराव पुरुषोत्तम कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. येथील कुशल तागाइत छ १९ जमादिलावल स्वामीचे कृपावलोकनें करून येथास्थित असे. विशेष. पेशजीं छ १७ रबिलाखरीं विनंतिपत्रें पाठविलीं आहेत. ते पावून सविस्तर वृत्त श्रुत जालेंच असेल. हाली अग्रियाचे किल्यांत सरकारचा अंमल जाला वगैरे इकडील वर्तमान विस्तारें राजश्री नानांचे पत्रीं लिहिलें आहे, त्यावरून ध्यानास येईल. कृपा करणार धणी समर्थ आहेत. बहुत काय लिहिणें ? कृपा केली पाहिजे. हे विज्ञप्ति.

---

श्री.

## लेखांक ५०.

१७०७ अधिक चैत्र वद्य ५.

श्रीमंत राजश्री नाना स्वामीचे सेवेसीः—

पो गोविंदराव पुरुषोत्तम कृतानेक सा नमस्कार विनंति येथील कुशल ता छ १९ रावल जाणून स्वानंदलेखन—आज्ञा करीत गेले पो. विशेष. इकडील वर्तमान पेशजी छ १७ राखरीं विनंतिपत्रें पाठविलीं तीं पाऊन विस्तारवृत्त कळलेंच असेल. हाली वर्तमान तरी, एकगास जाला, राजश्री पाटीलबावांनीं रायाजी पा यास आग्रियाचा किल्ला घ्यावा, ह्मणून डिगेचे मुकामीहून रवाना केलें होतें. त्यास, हे अग्रियास जाऊन, अंमल करून, किल्यास, मोर्चे लाविले होते. त्यास, छ ११ मिनहु-पावेतों किल्ला झुंजला. निदान भवानसिंग वगैरे पलटणवाले व गोलंदाज किल्यांत होते ते फोडून छ १२ मिनहूस येऊन रायाजी पाटील यांस भेटून मागील तलब द्यावी आणि पुढें आमचे भायचंदीचा बंदोबस्त करून द्यावा ह्मणोन बोलोन, परस्पर वचन प्रमाण होवून, छ १५ मेनहूस आग्रियाचे किल्यांत राजश्री पाटीलबावाकडून रा धलपतराव ब्राह्मण गृहस्थ दाखल जाला. सुज्यादीनखान याजकडील आपला लोक सर्व किल्याबाहेर निघोन जुमामहजदीपाशीं येऊन डेरा केला आहे. किल्यांत राजश्री पाटीलबावाकडील बंदोबस्त जाला. व सुज्यादीनखानाच्याही भेटीचा ठराव राणेखानभाई व रायाजी पा यांचे विा ठरलें आहे कीं, मारनिल्हेसही भयदाम लावून देऊन त्याचेही चालवावें, ह्मणोन ठरलें आहे. पुढें एक विच्यार आहे कीं, श्रीयमुना उतरून प्रातःकाळीं समीप रामगड, अलीकडे नजबखानानें अलिगड ह्मणोन नांव ठेविलें आहे, तेथें जाऊन, तोही किल्ला खाली करून, आपला अंमल करून, पातशाहासुद्धां दिलीस जावें. हा येक विच्यार आहे. परंतु पातशाहा दिलीस जावयाची जलदी बहुत करितात. याज-करितां दुसरा विच्यार आहे कीं, अलिगडाकडे येक सर्दार मातबर व फौज पलटण समागमें देऊन त्यास तिकडे रवाना करावें व पातशाहासहित आपण दिलीस जावें. असे दोन विच्यार ठरले आहेत. पुढें मनास येईल तो विच्यार लिहूं. [illegible]— मोठें वर्तमान राज्याच्या कामाच्या [illegible] पातशाहाच्या दरबारच्या व राजश्री पाटीलबावाच्या व वजिराचे दरबारच्या व कलकत्याकडील वर्तमान सविस्तर फारसी कागदांवरून कळेल. बहुत काय लिहिणें ? कृपा केली पाहिजे. हे विनंती.

---

श्री.

## लेखांक ५१.

१७०७ आषाढ वद्य ९.

पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामीचे सेवेसीः—

विनंतिपत्रीं आज्ञा कीः—तयमूरशाहा अबदालीकडील राजकारण मोठें आहे. याजकरितां तुह्मी सिलसीला लावून ठेवणें. उपयोगी पडेल. ह्मणून आज्ञा. त्यास, श्रीमंत स्वामीचे अर्जी आली ते स्वामीनीं आपलें पत्र व सरकारचें पत्र खलिते गुलाम महमदखान यास जाब पाठविले होते ते त्यांस दिल्हे. व आह्मीही आपली अर्जी त्याकडून पहिले तीर्थरूपांचे नांवें पत्रें आलीं होती दोन, त्यांचे जाब लिहून देऊन रवाना केलीं आहेत. उत्तरें आलियावर सेवेसी पाठवून देऊं. या दिवसांत तयमूरशाहाकडील वकील पातशहापासी स्नेह शिष्टाचार करावयास व येथील यांचे दौलतीचा रंग पहावयास तेथून रवाना केला आहे. तो अद्यापि दिल्लीस आला नाहीं. पुढल्यासालीं त्यांचे मानस दिल्लीकडे स्वारी करावयाचें आहे, ह्मणून श्रवणांत आलें. ते विनंति लिहिली आहे. बहुत काय लिहिणें ? कृपा केली पाहिजे. हे विनंति.

---

श्री.

## लेखांक ५२.

१७०७ आषाढ वद्य ९.

विज्ञापना. कुवरसेनाचीं पत्रें येथें नजबखानाकडे बातमीचीं पाठविलीं होतीं ते बजिनस सेवेसी पाठविलीं आहेत. पाहून मर्जीस येईल त्याप्राणें बंदोबस्त करावा. हे विज्ञापना.

---

श्री.

## लेखांक ५३.

१७०७ आषाढ वद्य ९.

श्रीमंत राजश्री पंतप्रधान स्वामीचे सेवेसीः—

विनंति सेवक गोविंदराव पुरुषोत्तम कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना येथील कुशल तागाईत छ २३ माहे रमजान मुकाम श्रीमथुरा जाणून स्वानंदलेखनाज्ञा केली पाहिजे. विशेष. इकडील वर्तमान पेशजी छ २३ माहे साबानीं विनंतिपत्रें पाठविलीं होतीं ते पावून सविस्तर वृत्त श्रुत जालेंच असेल. हालीं इकडील बारीकमोठें वर्तमान राजश्री नानांचे पत्रीं विनंति लिहिली आहे त्यावरून ध्यानारूढ होईल. कृपा करणार धनी समर्थ. बहुत काय लिहिणें ? कृपा केली पाहिजे. हे विज्ञप्ति.

पौ छ२जिल्हेज सन सीत आश्विन मास.

---

श्री.

## लेखांक ५४.

१७०७ आषाढ वद्य ११

विज्ञापना ऐसीजे. राजश्री पाटीलबावा यांचे मोठे मोहरेची अलकाब, वकील मुतलखुमददूल—उमराव व मुतगरुल—मुमालिक फरजंद अलीज्याहा महाराज्याधिराज माधवराव सिंदे श्रीनाथ बाहादूर मनसुर जमा फीदवीशहा—अलम पातशाहा गाजी, येणेंप्रमाणें मोठी मोहर आहे. दस्ती मोहर लाहान, वकील मुतालख आलिज्याहा श्रीनाथ महाराज माधवराव सिंदे बाहादूर, येणेंप्रमाणें आहे.

---

### लेखांक ५५.

दिवसांत आसफद्दौला वजीर यांस इंग्रजानीं उत्तर दिधलें कीं, आमच्यानें तुमचा मुलूक राखवत नाहीं, तुह्मीं आपली खबरदारी करून घेणें. त्यावरून वजिरांचे येथें फौजेची निगादास्त हिंदुस्थानी लोकांची कमपेश आहे. श्रीकृपेनें राजश्री माहादजी सिंदे यांनीं ग्वालेरचें इंग्रेजाचें पारपत्य करून इटाव्याकडे किंवा कालपीकडे अंतरवेदींत उतरले तर तमाम अंतरवेद् सगळी आहे. नजबखानाचे काबूत पातशाहा. व नजबखान आजपावेतों शपथपूर्वक ह्मणतो कीं सीखाचे जुंजाचा फैसला जाला ह्मणजे आह्मीं राजश्री माहादजी सिंदे यांचे सामील होतों. इंग्रजासी जुंजास नमूद होत नाहींत. सरकारची जरब भारी जालियावर ताबेदारी करितील. इंग्रजांस अतिशय भितात. व पूर्वीं स्वामीस पत्रें लिहिलीं व सेवकाकडून सेवेसीं लिहविलें तैसींच बोलणीं आहेत. अं- ..... येत नाहीं. पुढें होईल तें लिहूं. कृपा कली पाहिजे. हे विनंती.

---

### लेखांक ५६.

खान याजसमागमें गेले आहेत. तिकडून सीखही भारी जमावानीसीं मुकाबल्यास आले आहेत. नित्यानीं गोळा-गोळीनें जुंज होतें. परंतु सीखाचा गलबा भारी जाणोन, याजपासीं दिल्लींत फोज व पलटणें व तोफखाना आहे त्यांतून आणिक सरंजाम त्याकडे स्वार व पलटणें रा करितात. आह्मी नित्यानीं इंग्रजाचे बाहेर निघण्याविसीं तगादा करितों. त्यास उत्तर देतात कीं, सीखासी जुंज लागलें, आतां त्यासी दबून सलूक करावा तर सलतनतेची आबरू रहात नाहीं, जर त्यासी सलूक न करावा तर तुह्मासी बोलत गेलों व श्रीमंतांस लिहीत गेलों या गोष्टींत अप्रामाणिकता येते, या अर्थीं राहिली साहिली हुजूरची फौज तेही सिखावर पाठवून सरहद्दपर्यंत मुलूख हस्तगत करून तिकडील खातरजमा जाली ह्मणजे पातशाहासहीत अंतरवेदींत उतरतो. ह्मणून घातुपेपणाच्या गोष्टी मात्र बोलून आमचें समाधान करितात. परंतु अंमलांत येईल तेव्हां खरें.वरकड मार पुरवणीपत्रावरून श्रुत होईल. कृपा केली पाहिजे. हे विनंति.

---

### लेखांक ५७.

कीं राहिले ते कीं तुम्हास यावे, आह्मास दुसरे गांव यावयासी व पेवजही देणें घगत नाहीं. आपले गांव सरकारांतून करार करून घेणें यापोही स्पष्ट उत्तर दिल्हें तेव्हां आमचे परातीस कोठेही ठिकाण नाहीं. याजकरितां हुजूर विनंती लि॥ आहे, कीं पाटीलबावाचे सनदेंत गांव वजा करून हुजूरची सनद आणेचे नांवें पाठवून द्यावी.

गांवाची जमा सी॥

३१५० तालुके वापड जमा गांव दोन.

 ३००० मौजे आष्टि जमा.

 १५० मौजे निंबोडी.

 ———

 ३१५०

२५० पो गांव दोन जमा

 २०० मौजे नारोळी जमा मुनगांवे आमलांत

 ५० मौजे खरे हाली जमा गो

 ———

 २५०

---

## लेखांक ५८.

श्रीगणराज.

सेवेसी विनंति. चिरंजीव गोविंदराव पुरुषोत्तम याचे लग्नाचे निश्चयांत आणिलें. प्रसंग महगेता व वोढीचा प्रकार, याची सीमाच जाली. आजपर्यंत सर्व आबरु स्वामीकृपेनें राहिली. पुढेंही स्वामीचा वरद्‌हस्त मस्तकीं आहे.तेणेंकडून सर्व पार पाडणार स्वामी समर्थ. दो चौ रोजां आज्ञा घेऊन जावें. सोबत व पहिले देणें येथें थोडेंबहुत त्यांनीं या दिवसांत उचल बहुतच आरंभिली आहे. त्यास कांहीं ताकीद होऊन आहेत. साह्यता वडावी व मर्जीस आल्यास सरकारांतून लग्नासंबंधीं कांहीं कुमक बक्षीस अथवा फाजील पैकीं जाल्यास सर्वांत भूषण व समई योग आहे. मर्जीहून प्रसंग असल्यास स्वामी कृपा करतील, ही खातरजमा आहे. सेवकास अन्य उपार्जना नाहीं. स्वामी कृपेनें सर्व प्रकारें संरक्षण जालें व आबरु राहिली. यत्किंचित आयुष्य तेंही पार पाडणार स्वामीच आहेत. श्रुत होय, हे विनंति. उत्तरी आज्ञा व्हावी, हे विनंति.

---

श्री.

## लेखांक ५९.

(मुख्य मुद्रा.)

१६३० आषाढ वद्य ५.

स्वस्तिश्री राज्याभिषेक-शके ३५ सर्वधारी संवत्सरे आषाढ बहुल पंचमी, रविवासरे क्षत्रिय कुळावतंस श्रीराजा शाहू छत्रपति स्वामी यांणीं रा बापूजी सोनाजी परभू उपनाम दिघे ( शिक्का पेशवे ) देशकुलकर्णी व गांवकुलकर्णी ता। मुठेंखोरें, सुभा प्रांत मावळ, यांसी इनामपत्र दिल्हें ऐसें जेः- स्वामी परराष्ट्रांतून स्वराज्यांत आले त्या प्रसंगीं तुह्मी राजश्री परसोजी भोंसले याची जमी-निसी करून असतां त्याचे तर्फेनें स्वामीचे दर्शनास येऊन लांबकानीचे मुकामीं दर्शन घेतलें. स्वामीचे आज्ञेवरून राजश्री परसोजी भोंसले यांस फौजेनिसीं स्वामीचे दर्शनास आणिलें. ते प्रसंगीं तुह्मीं सेवा बहुत एकनिष्ठेनें केली व पुढेंही निष्ठेनें वर्तणूक करतां. तुमचें ऊर्जित करून वंशपरंपरें चालवणें, हें स्वामीस अवश्यक. याजकरितां तुम्हीं विनंति केली कीं, आपण स्वामीच्या राज्यांतील वतनदार सेवक आहों, जें ऊर्जित कर्णे तें वतनसमंधावरी केलियानें परंपरागत चालेल. त्यावरून स्वामी तुम्हांवरी कृपाळू होऊन नूतन इनाम देहे ता। मुठेंखोरें पै।। २

मौजे भवळी १ मौजे टेमघर १

ऐसीं, दोनीं गांवें इनाम कुलबाब, कुलकानू, खेरीज हक्कदार व इनामदार करून, चतुः-सीमा भूमि पूर्व-मर्यादेप्रमाणें देखील जल,तरु, पाषाण,झाड-झाडोरा, निधि-निक्षेपसहित, इनाम आजरामरामत करून दिल्हा असे. तरी सदरहू दोहीं गांवचा इनाम-उपभोग तुह्मीं व तुमचे बापभाऊ जनाजीराम देशकुलकर्णी खोत पुत्रपौत्रादि-वंशपरंपरेनें अनभऊन सुखरूप असणें. स्वामी व स्वामीचे वंशपरंपरेनें तुह्मांस दोनी गांव चालवितील. जाणिजे. निदेश समक्ष.

(मोर्तब.) बार. सुरुसूद बार.

अस्सलपत्र जोडवंद आहेत मोर्तब सुमार २ तेरीख छ १९ रबिलाखर,सु॥ तिसा म.

श्री.

## लेखांक ६०.

१६४१ आषाढ शुद्ध ५.

स्वस्तिश्री राज्याभिषेक–शके ४६ विकारी संवत्सरे आषाढ शुद्ध ५ पंचमी गुरुवासर. क्षत्रियकुलावतंस श्रीराजा शाहू छत्रपति स्वामी याणीं तपोनिधी वल्लभगीर गोसावी यांसि:– दिल्हें इनामपत्र ऐसी जे

शिक्का शिक्का

तुह्मी हरिभक्तपरायण तपोनिधि तुमचे मठीं अतीतअभ्यागत येत असतात. त्यास अन्नपाणी पावल्यानें स्वामीस व स्वामीच्या राज्यास कल्याण, ऐसें जाणोन, स्वामी तुह्मांवर कृपाळू होऊन मौजे आंबवली ता॥ मुठेखोरें प्रां मावळ, हा गांव पेशजीच्या मोकासियाकडून दूर करून, हालीं कुलबाब कुलकानू खेरीज इनामदार व हक्कदार, चतुःसीमापूर्वक करून दिल्हा असे. तरी मौजे मार आपले दुमाला करून घेऊन तुह्मीं व तुमचे शिष्यपरंपरेनें इनाम अनभऊन सुखरूप रहाणें. जाणिजे. लेखनालंकार. मोर्तब.

बारसूद. बारसुरुसुद. बार सुमंत. बार मंत्री.

---

श्री.

## लेखांक ६१.

१६८२ मार्गशीर्ष शुद्ध १४.

राजा शाहु नरपति हर्षनिधान बाळाजी बाजीराव प्रधान.

दस्तक सरकार राजश्री पंतप्रधान ता॥ कमाविसदार व जकाती मा॥शय. सु॥ इहिदे सितेन मया व अलफ. राजश्री गणेश हरी कारकून नि॥ जवाहिरखाना याचे तांदूळ खंडी ७ सात खो फिरगाण कोकणांतून आणितील, त्यास आणूं देणें. जकातीचा तगादा न लावणें. जाणिजे.

छ १२ जमादिलावल. आज्ञा प्रमाण.

बार.

श्रीलेखन-सीमा.

---

श्री.

## लेखांक ६२.

१६८२ पौष वद्य १२.

राजश्री कृष्णराव बापूजी व भिवराव बापूजी उपनाम रामडोहकर गोत्र विश्वामित्र सूत्र आश्वलायन कुळकर्णी कसबे मजकूर गोसावी यांसि:–

सेवक बाळाजी बाजीराव प्रधान नमस्कार. सुहूर सन इहिदे सितेन मया अलफ. तुह्मी हुजूर कसबे पुणें येथील मुक्कामीं विनंती केली कीं, आपणास मोगलाईतून अलमगीरसानी बादशाहा यांणीं कसबे रामडोह, पा गांडापूर, सरकार दौलताबाद, सुभे खुजस्तेबुनीयाद, हा गांव दरोबस्त इनाम करार करून देऊन बादशाही फर्मान करून दिल्हा. त्याप्रमाणें आपणांकडे भोगवटा चालत आला. व सरकारतर्फे सरदेशमुखी व बाबती आपणांकडे चालतात. त्यास, आपण स्वामीच्या राज्यांतील पुरातन एकनिष्ठ सेवक यास्तव स्वामींनी कृपाळू होऊन कसबे मजकूरचा मोगलाई अंमल सरकारांत आहे; याजकरितां पेशजीचे बादशाही फर्मान

आपणाजवळ आहे तो पाहून मोगलाई अंमल व सरदेशमुखी व बाबती पेशर्जी आपणाकडे चालत आहेत त्याप्रो दरोबस्त इनाम करार करून देऊन भोगवटियासी सनद करून दिल्ही पाहिजे, ह्मणून, त्याजवरून मनास आणितां, तुह्मी राज्यांतील पुरातन एकनिष्ठ सेवक, तुमचें चालवणें अवश्य जाणून, तुह्मावर कृपाळू होऊन, तुह्मीं बादशाही फर्मान आणून दाखविला तो पाहून, को मजकूर हा गांव, हक्कदार व इनामदार व मुकासाखेरीजकरून, बाकी मोगलाई अंमल व सरदेशमुखी व बाबती पेशर्जी चालत आहेत त्याप्रमाणें, देखील जल, तरु, पाषाण, निधिनिक्षेपादि, दरोबस्त इनाम करून देऊन हे सनद करून दिल्ही असे. तरी सदरहू प्रमाणें कसबेमजकूरचा दरोबस्त अंमल तुह्मीं आपले दुमाला करून घेऊन तुह्मीं व तुमचे पुत्रपौत्रादि वंशपरंपरेनें इनाम अनभऊन सुखरूप राहाणें. जाणिजे. छ २५ जमादिलाखर. आज्ञाप्रमाण. मोर्तब.

---

श्री.

## लेखांक ६३.

१६८२ पौष वद्य १३.

राजश्री देशाधिकारी व लेखक वर्तमान भावी पा गांडापूर गोसावी यांसिः—

अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य सेवक बाळाजी बाजीराव प्रधान नमस्कार व आशिर्वाद. सुा इहिदे सितैन मया अलफ. कृष्णराव बापूजी व भिवराव बापूजी, उपनाम रामडोहकर, गोत्र विश्वामित्र, सूत्र आश्वलायन, कुळकर्णी कसबे मजकूर, यांणीं हुजूर कसबे पुणें येथील मुक्कामीं विनंती केली कीं, आपणांस मोगलाईतून बादशाहा अलमगीर सानी यांणीं कसबे मजकूर हा गांव दरोबस्त इनाम करार करून देऊन फर्मान करून दिल्हा. त्याप्रमाणें आपणाकडे भोगवटा चालत आला. व सरकारतर्फेनें सरदेशमुखी व बाबती ही पेशर्जी इनाम दिल्हाप्रमाणें चालतात. त्यास, आपण स्वामीच्या राज्यांतील पुरातन एकनिष्ठ सेवक, यास्तव स्वामींनीं कृपाळू होऊन कसबे मजकूरचा मोगलाई अंमल सरकारांत आला, याजकरितां बादशाही फर्मान आपणाजवळ आहे तो पाहून मोगलाई अंमल व सरदेशमुखी व बाबती पेशर्जी आपणाकडे चालत आहे त्याप्रमाणें दरोबस्त इनाम करून देऊन भोगवटियास सनद करून दिल्ही पाहिजे. म्हणून, त्याजवरून मनास आणितां हे राज्यांतील पुरातन एकनिष्ठ सेवक, यांचें चालवणें अवश्यक, यांजवर कृपाळू होऊन कसबेमजकूर हा गांव हा त्यांस, हक्कदार व इनामदार व मोकासा खेरीजकरून, बाकी मोगलाई अंमल व सरदेशमुखी व बाबती पेशजीं चालत आहे त्याप्रमाणें, देखील जल, तरु, पाषाण, निधिनिक्षेपादि, दरोबस्त इनामकरार करून देऊन हें पत्र सादर केलें असे. तरी सदरहूप्रमाणें कसबेमजकूरचा दरोबस्त अंमल मशारनिल्हेच्या दुमाला करून यांस व यांचे पुत्रपौत्रादि वंशपरंपरेनें इनाम चालवणें. प्रतिवर्षी नवीन पत्राचा आक्षेप न करणें. या पत्राची प्रत लेहून घेऊन अस्सल पत्र मारनिलेजवळ भोगवटियास परतोन देणें. जाणिजे. छ २५ जमादिलाखर.

आज्ञाप्रमाण. मोर्तब असे.

---

आहे, त्यावरून कळेल. सर्वदां पत्रीं संतोषास पाववावें कृपा केली पाहिजे. कोणेविशीं आमचें विस्मरण पडों न यावें. उभयताहि वृद्धावस्था आहे. स्नेहाची वृद्धीच असावी. लोभ असो दीजे हे विनंति. चिरंजीव राजश्री विस्वासराव याच्या साहित्यांस अंतर होणार नाहीं. या प्रांतीं स्वारी गेलियावर रजवडियांची पारपत्यें होतील. चिंता न करावी. राजश्री महादाजी सिंदे मैत्र व राजश्री अवाचितराव गणेश झासी प्रांतीं आले होते त्यांनीं उत्तम प्रकारें बंदोबस्त केला, हें चिरंजिवांनीं सविस्तर लि॥ असेल, त्याजवरून कळों येईल. लोभाची वृद्धि करावी, हे विनंति.

---

श्री.

## लेखांक ६९.

१६८७ वैशाख वद्य ५.

राजश्री चिंतो विठ्ठल गोसावी यांसिः—

सेवक माधवराव बल्लाळ प्रधान नमस्कार उपरी येथील कुशल जाणून स्वकीय लिहिणें. विशेष. पुरंधरचे जुने लोकांनीं आमचें नांव करून दग्यानें किल्ला घेतला म्हणोन परस्परें वर्तमान विदित जालें. त्यास, हे गोष्ट आलांस किमपि ठाऊक नसतां, मध्यें लबाडी करून कर्म केलें त्याचें पारपत्याविसी तीर्थस्वरूपास लिहिलें आहे. तुम्ही हि विनंति करून लबाडी केली त्याचें पारपत्य करवणें. पहिलाच्या चित्तांत संशय न ये तें करणें जाणिजे. छ १८ जिल्काद. बहुत काय लिहिणें ? (लेखनसीमा.)

---

श्रीगजानन.

## लेखांक ७०.

१६८७ आषाढ शुद्ध २.

श्री.

रमाकांत चरणी
तत्पर नारो शंकर
राजेबहादर.

॥ सनधि करि दई श्री महाराजा श्रीराजा नारो संकर बहादुरजीकी सरकार ते हजुर राजश्री पंडितराव विस्वासरावजीके दैते सिधि श्रीठाकुर मोहेकम–सिंघको आपर मौजे लगधामौ १ तुह्मारी जागीरमै तीर्थरूप लछमन संकर कैलासवासी ने दयौ हतौ सु अबे तुमसे बाचा करि मै हाजिर होद अर्जविंती करित व मेहरबानगी करि हाल सनधि करी दई सु पाऐ जे हो सरकारकी सेवा सुभचिंतकी करै रहनो अस्वन सुहिसात संवत १८१८ मुकांम करहरा.

सदरहूप्रमाणें मौजे मजकूर जागीर करार करून दिल्ही असे. येऊन सरकारचाकरी रुजू राहणें. जाणिजे. छ ४ रबिलावल सन सलास. मोर्तब सुद.

(मोर्तब सुद.)

सनदेप्रमाणें करार
सरकार रो महमद
मीरखान टोंके हजूर
इनायेतखानी व बापुराव गणेश छ १ मोहोरम संवत १८२१
मोर्तब सुद.

(मोर्तब सुद.)

---

श्री.

## लेखांक ७१.

१६८७ आषाढ शुद्ध ११.

| | |
|---|---|
| यादी सु॥ सीत सीतैन छ १० मोहरम. | |
| सौ। पार्वतीबाई यांज- | राजश्री दादासा- |
| कडील फरमास रा। हेब | यांकडील नथा ४ |
| माहादजी तात्या खि- | करविल्या त्यास मोत्यें |
| जमतगार फुसोन आ- | ४ माणीक मणी दर १ |
| ज्ञा करितील. तेणें- | प्र॥ ४ दर रु॥ |
| प्रमाणें करावें. | २५ अगर शंभरा |
| १२५ मोत्यें पाटल्यां- | अलीकडे रु. |
| स खरीदी करून | १०० सोनें. |
| द्यावीं ह्मणून. | त्याजपैकींच. |
| ७६ पाचमणी. | ६ पानड्या बिंदीच्या |
| २ बाळ्यांस | ३ |
| थोर दर, मों। | यासी |
| पेटच्या गळ्यां- | ३ चुणी. |
| तील यांसीं. | ३ पाचाकिडे |
| १० माळेस पांच | ६ |
| मणी. | राधाबाई यांसि |
| ६४ चिंचपेट्या | नथ थोर मोत्यांची |
| गळ्यांतील. | करून द्यावी ह्मणून |
| ७६ लहान | परवानगी घेऊन क- |
| २०१ | रून द्या ह्मणतात. |
| | १ |

---

श्री.

## लेखांक ७२.

१६८७ श्रावण शुद्ध १२.

राजश्री चिंतोपंत तात्या गोसावी यांसिः- अखंडित लक्ष्मीअलंकृत राजमान्य स्ने॥ महादजी शिंदे दंडवत विनंति उपरी येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहित जाणें. विशेष. अलीकडे आपणाकडून पत्र येऊन वर्तमान कळत नाहीं. त्यास, सविस्तर अर्थ लिहित जावें. श्रीमंत राजश्री रावसाहेब देशास आले. त्यांची आपली भेट झाली असेल. त्यास, सविस्तर वर्तमान लिहून पाठवावें. येथील वर्तमान तपसीलवार कारभाराचें वगैरे राजश्री बाळाजीपंत यांनीं आपणास लिहिलें आहे, त्याजवरून कळेल. सारांश जातेसमई आपण आह्मांस सांगितलें कीं, वरीस भरेपर्यंत स्वहित किंवा अनहित मनास न आणावें; त्याजप्रों आपले वचनाचें दृढतर धरून त्याअन्वयें आहों. दुसरा मार मातुश्रीबाईकडून पत्रें आलीं. त्यांत मजकूर कीं, घरीं पंच्यवीस हजार रुा। खर्च काढून भक्षिले, त्यास कर्जदार ऐवजाची निकड करितात, याची तरतूद करून पाठवणें ह्मणोन. त्यास, आह्मांपासीं ऐवज आहे किंवा नाहीं, आणि येथें तरतूद होती अथवा नाहीं, हा अर्थ सर्व आपणास ठावकाच आहे. याजकरितां हें पत्र आपणांस लिहिलें आहे. तरी आपण पंच्यवीस हजार रुा। कर्ज मातुश्रीस देवावे. आम्ही व्याजासुद्धां ऐवज जेथें सांगाल तेथें पावते करूं. मुख्य आपणांस लिहिल्यावरून ऐवज पावेल हा भरंवसा जाणून लिहिलें आहे. तरी लिहिल्याप्रों। कार्य करून उत्तर पाठवावें. वरकड सर्व गोष्टी आपण बोलले आहांत त्याजवरी कायम आहों. कळावें. रा छ ११ सफर.

मातुश्रीस रहावयास जागा पेडगांव द्यावें ह्मणून करार होता. परंतु अद्यापिवर तें काम जालें कीं न जालें हें लि॥ नाहींत. कार्य करून द्यावें. हे विनंति.

---

श्री.

## लेखांक ७३.

१६८७ भाद्रपद वद्य ११ प्रथम.

राजश्री चिंतो विठ्ठल गोसावी यांसि:—

उपरी. तुम्हीं पूर्वीं पत्र राजश्री भिकाजी नाइकाचा॥ पाठविलें तें पावलें. त्यावरून सविस्तर वृत्त कळलें. त्या पत्राचें उत्तर पूर्वींच रवाना जहालें त्यावरून सर्व तुम्हांस इकडील भाव कळलेच असतील. प्रस्तुत बलरामानें पत्र लिहिलें होतें. त्यांत आशय होता कीं, विठ्ठलरायाचा॥ निराळीं पत्रें तीर्थस्वरूपांस येतात हें काय? म्हणून तुमचा आशय बलरामानें लिहिला: त्यास, पत्र कांहीं निराळें राजकारण राखावें, आशय कळावा, याअर्थें पत्र येथून गेलें नाहीं. येथील इतबार सर्व तुम्हांवरच आहे. पत्र यावयाचें कारण हेंच कीं, पहिले लहानमोठा निरोप सांगून पाठविणें तरी याजबा॥ पाठविण्यांत येत असे, त्यावरून त्याणेंच होऊन पत्र येथून नेलें आहे. आणिक कांहीं प्रकार नाहीं. दुसरें, तेथें तरी येथील खातरजमेचा मनुष्य कोण आहे त्यास पत्र लिहावें? सारांश गोष्ट हेच कीं, संदेह वारंवार न येणें. जाणिजे. छ २३ रबिलोवल. बहुत काय लिहिणें?

---

श्री.

## लेखांक ७४.

१६८७ कार्तिक शुद्ध ७.

मिर्जा आदलबेग खुशवख्त बाशद:—

तहवर व जलालत दस्त—गाहा. सुहूर सीत सितेन मया व आलफ. पा॥ मंदोसर व उज्जनवासे व सुसेडे हे महाल तुम्हांकडे शिवाकडून आहेत. त्याची जसी सरकारांत करून रसद हुजूर द्यावी लागती. याजकरितां तुमचें प्रयोजन असे. तरी पत्र—दर्शनी हुजूर येणें. दिरंग न लावणें. या कामास स्वार, हिम्मत गणोजी कदम यांस पाठविले आहेत, मसाला रुपये एक हजार देविले असेत. तर आदा करणें. जाणिजे. छ ५ जमादिलोवल. आज्ञाप्रमाण.

( लेखनावधिः )

बार.

( शिक्का. )

पत्कंजलीनस्य मुद्रेयमपराजिता बाजीरायतनूजस्य रघुनाथस्य राजते.

---

श्री.

## लेखांक ७५.

१६८७ कार्तिक शुद्ध ७.

अखंडित लक्ष्मीअलंकृत राजमान्य राजश्री हरजीराम दि॥ सिद्दि गो॥ यांसि:—

सेवक रघुनाथ बाजीराव नमस्कार. सु॥ सीत सितेन मया व अलफ प॥ शाहाबाद व चडवंदे व उमरगड वगैरे महाल तीन सिवाकडून तुम्हांकडे कमाविसीस आहेत. त्याची जसी सरकारांत करून रसद द्यावी लागती. याजकरितां तुमचें प्रयोजन हुजूर असे. तरी देखत आज्ञापत्र हुजूर येणें, दिरंग न लावणें. या कामास स्वार दि॥ गणोजी कदम पाठविले आहेत. तर यांस मसाला रुपये १००० एक हजार देविले असत. तर आदा करणें. जाणिजे. छ ५ जमादिलावल. आज्ञाप्रमाण. (लेखनावधिः)

---

॥ श्रीराम ॥

**लेखांक ७६.**

१६८७ माघ शुद्ध १४.

श्री
म्हाळसाकांतचरणीं
तत्पर खंडोजीसुत
मल्हारराव होळकर.

॥ सिध श्रीसुबेद्दार मलारराव होलकर बचनात्. बषतावरसींग तालुका गोपालपुर दिसे सुप्रसाद मालुम होय. आगे समत् १८१६ वा सं० १८१७ दोवो साल बाबुराव कोनेरके अमलमे पंडत रावो लछमनके मारफात बाकी रुपया रह्या है. सो हीसाब कबजमोजब सरकारमे रुजुवात कर बाकीका फैसला कीया चाहिये. तो तुम कुल हीसाब दोना सालका और कबजे मुकासदारोकी होय सो ले सीताब हजूर आवना ढील न करणा. मीती माह सुध १४ समत् १८२२.
(मोर्तब सुद+)

---

॥ श्रीराम ॥

**लेखांक ७७.**

१६८७ माघ शुद्ध १४.

श्री
म्हाळसाकांत-
चरणीं तत्पर खं-
डोजीसुत मल्हा-
रजी होळकर.

॥ सिध श्रीसुबेदार मलारराव होलकर बचनात्. बिसालसींग तालुका लाहर दिसेसुप्रसाद मालुम होय. आगे अमृतसिंग हजुर आय समत् १८१७ के सालकी कबुलीयत सरकारमे लीपदइ है. सो रुपया सरकारमे आदा कीया नही. और समत् १८१६ के साल‌की बाकी पंडत रावो लछमनके मारफत की रही है. सोवा सालकी कबजा मुकासदारांकी और सतराके सालका रुपया. ले सीताब हजूर आवना. ढील न करणां. मीती माह शुध १४ समत् १८२२
(मोर्तब सुद+)

---

श्री.

**लेखांक ७८.**

१६८७ माघ शुद्ध १४.

म्हाळसाकांतचरणीं
तत्पर खंडोजीसुत
मल्हारजी होळकर.

॥ सिध श्रीसुबेदार मलारराव होलकर बचनात्. चतुरसींग वा भीमसींग दिसे सुप्रसाद मालुम होय. आगे तुमको सरकारके षैरषाहजान तालुका इंदुर षीका समय १८१७ के सालकी जमा हजुरसुं करार करदई सो करार मोजीब रुपया आदाकीया नही और पंडत रावो लछमन इनकी चीजबस्त तुमने लइये बात अछी न करी. हाल देष ते परवाना पंडत मसारनीलेका राजीनामा और सतराके सालके कबुलीयत माफक रुपया ले सीताब हजूर आवनां. ढील न करणां. मिती माह शुध १४ समत् १८२२.
(मोर्तब सुद+)

---

श्री.

**लेखांक ७९.**

१६८७.

राजश्री नारोपंत नाना गोसावी यांसि:—
अखंडित लक्ष्मीअलंकृत राजमा[illegible]
स्नेहांकित महादजी सिंदे दंडवत

उपरी येथील कुशल जाणोन स्वकीय कुशल लिहीत गेलें पाहिजे. विशेष. पूर्वी दोन च्यार पत्रें आपणास पाठविलीं त्यांचें उत्तर आलें कीं, दरबारचा बंदोबस्त करितों. आणि देशींहून वर्तमान आलें कीं, लोकांचे घरीं चौकिया बसऊन उपद्रव केला आहे व महालींहि जप्ती केली. ऐशियास, पूर्वी कच्चे वर्तमान इकडील जें जालें तें लिहिलेंच आहे. तरी आपण व राजश्री विष्णु महादेव एकत्र होऊन दरबारचा बंदोबस्त करावा. आपण उभयतां करितील ते आह्मांस मान्य आहे. मस्तुत इकडील वर्तमान कोटेयाजवळ मुक्काम आहे. कोटयाची खंडणी जाहली व मारवाडचीहि खंडणी होऊन विल्हेस लाविलें. अतःपर राजश्री मल्हारजी होळकर यांजकडे जात आहों. त्यांचा मुक्काम मस्तुत दतियानजीक आहे. ते आह्मीं एकत्र होऊन कितेक सरकारी कामें मातबर करावीं, हाच अर्थ चित्तांत धरिला आहे, दुसरा प्रकार नाहीं. लोकांचे घरीं चौक्या बसल्या आहेत, याजमुळें लोक दिलगीर आहेत. परंतु, कांहीं आह्मांस सोडून जातात, ऐसा अर्थ नाहीं. तशाहीमध्यें लोक दिलगीर जाहलियानें साहेबकाम निखालस होत नाहीं. याजकरितां उभयतां आपण चित्तावर धरून, जेणेंकरून चोकिया व जप्ती उठोन सरदारीचा बंदोबस्त होय, तो अर्थ करावा. आमची धणियाचे पायांपाशीं एकनिष्ठता आहे. दुसरा अर्थ कांहीं नाहीं. ऐसें असोन, देशीं हा उपद्रव करावा यांत धणियाची किफायत आहे कीं काय, येविशीं श्रीमंतांसही पत्रें लिहिलीं आहेत. मविष्ट करून, उत्तरें पाठवावीं. सर्व प्रकारें भरंवसा आपला. ऐसें असतां लोकांचे घरीं उपद्रव होतो व महालची जप्ती केली त्याचा अद्यापि कांहींच बंदोबस्त आपण करीत नाहींत, यावरून अपूर्व आहे. याउपरी तरी श्रीमंतांची मर्जी काय हें मनास आणून ल्याहावें. त्याप्रोंच वर्तणूक केली जाईल. आज पंचवीस हजार फौज आह्मांपाशीं असोन, मागील बखेड्यामुळें मोठचा मनसुब्यास उपयोगी पडत नाहीं. याकरितां लि॥ असे. रा॥ छ. २२ सफर. बहुत काय लिहो ? लोभ असो दीजे. हे विनंति.

(मोर्तब सुद.)

श्री जोतिःस्वरूप
चरणीं तत्पर जया-
जीसुत जनकोजि
सिंदे निरंतर

---

श्री.

## लेखांक ८०.

१६८८ वैशाख वद ३.

राजश्री पिंतो विठ्ठल गोसावी यांसि:—

उपरी मोरो नरहरी यांस जामिनाविशीं तगादा जाहाला आहे. त्यास, मामलेदारीकडे गुंता नाहीं. तरी तीर्थरूपास विनंति करून सोडून देवणें. म्हणून तुम्हांस पूर्वी लिहिलें होतें; परंतु त्यास अद्यापि सोडिलें नाहीं. जामीनाविशींच अटकाव असिल्यास तर तुम्ही दरम्यान होऊन यांस सोडवणें. कदाचित् यांजकडे गुदाप लागू जाहला तरी यांजपासून आपण साहाजे करून देववा लाईल. हे मुद्दल फोडून कोठें जाणार आहेत ? तरी तीर्थरूपाचा कागद देऊन सावाविशास लाऊन द्येणें. हे पत्र कोणास न दाखविणें. लिहिल्याप्रो करून आपला निश्चय करून द्येणें. जानिजे छ १७ जिल्हेज. बहुत काय लिहिणे ?

([illegible])

---

श्री.

## लेखांक ८१.

१६८८ ज्येष्ठ वद्य १.

राजश्री रामाजीपंत यांप्रतिः—

बापूभट आशीर्वाद उपरी. लेह्यास कारण कीं, श्रीमंत चिंतो विठल तात्या यांनीं चादशीचायी राम आह्मांस दिल्हा. त्याचा चकनामा व नारो शंकर यांचें पत्र वेदमूर्तीस देणें, ह्मणून अलाहिदा तुह्मांस आलावरून तुह्मी दोन पत्रें आह्मांस पाठविलीं. कळावें ज्येष्ठ वद्य प्रतिपदा चंद्रवार, बहुत काय लिहिणें ? हे आशीर्वाद.

---

श्री.

## लेखांक ८२.

१६८९ आषाढ शुद्ध १०.

राजश्री कमाविसदार पा। सिंदखेड यांसिः—

अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य स्नो केदारजी सिंदे दंडवत. सुा। समान सितैन मया व अलफ. पा।मजकूर येथील अंमल पेशजीचे कमावीसदाराकडून दूर करून सालमजकुरापासून तुह्मांकडे मामलत सांगोन रसदकरार २२००० बावीस हजार करार केले असेत. तरी माहालीं अंमल नसलियावरी भरणा करून कबज घेणें. यासो मामलतसमंधे कलमें.

( श्रीजोतिस्वरुपचरणीं तत्पर तुकोजीसुत केदारजी शिंदे निरंतर )

रसदेचा ऐवज फिरेतोंपर्यंत मामलत फोदूं नये कलम. १

आल्फ फितूर मुलूक शिरस्तेप्रों मजुरा देऊं कलम. १

व्याज एकोत्रा शिरस्तेप्रो मजुरा पडेल. १

सिबंदी माहालमार पेशजीप्रों मजुरा पडेल. कलम १

येणेंप्रों च्यार कलमें करार केले असे. तरी इमानेंइतबारें मामलत करून, कच्चा हिशेब समजावीत जाणें. जाणिजे. छ १ सफर. बहुत काय लिहिणें ? हे विनंति.

( मोर्तब सुद. )

बार.

---

श्री.

## लेखांक ८३.

१६८९ आषाढ शुद्ध १०.

राजश्री अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य स्ने।। केदारजी सिंदे ० दंडवत. सु।। समान सितैन मया व अलफ. प।। सिंदखेड येथील अंमल तुम्हांकडून दूर करून सालमजकुरापासून राजश्री यांजकडे सांगितला असे. तरी तुह्मीं दखलगिरी न करणें. म।।रनिले अंमल करतील. प।।मजकूरचीं ठाणीं असतील तीं यांचे स्वाधीन करून कबज घेणें. जाणिजे छ. १ सफर बहुत काय लिहिणें ? हे विनंति.

(मोर्तब सुद. )

[ श्रीजोतिस्वरूपचरणीं तत्पर तुकोजीसुत केदारजी शिंदे निरंतर. ]

---

श्री.

## लेखांक ८४.

१६८९ कार्तिक वद्य ११.

चिरंजीव राजश्री राव यांसिः—

रघुनाथ बाजीराव आशीर्वाद उपरी येथील कुशल जाणोन स्वकीय कुशल लिहीत जावें. विशेष. मौजे साकोरें, पो माणिकपुंज, हा गांव राजश्री त्रिंबक सूर्याजी यांजकडे आहे. तो त्याकडे चालवावा, येविसींचा करार सालमजकुरीं समान सितैनांत

पलेजवळ मानिलेचे गांवाविशीं कोण्ही वालमेल करील, तर त्याचें न ऐकावें. मानिलेकडेच सुदामत चालत आल्याप्रों सुरळित चाले तें करावें. राजश्री चिंतामण हरि मौजेमजकुरास उपद्रव करितात. त्यास ताकीद करावी. रा छ २४ जमादिलाखर बहुत काय लिहिणें ? हे आशीर्वाद.

---

श्री.

## लेखांक ८५.

१६८९ कार्तिक वद्य १२.

अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य राजश्री चिंतो विठ्ठल गोसावी यांसिः—

सेवक माधवराव बल्लाळ प्रधान नमस्कार उपरी येथील कुशल जाणोन स्वकीय लिहीत जाणें. विशेष. शिंदे येतात येतात ह्मणून तुह्मी बोलत गेला व त्याचीं ही पत्रें च्यार महिने येतों येतों ह्मणोन येतात; परंतु हा कालपर्यंत त्यांचें येणें होत नाहीं. कारभार तो जाला पाहिजे. हिंदुस्थानांत फौजा जाऊन बंदोबस्त व्हावा लागतो. त्याणीं विलंब लाविला तर कोठवरी वाट पहावी ? जरी आठा रोजांत सत्वर येत असिले तर उत्तम. यावें. नाहीं तरी करणें तसें करावें लागेल. जाणिजे. छ २९ जमादिलाखर, सुा समान सितैन मया व अलफ. बहुत काय लिहिणें ? विसा दिवसांत त्यांनीं निघोन चालते व्हावें. ते तर जाहालें नाहीं. अद्याप निघावयाचें वर्तमान कळत नाहीं. यास्तव लवकर काय तें कळावें. दोहींकडून काम बुडवावें हें ठीक नाहीं. उत्तर रवाना सत्वर करणें. जाणिजे. छ मजकूर. बहुत काय लिहिणें ?

( लेखनसीमा. )

---

श्री.

## लेखांक ८६.

१६९०.

यादी राजश्री दादासाहेबांकडे कर्ज आमचे मारफतीचें. सु॥ तिसा सितैन मया व अलफ.

रु.

१००००० रुद्राजी गिरमाजी.
२०००० किता रुद्राजी गिरमाजी.
३०००० सदाशिव अंबादास.
९००० दहीवेलीची मामलत अजमासें.
१५००० किता नांवाचें स्मरण नाहीं
———
१८४०००
२५००० शिदाप्पाशेट वीरकर.
———
२०९०००

---

श्री.

## लेखांक ८७.

१६९२ मार्गशीर्ष वद्य ५.

नकल.

राजमान्य राजश्री भास्कर बल्लाळ गोसावी यांसिः—

सेवक माधवराव बल्लाळ प्रधान नमस्कार. सुा इहिदे सबैन मया व अलफ. तीर्थस्वरूप राजश्री दादासाहेब यांजकडील अनुष्ठानें आनंदवल्लीस नेहमीं चालतात. त्यांपैकीं येक अनुष्ठानाची वर्णी वो राजश्री नारायणभट वैसास, वास्तव्य श्रीक्षेत्र त्र्यंबकेश्वर, यांजकडे नेहमीं सांगणें. जाणिजे. छ १९ साबान. आज्ञाप्रमाण.

---

श्रीमार्तंडभैरव.

## लेखांक ८८.

१६९४ आषाढ वद्य ७.

श्रीमत् राजश्री पंतप्रधान स्वामीचे सेवेसीः—

विनंति सेवक भगवंतराऊ शंकर कृतानेक सां नमस्कार विज्ञापना. भवानी नाईक राक्षे श्रीगोंदकर व गोपाळ नाईक राक्षे या उभयतांच्या भाऊपणाच्या वांटियाचा कजिया आहे. त्यास, भवानी नाईक यांस आम्ही जामीन जालों. मुदतीस न आला सबब त्याचें कर्ज मातुश्री सकुबाई सिंदे याजकडे आहे. रुपये ४०००० चाळीस हजार आहे. तो ऐवज उभयतांचा कजिया विल्हेस लागेतों नाईकमजकूर यांस ऐवज देणार नाहीं. स्वामींची आज्ञा येईल तेव्हां देऊं. ज्यास ऐवज देवाल त्यास देऊं. मित्ती शके १६९४ नंदननाम संवत्सरे, आषाढ वद्य ७ सप्तमी. सेवेसी श्रुत होय. हे विज्ञापना.

---

श्रीशंकर.

## लेखांक ८९.

१६९५ भाद्रपद शुद्ध ६.

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री रामाजी जनार्दन स्वामीचे सेवेसीः—

पे॥ लक्ष्मण अप्पाजी सां नमस्कार विनंति उपरी. सैद अन्नजलयाची जमीन राजश्री तात्याजवळ गहाण ठेवावयाचा करार केला. त्यास, हालीं तूर्त ऐवज पांचशें त्यास दिल्हे आणि पुण्यास पत्र पा आहे. कदाचित् त्याहीं जमीन न ठेविली तर सदरहू पांचसें रुो एकोत्र्याचे मित्तीनें देऊं. मित्ती शके १६९५ विजयनाम संवत्सरे, भाद्रपद शुद्ध ६. बहुत काय लिहिणें? हे विनंति.

---

श्रीमार्तंडभैरव.

## लेखांक ९०.

१६९५ पौष वद्य १३.

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री भवान नाईक राक्षे स्वामीचे सेवेसीः—

पाो भगवंतराव शंकर सां नमस्कार विनंति उपरी. राजश्री बाबूराव रामचंद्र यांसि रुो ५२०० पांच हजार दोनशें तुह्मांकडून देविले आहेत. हे वैशाखअखेर देणें. मित्ती सके १६९५ विजईनाम संवत्सरे, पौष वद्य १३, मुा तुंगभद्रातीर. ज्येष्ठ शुध प्रतिपदेपासून रुो पुढें राहिले तर दर सदे रुो ०॥० प्रां व्याज देऊं. हें खत लिहिलें सही.

हस्ताक्षर कृष्णाजी सखदेव, द्विामा॥र.

---

श्री.

## लेखांक ९१.

१६९५.

यादी मोगलाई अमलाच माहाल सुा अर्बा सबैन—

| किता—— | किता——. |
|---|---|
| ० पा पडदूर | १ को पानगांव |
| १ पा नरसी | १ को रमणपूर |
| १ पा वासीम | १ को खलविरें |
| १ पा जिंतूर | १ को शाहागड |
| १ पा बदापूर | १ को भोंगाव |
| १ पा सीरसाले | १ को टाकळी लाळाईची |
| १ पा पोहनेर | १ अंदूरें वगैरे गांव धारूरपैकीं |
| १ पा वळूर | १ अष्टी सैद जुनदीची |
| १ पा शेलगांव | १ पा टाकळीपों फुटगांव राजे विनायकदास याजबा |

| | |
|---|---|
| १ पा लोणार | ४ पा अंबाडपाों फुटगांव |
| १ पा बाह्मणी | १ बाल्हेगांव |
| १ पा पाचळेगांव | १ चंदनपुरी |
| १ पा कोसडी | १ कडेठाण |
| १ पा वेस | १ दरेगांव |
| १३ | ४ |

१ मौजे कसनेर

१४

माहाल व गांव २७

श्री.

## लेखांक ९२.

१६९६ आषाढ वद्य १२.

यादी त्रिंबक सूर्याजी विज्ञापना ऐसीजे. सुा खमस.

सेवकाचें गांव जप्त आहे तें मोकळें करावयाच्या सनदा खानदेश व पाल हवेली मामलेदार व जमीदारास सनदा.

१ कसबे साकोरें पा माणिकपुंज.
१ मौजे नरें, ता पाल्हवें.

२

दोन गांव दौलतीचा बंदोबस्त जाल्यानंतर तुह्मांकडे चाकरींत दिल्हे जातील. करार.

तूर्त साकोरे याची मोकळीक चिटी देणें.

तासी माहाल ता अवचितगड येथील हवाला पुरातन गणेश सूर्याजीचे नांवें चालत आला. हालीं रा बाजी गोविंद यांणीं आपले भावाच्या नांवें करून घेतला आहे. तो पेशजीप्रों चालवणार धणी समर्थ आहेत.

सालिना मोइना.
१५० मोईन तूप.
२४ पोरगा.
३६ दिवटच्या तेल वजन पक्कें ८८।
दरमहा ८८२॥

छ २५ जमादिलावल सुा खमस सबैन.

मोकळीक सनदा असत.

१ नारो कृष्ण तरवे सर-सुभेदार पा खानदेश.
१ जमीदार.
१ मोकादम.

३

श्री.

## लेखांक ९३.

१६९६ भाद्रपद वद्य १.

राजश्री चिंतो विठ्ठल स्वामी गोसावी यांसि:—

विनंति उपरी, हैदर नाईक याजकडे सालगुदस्त तीर्थस्वरूप राजश्री दादासाहेबीं ऐवज करार केला. त्यापैकीं राजश्री कृष्णाजी नाईक दातार यांस दोन लक्ष रुपये द्यावयाचा ठराव तुमचे विद्यमानें आपाजी—राम यांजवळ जहाला. त्याविशीं मागें तुमचें व नाइकाचें पत्र घेऊन आपाजी—राम याजकडे पाठविलें होतें. त्याचे जाब आले ते पाहून, नाइकांस दाखऊन, राजश्री नारो आपाजी याजकडे पाठविले आहेत. ते तुह्मासी बोलतील. त्याविशीं फिरोन कागदपत्र काय लागतील ते तयार करऊन, नाईक सांगतील त्याप्रमाणें ऐवज आणावयाची तर्तूद करून, ऐवज सरकारांत सत्वर येई तें करणें. जाणिजे. छ १३ रजब, सुा खमस सबैन मया व अलफ. हे विनंति.

श्री.

## लेखांक ९४.

१६९७ चैत्र वद्य २.

चैत्र वा। २ हबशास पत्र कीं आंसाहेबानीं शेकअली जमातदार याचे जबानीं मजकूर ऐकोन मेहरबानी करून खत

पाठविलें तें पावोन खुषवक्ती हासील जाली. कितेक मजकुराचा मारनिलेचे जबानीं हवाला देऊन लिहिला तो कलम जमातदार याणीं येथें येऊन आपले दिलांतील अर्थ जाहीर केला. तो दर्याप्त करून बयानवार हकीकत हजूर श्रीमंतसाहेबाकडे अर्जदास्त लेहून पाठविला असे. हुजुरून हुकूम आल्यावर साहेबांस जाहिर करूं. कितेक मजकूर जमातदार मारनिले याचे जबानीवरून कळतील.

---

हू.

## लेखांक ९५.

१६९७ चैत्र वद्य ७.

अजम वुइलिम हारनबी इस्कोयर प्रजीदेंत गोवर्णदोर जनराल बंदर मुंबई दाममहबतहः—

शाहामत अवली मर्तबत हशमत व मजीलत मवलात दस्तगाहाय अतिजाद दोस्तां आजि ज्यानीब ाचतीं विठल सलाम अजाम आंके येथील खैरखुशी जाणून आपली खैरखुशी हमेषा कलमीं करीत गेले पाहिजे. दीगर. बहुत रोज मोहिबाकडून खत येऊन खबर मालूम होत नाहीं. याजवरोन ताजूब दिलांत आलें आहे. तरी हे बात दोस्तीचे जागां लाजीम नसे. खतखतूत हमेषा पाठऊन दिलखुषी बेयैत करावे. शाहामतअवलीपन्हा महादजी सिंदे फौजसुद्धां शाहामतपन्हा तुकोजी होळकर फौजसुद्धां गुजराथप्रातें दरकुच येऊन नर्मदापार मुकाम केला आहे. इजानेबाही याचे सोबत आहेत. त्यास, याची व मोहिबाची दोस्ती एकरंग चालावी हें इजानेबाचे दिलांत येऊन हें खत कलमीं केलें आहे. तरी आपले दिलांतील खुलाशाचा मजकूर कलमी करावा. त्याबमोजी शाहामतपन्हा यांजसी जवाबसाल होऊन कलमी केला जाईल. पेशजी इज्जतमहा दादो मल्हार मोहिबानजीक रवाना केले ते जाऊन पोहोंचोन मजमून मालूम केलाच असेल. तरी ज्या बातेंत दुतर्फा दोस्ती इज्यानेबाचे दरम्यानागिरीनें चालेल तेच बात दिलांत आणावी यांतच नफा असे. ज्या बाता त्या मकानीं असतां रुबरू बोलण्यांत आल्या होत्या, त्याप्रमाणें गुदस्तां दरपेष अंमलांत आल्या. याची हायेस दिलांत आलीच असेल. हेंच जाणून दोस्तीचे जागा कलमीं केलें आहे. तें दिलांत यावें. परस्परें दोस्ती यांची व मोहिबाची असावी, यांत नफाच दुतर्फा आहे. व दीगरबात परस्पर असिलयानी नफा नाहीं, हेंच इजानेबाच्या बातांत व दोस्तीचे जागां मालूम व्हावें, सबब कलमीं केलें आहे. तरी हे बात दिलांत आणून जवाब पाठवावा. रा। छ २१ सफर. ज्यादा काय लिहिणें ? हे किताबत.

---

श्री.

## लेखांक ९६.

१६९७ श्रावण.

श्रीमंतास जाबसाल ल्याहावें. इष्टोलाविसींचा मजकूर येण्या राहण्याचा तेथें दोघे ममतेन्चे आहेत.

१ मेस्तर होम. १ मेस्तर हटली,

गाईकवाडापों. दाहा किटीणीकडे आले. पो साडेसाहा सरकारांत आले. बाकी ऐवज अमानत ठेवावा. दरमहा घेतला पाहिजे, ह्मणून किटीण ह्मणतो. त्यास, दरमाहांत माहाल लाऊन दिल्हे आहेत. मसलत सेवटास गेली पाहिजे. त्यास, जनरालास पुसोन दोहोंचे जमेची घेऊन पाठवणें ह्मणून पत्रीं आज्ञा. त्यास,

दरमहाचे ऐवजांत गाइकवाडाचा ऐवज घेणें, हें सेवकास अगोदरच समजलें आहे व सेवेसीही लिहिलें आहे. हालीं यास पुसावें तरी हे ऐवज देवीत नाहीं आणि उगेंच हलकें व्हावेंसें होतें. महालाचा तपसील तरी उज्याड मुलुक आहे. आमोद तरी नेहमीं दिल्ही. हसोटचा कजीया ऐसा. हे तपसिलाखालींच जे समजोन कांहीं बोलिलों नाहीं. बंगाल्याचा हुकूम आलियावर सर्व नीट होईल.

कारनेलीची वाईट गोष्ट जनरालाजवळ आजपर्यंत बोलिलों नाहीं. व मागील गोष्टीचें प्रयोजनही नाहीं. सेवकाचा दोष निवारण व्हावा ह्मणून दुभाषास दाखववायाकरितां सेवकाचे पत्रावर मोहर करून पाठविली, ह्मणोन पत्रीं आज्ञा. त्यास, मोहरेचें पत्रच आलें नाहीं. तेव्हां शोध करावा.

ओझ्यास उंटें पन्नास व सासे बैल दिल्हे असतां, हजार गाडे आणावयास डबईस माणसें किटणींनें पाठविलीं आहेत. येविसीं बोलून हुकुमाप्रों चालत तें करणें, ह्मणून पत्रीं आज्ञा. त्यास, खंबाइताहून निघतेसमयीं आमचें वोझें दोन तक्षिमा न चाले म्हणून राहिले. एक तक्षम मात्र आलें. त्यास, तंबूखेरीज इंग्रजाची हैराणगत जाली, म्हणोन मेस्तर वारलीस बोलत होता. त्यास, वोझ्याविसींची गोष्ट त्यास रुचणार नाहीं. यास्तव तूर्त बोलणें ठीक नव्हे. बंगाल्याची अवधी होऊन जाजती दिवस जात आहेत. तात्पर्य उगेंच रहावें हें ठीक दिसतें.

अवधी राहिली नाहीं. प्रसंगास्तव बोलितों. आज्ञेपूर्वींच सारे अर्थ सेवकाचे ध्यानांत आहेत. परंतु हा समय नाहीं. याचा संतोष राहून जें होईल तें करणें उचित. आपला काल प्रतिकूल आहे. या समयांत एकादी गोष्ट बोलतां बोलतां त्याणीं वाईट मानिल्यास जर सनद त्याजवळ नासिली तरी पुढें ऐवज सरकारांत मागतील. यास्तव समज व्यावी. याशिवाय कांहीं दिक्कत असिल्यास आज्ञा व्हावी. १

सुरतकर मोगलाकडील बाकीचा फडशा निमेवर जाला. त्यास साऱ्या ऐवजाचें कबज सुरतकर मागतो. येविसीं जनरालास बोलोन साराच ऐवज सुरतेस येई, ऐसीं पत्रें पाठवावीं, भडोजेस निम्मे, सुरतेस निम्मे, ऐवज द्यावा, ऐसा करार. तेव्हां करारप्रमाणें त्याजवळ दस्तऐवजी असली पाहिजे.

---

श्री.

## लेखांक ९७.

१६९७ भाद्रपद शुद्ध ४.

राजेश्री लक्ष्मण आबाजी गोसावी यांसि:-

सु॥ सीत सबैन मया व अलफ. राजश्री विश्वासराव यशवंत यांचीं पत्रें सुरत अठाविशींतून आलीं. त्यांत मजकूर लिहिला कीं, सरकारची फौज माहालचे रखवाळीकरितां सोनगडाकडे गेली. हेंबातमी फितुरियांचे फौजेस कळोन, सोनगड डावा टाकून, फितुरियांची फौज सरकारचे फौजेस आडवी आली, असें वर्तमान आलें. त्यास, सरकारचे फौजेची मदत लौकर झाली पाहिजे, याजकरितां हें वर्तमान करणेल किटिणीस कळवून, तिकडील रवानगीचा निश्चय करून, उत्तर लौकर पाठवणें. याखेरीज कलमें उगवावीं:—

दरमहाचे पांच लक्षांत गुजरात वगैरे रसद व फत्तेसिंगाकडील धरूं नये. १ निम्मे मुलूख अथवा रुपायास दरमाहाचे उशीर लागल्यास त्या वेळेस कुच

त्याणीं रोख पाठ- करून हमराहा पार-
वावे. पत्त्यास चलावें.
मजकूर गुजरून ठीक करणें. जाणिजे.
छ ३ रजब– (लेखनावधिः)

---

श्री.

## लेखांक ९८.

१६९७ भाद्रपद शुद्ध १३.

श्रीमंताकडे पत्रें रवाना, भाद्रपद शुद्ध १३ गुरुवार मुकाम भडोज:–

मेस्तर मार्ष्टीन व मेस्तर फ्लेचर यांचें ह्मणणें: लडाई बंद जाहलियाची तकसीर जनरालाकडे अथवा कोपल याजकडे नाहीं. बंगाल्यांतून हे गोष्ट जाली आहे. इतके दिवस सरजनराल नव्हता. आह्मी श्रीमंताची कुमक केलियावर विलायतेहून आला. त्याजकडे मेस्तर टेलर पाठविला आहे. पंधरा दिवस, निदान वीस दिवसांत बंगालियास पोहोंचेल. तो सरजनरलास समजाऊन सांगोन खामखा गेल्या दिवसापासून दीड महिन्यांत परवानगी घेऊन पत्रें पाठवून देईल. तोपरियंत श्रीमंतांनीं स्वस्थ असावें. इंग्रेजी लष्कर श्रीमंतासमागमें राहील. जनरालानें श्रीमंताचा हात धरिला आहे तो कदापि सोडणार नाहीं. श्रीमंताची बाजी सिध्धी जाईल.फिकीर करूं नये.बंगालेवाले मुमईकराची गोष्ट ऐकतील, ऐसें दृष्टीस येतें. याप्रमाणें बोलले. २

करनेल यांनीं निशापत्र जातीनें लेहून दिल्हें. हें मिस्तर मार्ष्टीनास व मेस्तर फ्लेचर यांस ठाऊक नाहीं. हें वर्तमान थोडेंसें कळल्यावर त्याणीं आश्चर्य केलें. या उभयतांस ठाऊक नाहीं, तेव्हां जनरालासही ठाऊक नसेलसें आहे. ते मुंबईस गेल्यास सर्व कळेल. उभयतां ह्मणत होते कीं, गोविंदराव गाइकवाड यांनीं जनरालास पत्र पाठविलें कीं श्रीमंतांनीं फत्तेसिंग याजपासून रुपये घ्यावयाचा करार केला, यांत आमची खुषी आहे ह्मणोन पत्र पाठविलें असतां आतां कां श्रमी होतात ? त्यास, मींही समयिक उत्तर केलें. त्यास, याप्रमाणें सेनाखासखेल याणीं पत्र पाठविलें कीं काय, याचा शोध उगाच असावा.’ १

मेस्तर शहाकडे कांहीं अपराध असल्यास महिन्या पंधरा दिवसांत छाण करतां कळेल. अंगीं असल्यास त्यास बरतर्फ करणार, त्याजकडे दोष फार आहेत, ह्मणोन इष्टोल सांगत होता. १

नर्मदेस पूर मातबर आला. यामुळें उभयतां मेस्तरांनीं आह्मांस राहऊन घेतलें. पाणी उतरलें ह्मणजे जावें. पलीकडे कीम नदी आहे तीस पूर आला आहे. नर्मदेचा पूर उतरेल तेव्हां तेथें उतार सांपडेल. तेथें नावा नाहींत.उतार अवघड.ह्मणोन राहऊन घेतलें.

मेस्तर शहानें मुंबईचे कोसलदारांची व जनरालाचे मर्जीची माहितगिरी सांगितली. प्रस्तुतची गोष्ट बंगालियांतूनच जाली आहे. मुंबईवाल्यांस अभिमान पडला आहे. ते श्रीमंताचा हात धरिला तो सोडणार नाहीं व दिलगीरही आहे. कारण दुसरा जनराल विलायतेहून रवाना केला तो महिन्या पंधरा दिवसांत मुंबईस पोंहचेल. तेव्हां श्रीमंताकडून जो लाभ होणें तो नव्या जनरालास होईल, आपल्यास कांहीं नाहीं ह्मणोन दिलगीर आहे. सारांश, आपलें काम विलायतेशिवाय होणार नाहीं.खुषकीचे वाटेनें कोणी शहाणा माणूस पाठविल्यास आठ दहा महिन्यांत बंदोबस्त पक्का होऊन येईल. याप्रमाणें सांगितलें. त्यांचें मान जावयाचें दिसतें. स्पष्ट बोलोन दाखवीत नाहींत. परंतु यास

सला ठीक नसे. याविर्सी बापू सारस्वतासी बोलिलों आहे. हा निवेदन करील. १

पु॥ सेवेसी विज्ञापना. मेस्तर माष्टीन व मेस्तर फलेचर उभयतां आमचे बिराडास बुधवारीं सायंकाळीं येऊन सांगितलें कीं, श्रीमंतास लिहिणें कीं, कोणेविसीं फिकीर न करावी. मेस्तर माष्टीन गंगाबाईप्रसूतसमई पुण्यांत होते. त्यास पुत्राचा संषय पुसिला. त्याणीं सांगितलें कीं,प्रसूत जाली तें अर्भक निवर्तलें,उपरांत दुसरें घेतलें असेल, निवर्तल्याची खबर आह्मी ऐकिली, पांचजणी बायका गरोदर जवळ होत्या. याप्रमाणें सांगितलें. १

श्रीमंतांस आह्मी पत्र पाठविलें आहे कीं, कामकाज लागल्याची आज्ञा करावी ह्मणोन मेस्तर माष्टानानें सांगितलें. उपरांत बापू सारस्वताची गांठ घालून दिल्ही जे,सरकारचें कामकाज आज्ञेवरून हे तुह्मांस सांगतील, त्याप्रमाणें करून देत जावें. त्याणीं कबूल केलें. अनुष्टानाच्या ब्राह्मणाचा मजकूर सांगितला. त्याचे हरएक साहित्याविर्सी क़बूल केलें. त्यास, महाराजांनीं या उभयतांस पत्रें व किरकोळी आज्ञा करणें ते करीत जावी. आज्ञेप्रमाणें करितील. १

आज्ञेचे अन्वयें निकडीनें मुंबईस पोहाचावें, ह्मणोन कस्त करीत आहें. परंतु पर्जन्य भारी व कीम नदीस उतरावयास उपाय नाहीं. यास्तव एक दिवस अधिक लागला. १

मेस्तर होमानें सरकारांत पत्र इष्टोलाचें लखोट्यांत घालून पाठविलें. रूबरू नेऊन गुदरणें, ह्मणोन त्याजला लिहिलें. मेस्तर टेलर बंगालियास श्रीमंताचे कामाकरितां गेला, भाद्रपद शुद्ध २ मंगळवार, आज दहा दिवस जाले, ह्मणोन सांगितलें. त्यावरून मित्ती लिहिली असे व पत्र दिल्हें तें पाठविलें आहे. सेवसी पावेल. १

येणेंप्रमाणें येथील वृत्त कच्चे सेवेसी कळावें ह्मणोन लिहिलें आहे.सुरतेस जाऊन, गंभीरास बोलून, जलदीनें मुंबईस जातों. उभयतां मेस्तर ज्या गलबतावर बसोन मुमईहून आले, तें गलबत चांगलें. त्याजवर बसोन जाणें, म्हणोन उभयतांनीं सांगितलें. त्याप्रमाणें जातों. जनरालास स्वामीचे कामाचा अभिमान बहुत पडला आहे कीं, केली गोष्ट सिद्धीस न्यावी. याप्रमाणें बहुतजण इंग्रेज सांगतात. सेवेसी श्रुत होय. हे विज्ञापना.

---

श्री.

## लेखांक ९३.

१६९७ आश्विन शुद्ध १५.

शेवेसी लक्ष्मण अपाजी कृतानेक सां। नमस्कार विज्ञापना ऐसीजे. येथील वर्तमान ता। आश्विन शुध्ध पौर्णिमा रविवारपर्यंत महाराजाचे कृपेंकरून यथास्थित असे. विशेष. मुंबईस पोहचल्यावर जनरालाची भेट होऊन बोलणें जालें. त्या मजकुराचीं पत्रें दोन सेवेसीं पूर्वीं पाठविलीं आहेत. पावोन वृत्त कळलेंच असेल. जनरालास अभिमान मोठा पडिला आहे. मेस्तर टेलर खामखा काम करून येतो, हा भरंवसा यांस आहे. त्याचें पत्र यावयास पन्नास दिवसांची मुदत जनरालानीं सांगितली होती. त्यास, तेरा दिवस जाले. बाकी सवा महिन्याची प्रतीक्षा आहे. आज्ञेप्रों खर्चाविसीचे मार बोलिलों, परंतु ते गोष्ट घडत नाहीं. तपसीलवार पूर्वीं लिहिलेंच असे. हालीं नवीन मजकूर बातमी:—

बारभाईची कांहीं जमीयत चार हजारपर्यंत साष्टीचे रोंखावर तळोजे म्हणून गांव

आहे, तेथें खाडीपलीकडे आली. तेव्हां जनरालानीं आपली जमीयत साष्टीचे कुमकेकरितां हजार माणूस मद्रासी पाठवून ठाण्याचा बंदोबस्त केला व पुरंधरास पत्रें पाठविलीं कीं, लढाई बंद बंगालयांतून जाली असतां साष्टीवर तुमची जमीयत आली हें काय, तैसेंच तुमच्या मनांत असिलें तरी सांगणें. या अन्वयें पाठविलीं असेत. हे गोष्टीस बारा दिवस जाले. अद्यापी बारभाईची जमीयत तळोज्यासच असे. बारभाईकडून अंतर पडावें म्हणजे बंगालेवाल्यास जाबसाल करावयास येईल. याप्रों कलह निर्माण जाला आहे. परंतु विस्तार होतां दिसत नाहीं. कलम १

जलदीनें खुपकीनें पत्रें स्वामीकडे पाठवावीं तरी, सांपत बारभाईनीं बंदोबस्त फार केला आहे. कासीद निभणार नाहीं. यास्तव जलमार्गें रवाना करितों. हीं पोंचावयास च्यार दिवस अधिक लागत असतील, परंतु खुपकीनें उपाय नाहीं. जहाजांतून रवानगी परतंत्र म्हणून विलंब लागतो. कलम १

पुा. मर्जी प्रसन्नता दृष्टीस पडिल्यापासून कांहीं कांहीं युक्तीचे वाटेनें बोलोन, येथें तीन कौशलदार १ मेस्तर ड्रेपर १ मेस्तर रामसी १ मेस्तर आसीलेबारहन येकूण तीन आहेत, यांची भेट घेतली. वस्त्रें दिल्हीं. यांत ड्रेपर मात्र सरकारचे लक्षांत विशेषसा नाहीं. उभयतांत तरी पेंच आहेत. त्याचेंही म्हणण्यांत कीं, खासा बंगाल्यास मेस्तर टेलरानें सारा मजकूर समजाविल्यानंतर लढाईच ठरत्ये. चिंता न करणें. असें वारंवार समाधान करितात. येथें पुणियाहूनही पत्रें कांहीं कांहीं येत असतात. त्याचा अर्थ मनास आणून मागाहून सेवेसी लिहितों.

करनेल अपटण बंगाल्याहून पुरंधरास रवानां जाला होता तो निजाम अलीखान याचे मुलकांतून बारभाईचे अमलाचे सरदेस येऊन पोंहचला. इंदोरी म्हणून गांव आहे. त्या सुमारास कोणी दगा करून मारून टाकिला. बहुतशी जमीयत समागमें नव्हती. होते त्या सान्यांस मारिलें. बारभाईचे अमलांत मारिलें. याप्रों येथें खबर आली आहे. लिहिलें आलें नाहीं. खबर मात्र आहे. पक्की असली तरी दुणावेल. लिहिलीं येतील. शोध करून मागाहून सेवेसीं लिहितों. कलम १

चेनापट्टणाहून कासीदपत्रें घेऊन मुंबईवाल्याकडे येत होते. ते पत्रें कल्याणास यांनीं धरून पुण्यास पाठविलीं. कासीद कैदेंत होते, त्यांतून येकजण पळोन आला. त्यावरून बारभाईचे कारकून येथें आहेत, त्यांस पत्रें आणून देणें म्हणून ताकीद केली. तथापि अद्यापि पत्रें इंग्रजाचे हातास आलीं नाहीत. याप्रों किरकाली गोष्टी होऊन, इंग्रेजास विषाद येत असतो. कलम १

जनरालास बंगालवाले आपलें ऐकतीलसा भरंवसा बहुत आहे. यास्तव हे म्हणतील तैसें तूर्त ऐकावें, सलाह उचित आहे. स्वामीनीं कोणेविशीं जलदी करूं नये. यांणीं अभिमान सोडिल्यास खोटी थोडी महिन्यांची राहिली आहे. इंग्रजाचे सोबतीचा गुण व्यर्थ होणार नाहीं. कांहीं येक प्रकारें चांगलेंच होईल. जनरालास पत्रें तुमचे लिहिल्यावरून व लक्ष्मण अपाजी बोलिला तो मजकूर त्याणीं हजूर लिहिला आहे त्याजवरून तुमचे भरंवशावर मुदतीची प्रतीक्षा करीत आहे. याअन्वयें मर्जीस आल्यास पत्रें पाठवावयाची आज्ञा केली पाहिजे. वरकड मार हसोट आंकलेश्वर व तेती लक्षामध्यें व वसई साष्टीचे

वतनासमर्थे बोलावयाचे आहेत. परंतु समय नाहीं. पुढें लढाई सुरू जाल्यावर ठिक पडेल. यास्तव जलदी करीत नाहीं. याचा परंतु बंगाली खबरा ऐकोन कांहीं दबलीं; कांहीं आहेतच. तुह्मास कळावें. इकडील मजकूर सविस्तर राजश्री रामचंद्र विठ्ठल यास आज्ञा केली आहे, त्याचे लिहिल्या-वरून कळेल. तें समजोन त्याप्रें॥ बंदोबस्त करणें. जाणिजे. छ १५ शाबान बहुत काय लिहिणें?

( लेखनावधिः )

---

श्री.

## लेखांक १००.

१६९७ आश्विन वद्य ३.

राजश्री लक्ष्मण अपाजी गोसावी यासिः-

सु॥ सीत सबैन मया व अलफ येथील सारी माहितगारी तुह्मांस आहेच. सारांश फतेसिंगास आश्रय जबरदस्ताचा सांपडला, सबब ऐवज हातास येत नाहीं व शेवाहि नाहीं. गोविंदराव तरी जातीनें वोढक व कोणाचे आश्रयानेंहि छंद करितो ऐसें दिसोन येतें याचे तपसील पत्रीं कशास ल्याहावें? तुह्मीं माहितच आहा. असो! बहुत लेहून फल काय? खुलासा मजकूरः— येथील इंग्रेज आमचे हुकुमांत असिल्यास उभयतां गायकवाड आज्ञेंत वर्ततील व ऐवजहि मिळेल. पुढील मसलतेस उपयोगी पडेल. थोरले मसलतीस इंग्रेजी सामान तूर्त बंद आहे. परंतु गुजरातचे बंदोबस्तास तरी उपयोगी असावें. उफराटा फतेसिंगास आश्रय त्याचा. मग फतेसिंगानें कां न ओढावें? गोविंदराव आपला. त्यास मात्र दाबल्यानें लोक हंसतील. उत्तम पक्ष, फतेसिंगासच दाबावें. निदानीं दोघांसहि दाबून सरकारकाम करावें. सांप्रत कांहींच होत नाहीं. सबब आम्हीं रेवातीरास आलों. पुढें काय मसलत करावी ते लिहिणें. जसें जनराल कोशल सांगतील तसें केलें जाईल. तूर्त च्यार दिवस रेवातीरीं पाणी पिऊन स्वस्थ आहों. परंतु फौजेस व पाईदळास पोटाचें संकट पडलें आहे. देशचीं राजकारणें बहुत लागलीं होतीं व सांप्रतही आहेत.

---

श्री.

## लेखांक १०१.

१६९७ आश्विन वद्य ३.

पु॥ राजश्री लक्ष्मण आप्पाजी गोसावी यांसिः—

सु॥ सीत सबैन मया व अलफ. पा॥ हासोट हा माहाल कोपनीकडे दरमाहाचे ऐवजांत दिला होता. त्यास फतेसिंगाकडील ऐवज व राजश्री गोविंदरायाची वांटणी व फतेसिंग चाकरीस स्वारी-बराबर वगैरे जाबसालाचा फडशा करोन देतों. माहाल बक्षीस द्यावा, ह्मणून कारनेलानीं आड घातली. तेव्हां ऐवज सध्यां उपयोगास यावा वगैरे जाबसाल बोलून यावें या अर्थें पा॥ मारची सनद मध्यस्ताजवळ दिल्ही. ती सनद घेऊन ठेविली. जाबसाल तैसेच राहिले. ऐसी याची रीत आहे. व पा॥ अंकेलश्वर येथील पाऊण लाख रुपये मात्र सरकारचे कमाविसदाराकडून देवावे. त्यास, तेथें भे-स्तर शाहानीं ठाणें घातलें तें उठवावें. तरी जनराल विरुद्ध मानितील. याजकरितां तुह्मांस त्याचे जाबसालाकरितां सांगितलें होतें. त्यास, येविषींचा जाबसाल करोन पाठवणें. पाचे ठाणें सरकारचें सरकारांत द्यावयाविषीं तेथून पत्र पाठऊन देणें. जा-

णिजे. छ १५ शावान. बहुत काय लिहिणें? तुह्मीं प्रसंग पाहून करावें. येथून वरचेवर लिहितों हें सूचना मात्र समजणें. छ मजकूर.

( लेखनावधिः )

---

श्री.

## लेखांक १०२.

पो छ २६ सावान

१६९७ आश्विन वद्य ५.

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री लक्ष्मणपंत अण्णा स्वामीचे सेवेसी:—

पो रामचंद्र विठल कृतानेक दंडवत प्रणाम विनंति उपरि येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहित गेलें पाहिजे. विशेष. आपण गेल्यादारभ्य पत्र येऊन वर्तमान कळत नाहीं. तरी ऐसें नसावें. सदैव आपलेकडील वृत्त लिहित जावें. इकडील वर्तमान तरी श्रीमंत राजश्री पंतप्रधान यांची स्वारी बडोदियाहून निघोन छ ११ शाबानीं रणगडास रेवातीरीं येऊन दाखल जाली. श्रीमंत राव व सखाराम हरि गायकवाडाचे कारभाराकरितां मागेंच आहेत. आजपर्यंत खासा स्वारी या प्रांतें रहावयाचें कारण, सुरत अठाविशींत चिखल भारी, तोफा चालावयाचें संकट. दुसरा प्रकार: गुजराथ निर्वेध करावी, बडोदें—अहमदाबाद घ्यावीं, मसलती पुढें जाण्यास पृष्ठीं बल,या अर्थें राहिलों. त्यास फत्तेसिंग गायकवाड याचा कारभार कारनेल किटींग यांचे विद्यमानें जाला. पंचवीस लाख ठरले. एक महिन्यानीं पंधरा द्यावे. दुसरे महिनियांत दहा द्यावे. जर पहिल्या हप्त्याचे पंधरा न आले तरी बडोदें घेऊन द्यावें. याप्रमाणें करार होऊन कारनेलीचें जातखत लेहून घेतलें. त्यास पहिले हफतियाचे रुपये न आले. ऐवजाचे लोभास्तव केलें होतें तें न जालें.बडोदें घेऊन द्यावें, तेंहि किफायतच. त्यास, बडोदें घेऊन देईनात. त्याचा पक्ष करूं लागले. राजश्री गोविंदराव याशीं करार केला होता कीं, पहिल्या हफत्याचे न आले ह्मणजे बडोदें घेऊन देऊं. त्यासही भरंवसाच होता कीं, फत्तेसिंगास रु॥ मिळत नाहींत, दिवस काढितो, वाइयास जिंकोन बडोदें घ्यावें, याप्रमाणें होता. त्यास दोन्ही गोष्टी कराराप्रमाणें न जाल्या. दुसरा हप्ता होऊन गेला; पहिल्यास ठिकाण नाहीं ! तुह्मीही माहीत या गोष्टीस आहां. आजपर्यंत साडेसहा लक्ष मात्र अजमासें सरकारांत आले. वरकड ठिकाण नाहीं. तेव्हां इकडून निकड होत गेली. रुपया न मिळे. तेव्हां गोविंदरायास हिस्सा दौलतेचा तिसरा देतों, तिसऱ्या हिशाचे रुपये त्याजकडे सोळा लक्ष सासष्ट हजार साखे ऐशी देऊं. याप्रमाणें मध्यस्ताचे तर्फेनें त्रिंबकजी भालेराव बोलून गेले. पट्टण वगैरे ठाणीं, मुलूकसुद्धां, सरकारांत यावीं, गोविंदरायाची समजावीस करावी, बोलिले. त्यास, गोविंदराव मान्य नाहीं. सरकारांतूनही दोन तीन लाखांची कबूल केली असतां, त्याणीं वोढून, कूच करोन महीपार गेले. फत्तेसिंगाकडून ठाणीं सरकारांत यावीं, मग थोडेंबहुत सरकारांतून देऊन गोविंदरायास दाबून दबावून समजावीस करावी, तरी ठाणींही फत्तेसिंगाकडून येत नाहींत, हालीं गोविंदरायाचेच हवालीं करार, ऐसी दिक्कत करितात. सरकारचे रुपये दोहिशाचे ह्मणावे तरी, गोविंदरायानीं वसूल घेतला ह्मणून पर्याय लावितात. ऐवजास ठिकाण नाहीं पा हासोट हा महाल दरमहाचे ऐवजीं इंग्रजाकडे दिल्हा आहे.

तो बक्षीस कोंपिनीचे सरकारांत द्यावा ह्मणजे फत्तेसिंगाकडील ऐवज व तिजाई वांटणी व चाकरी वगैरे जाबसालाचें फडशे करोन देतों, ह्मणून कीटणीनें दरम्यान आड घातली. तेव्हां परगणेमजकूरची सनदहि करोन, मध्यस्त बोलणार त्यांजवळ दिल्ही असतां रुपये देत नाहींत व गोविंदरायाचा विभाग देऊन त्याची समजावीस होत नाहीं. ऐवजाचे लोभास्तव व मसलतीचा उपयोग पाहून कारभार केला. त्याची गत ही केली! हालीं आणखी अडीच लक्ष एक महिन्यानीं देऊं, ह्मणतात. गोविंदराव गेलेच आहेत. त्यांणीं मुलकांत उपद्रव केला ह्मणजे तोहि ऐवज त्यांचे वसुलांत गेला, म्हणतील. एवंच ऐवज नाहीं. पदरचे गोविंदराव फौज सुद्धां गेले. फत्तेसिंगाचे चाकरीचा उपयोग नाहीं. कीटणीचा आश्रय करून बसले. चहूंकडून मसलतीस पेंच पडला. खर्चाची वोढ, लोकांचा गवगवा, तो लिहितां पुरवत नाहीं. अहमदाबाद द्यावी; त्यास इंग्रेजाचें नेट कमी पडलें. गोविंदराव उठोन गेला, तो शहरांत गेला म्हणजे भारी पडेल, याजकरितां आपाजी गणेश यांनीं आपलेकडेच मामलत ठेवावी ह्मणून संदर्भ लाविला. तें कबूल करणें प्राप्त झालें. चार पांच लक्ष रुपये त्यांनीं द्यावेसें केलें आहे. परंतु ठाणियांत सरकारचें माणूस नाहीं. तेव्हां त्याचा अर्थ कळतच आहे. ऐसें चहूंकडून गायकवाडाचे कारभाराचे वोढण्यामुळें मसलत फसली. उपाय याजपुढें नाहीं. याजकरितां हें मजकूर जनरालासीं बोलोन काय करावें तेसला पुसणें. ऐवज येत नाहीं त्यापक्षीं फत्तेसिंगाचे महाल जप्त करून ४ रु. द्यावयास येतील. फौजेचे पोटाची सोय पडेल. याजकरितां त्याचे विचारास कसें येतें तें पुसणें. कारनेल सरकारचे उपयोगाचें तें करितो, म्हणतात. परंतु ऐसे प्रकार आहेत, समजत नाहीं. आजपर्यंत सोशिले. हालीं लोक उठोन जावयाचे विचारावरी आले. पैक्यास दर्शन नाहीं. भाषणाचेच प्रकार. बोलण्याचा धरच नाहीं. ऐसें आहे. रवाना. छ १७ शाबान. बहुत काय लिहिणें? लोभ असो दीजे. हे विनंति. कोणताही कारभार विल्हेस लागेना. बडोद्याजवळ खराब होत बसावें, याजकरितां श्रीमंतांनीं कुच करोन रेवातीरास यावयाचें केलें. चार दिवस श्रीमंत रायास मागें ठेविलें. कांहीं सोय पडली तरी पहावी, म्हणून ठेविलें. परंतु कोणतेंही घडत नाहीं. याजकरितां जनरालास सला पुसोन ल्यावें. बहुत काय लिहिणें? हे विनंति. जरी इंग्रेज श्रीमंताचे हुकुमांत असता, तरी फत्तेसिंगाचें कारभाराचा बखेडा न होता. गोविंदरायांसहि दाबून सांगावयास येतें. येथील गृहस्थाचे वोढण्यामुळें मसलतीची घाण झाली. तुम्हांस कळावें. बहुत काय लिहिणें? हे विनंति.

---

श्री.

## लेखांक १०३.

१६९७ आश्विन वद्य ७.

पुरवणी राजश्री लक्ष्मण अपाजी
गोसावी यांसि:—

सु॥ सीत सबैन मया व अलफ.

कारनेल कीटिण याजकडे पहिलीं सरकारचीं उंटें दोनसें होतीं. त्याजवरी मनस्वी वोझें लादून खराब केलीं. तीं मेलीं. हालीं बडोदियाहून कुच करोन यावयाकरितां पन्नास उंटें व साहासे बैल दिल्हे. ऐसें असोन, हालीं शंभर गाडे पा॥ डभाई येथील आणा-

वयाकरितां दोनसें माणसें पाठविलीं आहेत. अगोदर तेथें राहून परगणा खराब केला. प्रस्तुत याप्रों। करितात. कांहीं रीतीचा प्रकार राहिला नाहीं. कजीया करावा तरी दूर पहावें लागतें. याजकरितां तेथून यास पत्र येऊन सरकारचे हुकुमासिवाय वर्तणूक न करीत तें करणें. सर्वविषयीं वोढकता. तुह्मांस वाकफगारी आहे. दिवसें दिवस अधिक ओढितात. इलाज नाहीं । येविसी जनरालास पुसावें. मसलत काय सांगील त्याप्रों करावें. तूर्त मसलत तोंडीं येऊन बैद जाहाली. फौज व सिपाई दळ आहे, त्यास दरमहा पांच लक्ष रु॥ पाहिजेत. येथें तरी लक्षाची प्राप्त नाहीं. मोठें संकट पडलें आहे. कोठें इलाज चालत नाहीं. सिबंदीची नित्य कटकट पडली आहे. कसें करावें, तो विचार लिहिणें. जाणिजे. छ. १९ शाबान. बहुत काय लिहिणें. ( लेखनावधिः )

---

श्रीसांबः सपुत्रो.

( श्रीमत् रघुनाथराव )

## लेखांक १०४

१६९७ आश्विन वद्य ९.

रा। लक्ष्मण अपाजी यांसिः—

सु॥ सीत.

मिस्तर होम आला. हा दोहींकडे समजाऊन डाक बसवीलसें दिसोन येतें. यास्तव कारनेलीची वाईट गोष्ट पत्त्याशिवाय बोलूं नये. सांप्रत कारनेलावर वत्रहोम आला आहे. आतां याच्यानें वेडें वांकडें ओढवणार नाहीं. इतके दिवस ओढिलें, तव्हां कोणी दुसरा मुद्दई नव्हता. आतां चिंता नाहीं. परंतु, मिस्तर होम त्याचे हि बरेंच च्याहातो व सरकारचे कामावर हि नजर आहे. यास्तव कारनेलीसी वाद करूं नये. आपलयास कामासी गरज.

खरी हि गोष्ट असाक्ष असिल्यास बोलूं नये. तिची पंचाईत पडल्यास लटीक—वाद येईल. पत्तेवार मात्र बोलावी.

कितेक तपसील रामचंद्र चिटणिसाचे पत्रावरून कळतील. कारनेलीसी ओढूं नये, ह्मणोन लिहिलें. त्यास, आम्हीं गैरवाजबी तरी ओढीतच नाहीं. वाजबी हि कांहीं बोलतों. कांहीं किरकोळ बोलतच नाहीं. सालढालीखालीं घालितों.

एकूण पांच कलमें लिहिलीं आहेत. जाणिजे. छ २१ साबान.

( लेखनावधिः ).

---

श्री

१६९७ कार्तिक शु॰ १

## लेखांक १०५.

पु॥ राजश्री लक्ष्मण अपाजी गोसावी यांसिः—

सु॥ सित सबैन मया व अलफ.

अलाहिदा लिहिलें आहे तें जनरालाचे दुभाशास दाखऊन, त्याणें इंग्रेजी लिहिले त्यास दाखविल्यास तुमचे सांगितल्याचे दोष उडतील. लटीकवाद येणार नाहीं. व सरकारची मातबरी पोख्ती राहती. कारनेलीबराबर वाद केल्यास मातबरी राहात नाहीं; यास्तव पत्राची इंग्रेजी नकल करून त्याचे नजरेस पडे तें करणें. सुचक विचार लिहिला आहे, परंतु तुमचे युक्तीस येईल तसें करणें. तुमचे पत्रावर मोहर करून पाठविली दुभासियास प्रमा +++ सबब केली असे. जाणिजे. छ २९ शाबान.

( लेखनावधिः )

श्री.

## लेखांक १०६.

१६९७ कार्तिक वद्य २.

शेवेसी लक्ष्मण आपाजी कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना येथील वर्तमान ता। कार्तिक वा। २ शुक्रवारपर्यंत मु।। मुंबई स्वामींचें कृपेंकरून यथास्थित असे. विशेष बंगाल्याचा जाब अद्यापि आला नाहीं. जनराल कोसलदार रात्रंदिवस प्रतीक्षा करीत आहेत. मुदतीची अवधि तरी जाली. परंतु पत्र येऊन पोहोंचलें नाहीं. प्रस्तुतचे दिवस मुदतीपेक्षां अधिक जात आहेत. साऱ्यांचें लक्ष पत्राकडे लागलें आहे, आठरोजांत पत्रही येईल. इकडील विशेष वर्तमान पूर्वी सेवेसी लिहिलें आहे, अधिकोत्तर ल्याहावेंसें नाहीं.

महाराजांची स्वारी नर्मदा-दक्षण-तीरास आली हें वर्तमान रा। बज्याबा, चिंतो विठल, व बाळाराव नि।। सिंदे, यांसि सेवकानें व त्याकडील आपाजी साबाजी येथें आहेत, त्यांणीं लेहून पाठविलें आहे कीं, तुमचे संकेताप्रो। श्रीमंत नर्मदातीरास आले, सोनगडास पोंचल्या दाखलच. अतःपर तुह्मी विलंब न करतां सत्वर जाऊन सामील व्हावें, इंग्रजाचा पक्का भरंवसा आहे. ऐसीं दोन पत्रें पाठविलीं आहेत. महाराजानींही तिकडून याचअन्वयें पाठवावयाची आज्ञा करोन, ते लवकर येऊन सामील होत तें केलें पाहिजे. बाबूजी नाईक चौधेजन गावल्यानें दहा हजार फौज येईल. गुंता नाहीं. आपाजी साबाजीस शरिरीं समाधान नाहीं, याजमुळें राहिले. नाहीं तरी, यांसच पाठविलें असतें. अद्यापिही दोन चार दिवसांत किंचितसा उतार पडला ह्मणजे पाठवितों. जनराल यांची खातरजमा उत्तम प्रकारें करितील.

मुंबई सफा बारभाईचे हातीं लागेल, ह्मणोन बहुत दिवस वार्ता आहे. सत्यमिथ्या न कळे. माहाराजांजवळ बातमी, असेल ते खरी, श्रीं करोत कीं, हे गोष्ट खरी न होत. १

बंगाल्यांतून काम होऊन येतें हा मोठा भरवसा यांस. हे सेवकाची खातरजमाही करितात. व सेवकासही याचे ह्मटल्यावरून भरंवसा वाटतो. परंतु हुकूम बंगालेवाले याचे हातीं आहे. यास महाराजांनीं फौजेचा जम पडेल तितका पाडावा. राजकारणानें येतील ते लौकर येतले करावें.

गोविंदराव गायकवाड यांस कसेंही करून समजून आणावयाची आज्ञा व्हावी. सरकारचे सरदार व फौज आहे ते न फाटल्यानें आणखी राजकारणानें बहुत येतील. जुने रुसोन गेल्यानें येणार मार्गेपुढें पाहातील. यास्तव गोविंदरावसुद्धां सारे फौजेची एकत्रता राहेसी आज्ञा व्हावी. १

बज्याबा सिंदे वगैरे यांचीं राजकारणें. १

मेस्तर मास्तिनानें वस्त्रें घेतलीं नाहीं; बहुत आग्रह केला. तथापि पादशाची व कंपनीची आज्ञा नाहीं, ह्मणोन घेऊन मग सेवकाचे बिराडास पाठविलीं. बारभाईकडे लक्ष यामुळें न घेतलीं, ऐसा अर्थ नाहीं.

सरकारचेंही ममतेंत आहेत. १

येथें कोसलदारः—

१ मेस्तर ड्रेपर १ मेस्तर मास्टम १ मेस्तर फ्लेचर १ आशबर्नर १ मेस्तर रामसी १ गारडीन ब्रसऱ्याहून आला त्यासही कोसलांत घेतात.

य.स पत्रें सरकारांतून बहुमानाचीं यावीं. पत्रें आल्यानें यांस संतोष होतो व जनरालास ही फार गोड ममतापुरस्कर वारंवार येत असावीं.

इष्टोल यांस हजार माणसाची सरदारी जनरालानीं सांगितली. तें माणूस तयार होत आहे. पुर्तें तयार करावयासाठीं त्यास येथें बलाऊन घेतलें. अद्यापि येऊन पोहचला नाहीं. पोहचेल. तेथें जनरालाचे ममतेचे आणखी दोघेजण आहेत.

१ मेस्तर होम १ मेस्तर हाटली हे दोन आहेत. यांजपासीं अधिकउणें आज्ञा करणें असेल ते करीत जावी. उभयतां आपले प्रीतीचे ह्मणून जनराल सांगत होते. त्यांत मेस्तर हटली शाहाणा, खबरदार, मातबर आहे. हजार माणसाचा सरदार आहे.

गोवेंवाले फिरंगी याजवळ सरंजाम तयार आहे, ह्मणून ऐकिलें. त्यास, त्याजकडे युक्तीनें गुप्त पत्र पाठवून त्याचा शोध करितां त्यांजला सरकारचें एक पत्र पाठवावयाची आज्ञा कीं, कितेक आज्ञा लक्ष्मण आपाजी यांस केली आहे, हे तुह्मांस कळवितील, उत्तर लौकर पाठवून द्यावें., व याअन्वयें पत्र पाठवावयाची आज्ञा. पत्रांत स्नेहभाव बहुत असावे. १

राजश्री बापू व रामचंद्रजी आशिर्वाद उपरी. दर कुचास व दर लढाईस कारनेलींनीं अडवून मागावें तेव्हां कुच करावें. लढाईस कमी केली ऐसे, ऐसी नाना प्रकारें नालिश जनरालास कोणी समजाविलें ह्मणोन मेस्तर होमाचे गुजारतीनें किटणीनें श्रीमंतास विनंती केली, ह्मणोन विस्तारपूर्वक लिहिलें त्यास, कारनेल किटीण यांणीं बावापिराचें पुढें मात्र गाइकवाडाचे कारभारसमंधें जातखत लेहून दिल्हें असतां, कराराप्रों निकाल न केला हें गोष्ट लहान–मोठ्यास ठाऊक. हें मात्र जनरालासी बोलिलों. वरकड दरकुचांत अडवून मागितलें अथवा लढाईंत कमी केली, हें किमपी आपण जनरालापासी बोलिलों नाहीं. कारनेलीची नालिश मात्र तिळमात्र केली नाहीं. जनराल व कारनेल व मी तिघेजण स्वस्तिक्षेम आहों. जनरालास पुसावें. त्यांणीं नालिशी केली असें म्हटल्यास कारनेलीचें म्हणणें खरें आहे. कारनेलींनीं नाहक आमचा संशय धरून वाईट मानावें ऐसें नाहीं.

सखाराम हरीकडील जासुदासमागमें पत्रें रवाना केलीं असत.

---

श्री.

## लेखांक १०७.

१६९७ कार्तिक वद्य ४.

राजश्री लक्ष्मण आपाजी गोसावी यासिः–सु।। सीत सबैन मया व अलफ. नबाब निजामअलीखान यांचें सूत्र हुजूर आहे. परंतु फितुरी–यांकडे त्यांचें लक्ष. त्यास जनरालाचें पत्र नबाबास जावें कीं, आम्ही श्रीमंतांचा प्रतिपक्ष करितों, तेव्हां तुम्हीं श्रीमंतांचे नोकरांसी मिळोन झुंजास येणें हे गोष्ट उचित नाहीं, याजकरितां आपण फुतरि यांचा पक्ष सोडून श्रीमंतांचा उपयोग तें करावें, यांत उत्तम आहे, असें असोन आपण त्यासी मिळोन झुंजास येतील तर आम्हांस झुंजणेंच प्राप्त आहे. चिंता नाहीं, उचित तें ध्यानांत आणावें. याप्रों पत्र गेलियानीं कांहीं उपयोग पडला तरी पडेल. फितुरि यांचा पक्ष सोडतील, ऐसें दिसतें. याजकरितां याप्रमाणें त्याह्याचें जनरालाचे सलेस येत असलियास युक्तीनें पुसणें. त्याचे सलेस येत नसलियास, अगत्य नाहीं, जाणिजे. छ. छ १७ रमजान. लेखनावधिः

श्री.

## लेखांक १०८.

१६९७ कार्तिक वद्य १२ वृद्धिः

राजश्री लक्ष्मण अपाजी गोसावी यांसि. सुा सीत सबैन मया व अलफ.

तुह्मीं विनंतिपत्र व हैदर अल्लीखान यांचा खलिता पाठविला तो पावला. लाख रुाचे होन पाठविले आहेत ह्मणून मारानिलेनी लिहिलें आहे. जनरालांनीं तुह्मांस सांगितलेंच असेल. तरी ते वीस हजार पाचसे एकोणतीस दोन लाख रुपयाचे आले आहेत ते जनरालापासून घेऊन हुजूर पाठवून देणें. इकडील मजकूर कलमें:—

इंग्रेज़ी सामान स्वारी बरोबर होतें तें तुह्मांस दखलच आहे. त्यापों जखमी व आजारी होऊन गेलें व दारुगोळा भडोचेस राहिला. खानदेशांत जावयाचें योजिलें आहे. घाट चढोन गेलिया उपरी फितुरी मुकाबिलियास येतील. सामान पोख्त असलें पाहिजे, याजकरितां जनरालासी बोलोन आणखी सामान रवाना करीत तें करणें. सामान पोहोंचेतों परवानगीही येईलच.

येथील कुच-मुकामचा प्रकार याचे चित्तास येईल तेव्हां करावा, हें उपयोगीं नाहीं. येथील मर्जीनें व्हावें, हें उत्तम असें. कांहीं मर्जीनें चालतात, कांहीं ओढितात, केवळ ओढीत नाहीं. प्रसंग पाहून बोलणें नाहीं तरी चालतें हेंही तूर्त बरेंच आहे.

मेस्तर इष्टोर सरकारचे ममतेचा आहे· येथें असलियानें उपयोग. याजकरितां त्यास व वारलीस यास जनराल हुजूर पाठऊन देत तें करणें. फार न ओढितां मर्जीनें होईल तें करणें.

खासा स्वारी रणगडास रेवातीरीं आली. रेवेचेठायीं भक्ती व कलकत्त्याची परवानगीही येणें याजकरितां तेथेंच च्यार दिवस रहावयाचे चित्तांत होतें. परंतु कारनेलीनें पुढें चालावयाविसी आग्रह केला. ते समयींच त्यांस सांगितलें कीं, येथून कुच करणें, तेव्हां घाट चढून गेलियाखेरीज सोय नाहीं. फौजेस पोटास मिळालें पाहिजे, खानदेशचे सुमारें गेलियावरी च्यार रुपये पोटास मिळतील.याप्रों सांगितलें,तेव्हां मान्य केलें. हालीं तापीपार जालियावरी पुढें जावयास आंदेशा करितात. सामान यावयाचें आहे, ह्मणतात. परंतु परवानगीची वाट पाहतातसें दिसतें. याचें बोलण्याचें प्रमाण नाहीं. पुढें तुमची सलाह येईल तसें करूं. येथें पोटाचा मोठा पेच. शत्रू जवळ आहेत.

गाइकवाडाचा कारभार त्यांणी बिघडला. उभयतांचाही उपयोग चाकरीचा नाहीं व पैकाही नाहीं. ऐसें असोन याचीच रुष्टता हरएक विषयीं वाढून खटे व्हावें याप्रों याची रीत आहे. उपाय नाहीं !

ऐकूण कलमें पांच तुह्मांस कळावीं याजकरितां लिहिलीं असेत. समजोन, समय पाहून, बोलावयाचें तेंच बोलणें. सरकारचा उपयोग नाहीं, बोलून नाश, ऐसें असलियास न बोलणें.संमंध यासीच पडला आहे. जाणिजे. छ २६ रमजान. हैदर अलीखान याचे पत्राची नक्कल तुह्मांस पाहावयाकरितां पाठविली असे. छ. मजकूर लेखनावधिः

---

श्री.

## लेखांक १०९.

१६९७ कार्तिक शुद्ध १३.

पुरवणी राजश्री लक्ष्मण आपाजी गो यांसिः—

सुा सीत सबैन मया व अलफ. कारनेल किटीण तुह्मावर बहुत श्रमी जाहाला व आह्मावर तसाच जाहाला. सारांश आपलें कामही नाहीं. व याचा दोष मात्र जाहाला. कित्तेक गोष्टी गेस्तर होमाचे रुबरु केल्या. तेव्हां त्यासारिखेंच बोलला. त्यांत कुचास मागत होते. तेव्हां कुच करीत होते हे तर गोष्ट त्याणीं केलीच नव्हती. मग आह्मीं कशी केली ह्मणावी ? मजला निरोप देणार, दुसरा इंग्रेज कामावर आणणार, हेंही पुसिलें. तेंही नाकबूल गेलों. ऐसे किरकोळ मजकूर व काढावयाचा मजकूर कबूल जहालों. तेव्हां तुम्हाकडे लटीक वाद येईल, होम त्यास स्पष्ट लिहील, तेव्हां तुमचें बोलणें तेथें प्रमाण पडणार नाहीं. हा मोठा दोष आला. परंतु गायकवाडाचे कारभाराविसीं भीड धरली नाहीं. तेथें मात्र त्यास अर्धा ठास बसला. त्याविसीं त्याणीं बहुत पर्याय लाविले. जनरालाचा हुकूमच होता, ऐसेंही सांगितलें. सारांश, जबरदस्तीमुळें आपलें वाजवीही बोलणें शेवटास जात नाहीं. हबईचे, उपद्रवाचे वगैरे किरकोळ मजकूर कांहीं नाकबूल गेलों; कांहीं कबूल गेलों. किरकोळ मजकुराचा वाद सांगितल्यास आपल्याकडेच लघुत्व येतें. त्याचे उपकार बहुत. तेव्हां किरकोळ बोलतांच येत नाहीं. सारांश, तुमचें बोलणें जनरालास केवळ प्रमाण पडणार नाहीं. होम खरें करावयास आले. त्याची माया त्याजकडेच दिसते. जातीस जा प्रमाण पड शाहाणे आहां व येथूनही गायकवाडाचे मजकुरांत काइल केलें, याजमुळें तिसरा हिस्सा प्रमाणिक–पण राहील. पुढें तुह्मी आलियास हे संतोषी, यास्तव यावें ह्मणोन अलाहिदा पत्रीं लिहिलें आहे परंतु जनरालाची मर्जी तुम्हांवर बहुत संतोषी असिल्यास तेथेंच रहावें. यांत गुण फार आहेत. यास भय मोठें आहे. रुष्ट तरी जाहालेच. परंतु भयही आहे. ज्यापक्षीं राहणें त्यापक्षीं जनरालाचें पत्र आम्हांस यावें कीं, यास जावसालाबद्दल आह्मीं ठेऊन घेतलें ह्मणजे तेंच पत्र कारनेलास दाखऊं. तेव्हां दोष पडणार नाहीं. जनरालाची मर्जी बहुत तुह्मांवर प्रसन्न असलियास ऐसें घडेल तुमचे विचारे जसें बरें दिसेल तसें करणें तुमची नजरही बरीच चालते. येथील कच्चा मजकूर मात्र लिहिला असे. बडोयाहून जलदीनें रणगडास रेवातीरीं आलों. तेथें इंग्रेज व चिरंजीव राजश्री बाळ वगैरे सारे आठा दिवशीं आले. पुढें दक्षणेस चलावें, हा मजकूर बोलण्यांत ठरला. त्यांत गायकवाडाचा कारभार ठीक न जाहाला. दोघेही बराबर नाहींत व ऐवजही नाहीं. ऐसें जाहालें. यास्तव तो कारभार सुधरावयास आह्मी कारनेल यत्न करितों. होईल तें खरें. तपसील किती ल्याहावा ? कांहीं राजश्री रामचंद्र विठल चिटणीस लिहितील. अमीनखानाची नजर सुधी नाहीं. रा सदाशिव महादेव पाठविले, त्यासही उपद्रव जाहाला. प्रसंगावर नजर देऊन, आपाजी गणेशाची मामलत करार केली. च्यार रुपियांची नीशा ठरली. त्यांत अमीनखानानीं सिबंदीचें निमित्य ठेवून कारभार बिघडला. शेवटीं अमीनखानापासून च्यार रुपये घेऊन मामलत करार केली. सावकारी नीशा कांहीं दिल्हीं. तेही रुपये वसूल पडत

मसलतीस पेंच पडेल. यास्तव खानदेश-चे सरदेस भोडगांवपावेतों जावें, ऐसें ठहराविलें. कारनेल चलावें तर ह्मणतात. हुकूम आणवितों ह्मणतात. क्षेपनिक्षेप तरी बोलत नाहीं. रेवातीरींही राहूं देत नाहींत. असें अर्धोदकीं आलों आहों. जनराल अतंस्त त्यास काय लिहितात, तेंही पूर्तें समजत नाहीं. परंतु जनराल वगैरे कोंशलदार आमचे हितावर आहेत, हें जाणोन कुच तरी करितों. आठा दाहा दिवशीं भोडगांवाजवळ जाणार, ऐसें योजिलें आहे. पुढें ईश्वरसत्ता प्रमाण. येकही निश्चय करवत नाहीं. तुह्मीं तेथील इरद्र मनास आणून लिहिणें. जसें त्याहाल तसा डौल धरावा लागेल. येकही बोलणें इंग्रेजाचे शास्वत दिसत नाहीं. काय करावें तें लिहिणें. जाणिजे. छ ११ रमजान.

(लेखनावधिः)

---

श्री.

## लेखांक ११०.

१६९७ मार्गशीर्ष शुद्ध २

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री लक्षुमणपंत आण्णा स्वामीचे सेवेसीः--

पोष्य बाजी त्रिंबक कृतानेक साष्टांग नमस्कार विनंति येथील कुशल ता। मार्गसीर शुद्ध द्वितीयापर्यंत मु॥ उ × × × येथें समस्त सुखरूप असो विशेष. तुह्मां. कडून इतके दिवस वर्तमान कळत नव्हतें. त्यास, छ २० रमजानचीं पत्रें आलीं त्याजवरून परम समाधान जाहलें. ऐसेंच निरंतर पत्र पाठवून साकलें वर्तमान लिहून पाठवीत जावें. विशेष, तेथचा मजकूर लिहिला. त्यास वोढ फार. मागें दोन तीन महिने हजारप्रमाणें देत होते. हालीं पांचप्रमाणें दरमाहा खर्चास देतात. त्यास, आपण लिहिलें कीं खर्चाचा अजमास पाठवून द्यावा. त्यास, खर्चास अजमासें साहा साडेसाहा हजार रुपये खर्च दरमाहा लागतात. तरी फारकरून लोक दूर केले तरी इतका खर्च लागतो. आपणांस कळावें ह्मणोन लिहिलें असे. चिरंजीव यांस बरें वाटत नाहीं, ह्मणोन आपण लिहिलें. आतां बरें नाहीं. ज्वर निघाला ह्मणोन लिहिलें. त्यास सर्वश्व आपण तेथें आहेत. तरी समाचार त्याचा आपण घेत जावा. राजश्री बिसाजीपंत आपणापासीं आहे तरी त्यांचा समाच्यार घेत जावा. खर्चाची हलाखी फार, ह्मणोन चिरंजीवानीं लिहिलें आहे. तरी आपण श्रीमंतास विनंति करून चालिस पन्नास रुपये द्यावे. यजमानानीं न दिल्हे तरी आपण द्यावे. आह्मीं त्याहावें ऐसें नाहीं. परंतु सूचना मात्र लिहिली असे. आम्हीं येथें चाकरी केली ती रुबरु गांठ तुमची व श्रीमंत सौ॥ मातुश्री बाईसाहेबांची पडेल तेव्हां समक्ष सांगतील तेव्हां आपणांस कळेल. इतकें असोन चिरंजीव तेथें आहेत. उपरणें पांवरुणावांचून आबाळ. कारकुनाचा व त्यांचा वर्तमान आइकितों. तरी फार त्याहावेंसें नाहीं. सर्व भरंवसा आपला आहे. बहुत काय लिहिणें ? लोभ असो दिजे. हे विनंति.

---

श्री.

## लेखांक १११.

१६९७ मार्गशीर्ष शुद्ध ६.

राजश्री लक्ष्मण अपाजी गोसावी यांसः-

सु॥ सीत सबैन मया व अलफ. आलीकडे तुह्मांकडून विनंतिपत्र येऊन वर्तमान कळत नाहीं. मेस्तर टेलर याजकडून आजपर्यंत पत्र यावें तें कांहींच दिसत नाहीं. खासा स्वारी इंग्रेजी सामानसुद्धां

तापीवर सोनगडानजीक दाखल जाली. तमाम देशींहून राजकारणें आलीं आहेत. कोंडाईबारी चढतांच कितेक मुत्सद्दी व सरदार येऊन सामील होणार. त्यास, करनेल किटण म्हणतात कीं चिखली परगणियांत जाऊन रहावें. त्यास स्वारीचा रोख माघारा फिरलियानें मसलतीचा अनुपयोग, राजकारणें उठतात व परगाणियांत राहिल्यानें शौरत येक प्रकारची जाती. सरकारचे व इंग्रेजाचे एखलासांत दरज पडली, ऐशा कल्पना करोन फितुरी उमेदवार होतील. कितेक हुजूर येणार ते नाउमेद होवून केलेली पैरवी सोडतील- इत्यादिक नकसानी. याजकरितां येथून माघारे कुच होत नाहीं, म्हणून करनेलास साफ सांगितलें आणि जनरालास ये बाबेविसीं तपशीलवार लेहून पाठविलें असे. यांचे नक्कल तुह्मास मजकूर कळावा येतदर्थनिमित्य पा। आहे. तरी साधंत समजोन, जनरालासी बोलोन, बारी चढोन गुजराथ व खानदेश याचे दरम्यान भोडगांवावरी जावयाविसीं यास परवानगी येऊन पाठवावी. लढाईखेरीज दाबानेंच हतवीर्य होवून मसलतीचा उपयोग पडतो. तें काय निमित्य न करावें ? बारीचे आसपास राहिल्यास चिंताही नाहीं. देशांत दहशत पडोन फितुरी जमणार नाहीं ही तर मोठी सोय आहे.सहजांत न लढतां काम होतें, तें काय ह्मणून न करावें! जनरालाचे कुमकेनें मोठा आब वाढला. ऐसेंच न लढतां इंग्रेजी सामानसुद्धां पुढें गेलों तरी कोण्ही सन्मुख येत नाहीं. विरान जातात. ऐसा- प्रकार असतां करनेल परवानगीचा उजूर करितात. माघें फिरावयाविसीं दुराग्रह करितात. यांत सारी मसलत बिघडती. मिळविल्या यशाचा दाब कमी पडतो व चिखलींत राहिल्यानीं माटालही खराब होतो. ऐवजाची वोढ, येक जागा राहिल्यानें फौजेच्या पोटाची सोय नाहीं. हे सर्व अर्थ समजाऊन पुढें बोललों. वर्ले जावयाविसीं सत्वर यास परवानगी पाठवून देणें व तेथील वर्तमान अधिकोत्तर असेल तें लिहिणें, जाणिजे छ ४ सवाल.

( लेखनावधि.)

---

श्री.

## लेखांक ११२.

१६९७ मार्गशीर्ष शुद्ध ७.

सर्व मसलतीचा जिम्मा आपला आहे, तेव्हां कमकसर आपणच ध्यानांत आणावें. मसलतीचा मोहरा माघार फिरविलियानें लौकिकांत शौरत कैसी होईल ? व येणार नाउमेद होतील, ते फिरोन पळच्यावरी यावयास बहुत भारी पडेल. सबब आजी जलदीनें जबाब पाठवावा. येथपर्यंत आल्यानीं शत्रूवर बहुत दाब पडोन हतवीर्य जाहले आहेत. भोडगांवपर्यंत गेल्यानीं लढाईखेरीजच मसलत सुधरत आहे. आमचा भार सर्व आपणावर; तेव्हां ज्यांत या मसलतीचा उपयोग पडे, तेंच करावें; आणि येथील सरदारांत एकंदर परवानगी किरकोळ कामें दुचावानीं होतील तीं करीत जावी ह्मणून व खानदेशांत जाण्याची परवानगी पाठवावी. गुजराथेचे तोंडीं भोडगांव आहे, तेथपर्यंत जाण्याची परवानगी जरूर पाठवावी. इज्यानेब फौजसुद्धां व आपला सरंजाम तयार असलियानें फितुरी नाउमेद होऊन जमणार नाहींत, शरणच येतील. आणि एक जागा आपले माहालांत मुक्काम करोन राहिलों तरी आपले आमचे येकलासांत दरज पडली, ऐसें समजाऊन उमेदवार होतील. याजकरितां पुढें

यानें सोय आहे. वहुतेक कामें जालियांत आहेत. इंग्रेजी सामान न लगतांहि स्वारी-बराबर देशीं असलें ह्मणजे फितुरी सहजांत दाबानेंच फुटोन जातील. मुकाबल्यास यावयाचें होणार नाहीं. आह्मास सुचलें तें लिहिलें आहे. जसें तुमचे विचारें ठरेल तसेंच अमलांत येईल. कोणेविशीं दुराग्रह नाहीं. परंतु चिखलीकडे गेल्यास मनसुब्यास वांकडें पडतें. सबब तपसीलवार लिहिलें आहे. उत्तर पाठवावें. कारनेलीस हुकूम पाठवावा. छ २ सवाल.

---

श्रीशंकर.

## लेखांक ११३.

१६९७ मार्गशीर्ष शुद्ध १४.

राजश्री आण्णा स्वामींचे सेवेसीः—

विनंति. आपणास कळावें ह्मणून विस्तारें दोन बंद लिहिले आहेत. आपण देशांतील-हि साधनें केलीं. अपाजी साबाजीची खातरजमा करून रवाना केलें. फार उत्तम जालें ! आण्णा ! हरतऱ्हेनें तूर्त मसलत सेवटास न्यावी, हेंच लक्ष लागलें आहे. आपणही त्या प्रेत्नांत आहेत. सारांश, हरतऱ्हेनें जनरालास पलटवर आणावें. कोपशदार व जनराल कोपीन त्यांचीही पातशहा आदिकरून सर्वांची इच्छा तृप्त करावी. परंतु आपली मसलत सेवटास न्यावी. हें लक्ष जाते समईं कितेका प्रकारें तुह्मांसी बोलिलों आहों. सारांश, अण्णा ! हरतऱ्हेनें लडाई सुरुची परवानगी येई ते गोष्ट करावी. रात्रंदिवस ध्यास तुह्मांकडे आहे. गायेकवाडाची कुलकट व कोणाचे कोण हें पहावयाचें तरी गोविंदरावानीं ×××××× × × ×ले. ते गंभीराजवळ कारकूनच-राहिल्यामुळें × × ले. त्याची नकल आ-ह्मांजवळ होती ते पाठविली आहे. त्यावरून सर्व ध्यानास येईल. तूर्त आपली मसलत साधे ते गोष्ट करावी. तुह्मांकडे निजध्यास लागला आहे. मेस्त्र इष्टोर इंग्रज कितेक आह्मासी उमेदीच्या गोष्टी सांगून गेले आहेत. रामसिंग त्याजपाशीं आहे. त्याजला बलावीत जावें आणि यादीप्रा। वस्तावनी जिन्नस देईल तो मागावा आणि इष्टोला-पाशीं तरवार येथें होती. आह्मी मागत होतों.त्यास चुकोन समागमें गेली.सईफ आहे ते तरवार जरूर रामसिंगास सांगून मागावी. आरबी एक घोडा चांगला आह्माकरितां त्यास सांगावा. परंतु तरवार रामसिंगास ठावकी आहे. येथें आह्मीं मागितली. तेव्हां मेस्त्र होमास दिली, म्हणून सांगितलें. परंतु येथें कोणाही इंग्रजाजवळ तरवार राहिली नाहीं. सर्वांचें सांगणें कीं मेस्त्र इष्टो-लानींच माघारीं नेली आहे. त्याजवरून हें पत्र लिहिलें आहे. तरी ते तरवार ठि-काणीं लाऊन आणऊन पाठवणें. एक घ-ड्याळ जबाबी चांगलें, जबाबी म्हणजे तास वाजतात तें जरूर त्याजला सांगून मागवावें आणि जिन्नस येईसें करावें. आपण तेथें आहेत. कुटुंब आणविलें, म्हणून ऐकलें. फार उत्तम जालें. परंतु इकडील काळजी मात्र राखावी. आह्मी येथें सारी आणली ती मागती सुरतेस पाठवितों. तुमची पर-वानगी पुढें चालावयाची आली, ह्मणजे लाऊन देतों. वरकड वारंवार श्रीमंताचीं पत्रें आपणास जातात. आह्मी लिहितों न लिहितों सर्व तुह्मांस माहीत आहे. तेव्हां वारंवार काय ल्याहावें ? आवा सरदारा-कडे गेले होते. त्यांचीं वचनेंप्रों घेतलीं आहेत. सर्वांची नजर इंग्रजाचे अनकुलतेवर आहे. आवा गेलियानीं इतकें मात्र जालें जे सरदार दोघे सिंदे होळकर तिकडे जात नाहींत. तूर्त राहून, इंग्रजसह श्रीमंत आले

तरी खानदेशांत येऊन मिळतात. ऐसेंच वचन घेऊन आम्हा येणार. गोविंदरायाकडील घडेलसें फार केलें. परंतु घडलें नाहीं. त्याचें मूळ व फळ तरी खामखा येईल. नारोपंत येथें आहेत. मर्जीचे वगैरे सर्व ध्यान आहे तेंच आहे. देशांत तुह्मी केलें त्याचे व इकडील साधन जें पडेल तें पाहावें. येथेंही खटपट करीत आहों. खर्चाची मोठी ओढ आहे. कर्जवाम तरी दोन चार लाख मिळेसें करावें. हैदराकडील ऐवज मुंबईस आला आहे तोही सत्वर पाठवावा. दारू, सिसें व बंदुका एकंदर जरूर पाठवाव्या. लडाई सुरू जाली ह्मणजे इष्टोलास जरूर पाठवावें. परवानगी द्यावी. आपण तेथें आहेत. प्रसंग पाहून करणें तें करावें. केवळ येथील अर्थ तुह्मांस सर्व माहीत आहेत. वारंवार ल्याहावें, ऐसें नाहीं. गोविंदरावबावाकडील देवळाचे संमंधाचा ऐवज हजार रुपये घेऊन पाठविता. त्यांचें कार्य बनविल्या मनोदयानुरूप अण्णा! सर्व घडेल. चिंता नसावी. बनेल तैसें करावें. रा। छ १२ सवाल. बहुत काय लिहिणें ? हे विनंति.

---

श्री.

## लेखांक ११४.

१६९७ मार्गशीर्ष शुद्ध १४.

पुरवणी. राजश्री लक्ष्मण अप्पाजी गोसावी यांसि:— सु॥ सीत सबैन मया व अलफ. जनरालासी बोलोन जावसाल उगऊन व्यावयाचीं कलमें. ता॥:— पा॥

अंकलेश्वर येथील दरसाल पाऊण लक्ष रुपये कोपिनीकडे द्यावे, यामाणें करार असतां, तेथें मेस्तर शहानीं ठाणें बसविलें. दरोबस्त वसूल घेतात. त्यास पा॥ मारीं सरकारचे कादार असावे. पाऊण लाख रुपये मात्र कादाराकडून देवविले जातील. याचा जाबसाल करोन घेणें. या माहालचा रुपया सालमजकुरीं झाडून घेतला. हा याचे दरमहाचे खर्चात पडेल. मग रदबदली करितील. तेव्हां ऐकावयाचें नाहीं. कलम १ पा॥

हांसोटचा मा॥ तुह्मांस पेशजी लि॥ होता. त्यास, विश्वनाथ नारायण व नारो गोपाळ साक्ष देत ऐसें पक्कें असावें, ह्मणोन लिहिलें. यास, हे दोघे मध्यस्थ. याणीं सरकारचे जाबसाल उगवून घेऊं, मग सनद देऊं, यामों करार करोन घेऊन गेले. आणि सनद अटकाविली आहे. हे साक्ष देतील. व मेस्तर होम यासहि सांगितलें आहे. जावसालांत तफावत नाहीं. मेस्तर हटलीसही सांगावें, ह्मणोन लिहिलें. तरी ते दरबारास येत नाहीं त्याची गांठच पडत नाहीं तथापि बनलें तरी सांगोन पाठवूं. कलम १

गायकवाडाकडील ऐवज दहा लक्ष किंवा चवदा लक्ष कारनेलीकडे आहे ऐसें ऐकतों. साडेसाहा सरकारांत याणीं दिल्हे. बरकड याजकडे आहेत. तो ऐवज व्यावयाविसीं जनरालानीं कारभाऱ्यांस लि॥ आहे, म्हणून तुम्हीं दर्शविलें. त्यास यास विचारिलें. हे नाहीं म्हणतात. याजकरितां जनरालाचें पत्र घेऊन हुजूर पाठवाल तरी ऐवज देतील.

पा॥ भुतसर व बोहारी हे दोन्ही माहाल नेहमीं अगर दरमाचे ऐवजीं सरकारांतून दिल्हे नसतां तेथें जबरदस्तीनें मेस्तर रावगंभीर याणीं ठाणीं घातलीं आहेत. उठवावीं तरी ठाणीं घालणार येकीकडे राहातील. जनरालाचे चित्तांत विक्षेप येईल. याजकरितां उपेक्षा केली. त्यास, हें बोलोन दाहा महाल सोडून व्यावयाविसीं

ताकीद व्हावी. पैकीं चोहारीचा अंमल चंदररायाकडे चालला आहे. भुतसर मात्र बोलणें. चोहारीचा शोध करून लिहून पाठवूं. चिखली, वांसदें, बलसाड येथील जकाती गंभीरानें उठविल्या.

भाटे पा चौऱ्यासी हा गांव गायकवाडाकडील. तेथें तूर्त ठाणें घातलें व त्याचे जकातीसहि विक्षेप करितात. हे गोष्ट नसावी. सरकाराकडून उपेक्षा मुर्वतीनें होती. गायकवाड कलह करितील तेव्हां आह्मास शब्द जनराल ठेवितील. यास्तव हरयेक गोष्ट करारमदाराखेरीज होऊं नये. येविसीं बोलणें.

हैदरअलीखान याजकडील लाख रुो होन आले ते तुह्मीं जनरालापासून घेतलेच असतील. त्यांत शिसें व बंदुकाचे खरेदीस दहा हजारांचे ठेवून वरकड हुजूर पाठवणें. पेशजी सनद पाठविलीच आहे.

फत्तेसिंगास जितके रुजू करूं तितके रुपये देणें म्हणोन ताकीद पाठवणें तरी महिना पंधरा दिवस चालेल. सदरहू कलमें समजोन, व खतसीर बोलोन, जाबसाल करोन घेणें. वाजवीचे रीतीस चिंता नाहीं. तुम्हींहि युक्तायुक्त पाहून करीत असतां. जाणिजे. छ १२ सवाल. बहुत काय लिहिणें ? नरम तरी बोलावें परंतु स्पष्ट बोलत जावें. परिणामीं गोड वाटेल. खोटें येकंदर करूं नये, बोलूं नये हेंच, आमची मर्जी समजणें. तुम्हीं तेथें प्रसंग पाहून बोलणें व सत्यच बोलणें. जाणिजे. छ मजकूर.

---

श्री.

## लेखांक ११५.

१६९७ मार्गशीर्ष वद्य १.

पुा राजश्री लक्ष्मण अप्पाजी गोसावी यांसि:-

सुा सीत सबैन मया व अलफ. पाा हासोटचा मजकूर मेस्तर होम यासी बोलावा, व मेस्तर हाटली यासीहि बोलावा, म्हणोन तुह्मीं लिा. ऐशास, मेस्तर होम दरबारास येणें तें कारनेलीबाा येतात. येकट्याची गांठ पडत नाहीं. परंतु त्याचे दुभाशास सांगोन त्याजकडून त्यास सांगविलें आहे. व मेस्तर हाटली तो दरबारास येतच नाहींत. बोलवावें तरी ठीक नाहीं. तथापि त्यास हा मजकूर कळावयाचा येत्न करितों. जाणिजे. छ १४ सवाल.

( लेखनावधिः )

---

श्री.

## लेखांक ११६.

१६९७ मार्गशीर्ष वद्य ३.

राजश्री लक्ष्मण आपाजी गो यांसि:-

सु॥ सीत सबैन मया व अलफ. सुरतकर मोगल याजकडून सरकारची चौथायी येणें. त्यास, तो सुधामत देत नाहीं. येविशींचा मजकूर पेशजी लिहिला आहे. त्याप्रमाणें जनरालास समजावून जनरालाचें पत्र गंभीरास पाठऊन, मोगलास ताकीद होय तें करणें. हुजूरोनही गंभीरास सांगूं. परंतु जनरालाचें पत्र जरबेनें आल्यास गुंता पडणार नाहीं. जाणिजे. छ १६ सवाल. बहुत काय लिहिणें ? येथें ऐवजाची ओढ आहे ते पत्रीं किती लिहावी ? तुम्हास वाकीफच आहे व जनरालही अर्थ वाकीफ जाहाले असतील, सांप्रतच्या प्रसंगीं नारभाईचे फितुरांतून सर्वांस ओढा-

वयास फावलें. इलाज चालत नाहीं. बार-भाईशीं विरोध करावा कीं, हे किरकोळ लवाड्या करितात. त्यांशीं विरोध करावा, तेव्हां येकही सेवटास जात नाहीं. सारें विलग पडलें आहे. येक जनराल मात्र आमचे पक्षावर प्रबळ. याजमुळें आमची स्थित आबरू आहे. वरकड सारे लबाड्या करावयास तयार. यास्तव जनरालाचीं पत्रें कारनेलीस क्षेप—निक्षेप यावीं. फत्तेसिंगाकडील वसूल पडला. ऐवज देणें. तेरा लक्ष वसूल फत्तेसिंगाकडीलच कारकून सांगतात. दहा वसूल करनेल म्हणतात. साहेसहा अलीकडे. सरकारांत तफावत किती? यास्तव कारनेलीस पत्र जरूर जरूर पाठवावें. व गंभीरास व सुरतचे मोगलास अशीं ताकीदपत्रें पाठवणें. हुजूरही पाठवावीं. व निराल्याही ताकिदा जाव्या. जाणिजे. छ १६ सवाल.

---

श्री.

## लेखांक ११७.

१६९७ मार्गशीर्ष वद्य ६.

पुा राजश्री लक्ष्मण आप्पाजी गोसावी यांसि:—

सुा सीत सबैन मया व अलफ. शहर सुरत येथील चौथाईचा अंमल सरकारचा येणें तो सुरतकर मोगल सुरळित देत नाहींत. दिक्कत करितात. वाजबी चौथाईचे आकारपैकीं चौथाई ऐवज देऊन भरकबज सरकारचे कमाविसदारापासीं मागतात. ऐशास, सरकारांत वोढीचा प्रसंग! हरकसेंहि च्यार रुपये येऊन चालावें. त्यास, वाजबीचेच अमलास दिक्कत पडते. येविसीं जनरालास अलाहिदा पत्र लिहिलें आहे. तरी हें सविस्तर अर्थ तुह्मीं त्यासी बोलोन मोगलास व गंभीरास जनरालाचीं ताकीदपत्रें पाठवावीं कीं, वाजबी चौथाईचा ऐवज देत जावा, दिक्कत न करावी. याप्रों पत्रें सत्वर घेऊन पाठवणें. जाणिजे. छ १९ सवाल.

( लेखनावधिः )

---

श्री.

## लेखांक ११८.

१६९७ मार्गशीर्ष वद्य ९.

राजमान्य राजश्री भवानजी विसाजी यांसि:—

रघुनाथ बाजीराव प्रधान. आशीर्वाद. सुा सीत सबैन मया व अलफ. तुमचे निष्ठेचे अर्ज राजश्री लक्ष्मण अप्पाजी यांणीं हुजूर लिहिले तें कळलें. उत्तम आहे. तुह्मीं खातरजमेनें सरकारसेवा करीत जाणें. तुह्मास सर्फराज केलें जाईल. जाणिजे. छ २२ सवाल. आज्ञा प्रमाण.

( लेखनावधिः )

---

श्री.

## लेखांक ११९,

१६९७ मार्गशीर्ष वद्य १४.

पुरवणी राजश्री लक्ष्मण अप्पाजी गोसावी यांसि:—

सुा सीत सबैन मया व अलफ. हैदरअलीखान यांणीं बसालतजंगाची फौज लुटली. त्यास, बजिन्नस पत्रें हैदर नाईकाचीं व राजश्री बाजीराव गोविंद व विठ्ठल विश्राम यांचीं सरकारांत आलीं. त्यांच्या नकला करून तुह्माकडे पाठविल्या आहेत, त्यावरून कळेल. जाणिजे. छ २७ सवाल. बहुत काय लिहिणें?

( लेखनावधिः )

---

श्री.

## लेखांक १२०.

१६९७ मार्गशीर्ष.

व आपली फौज न फुटों देतां आह्मां तैसेंच मुंबईहून जाब येईतोंपर्यंत स्वरत राहावें श्रीकृपेंकरून तुमचे मनोदय खामखा सिद्धीस जातील. संशय न धरावा. बंगालवाले आमचें ह्मणणें ऐकतील. आम्ही केलें कर्म सिद्धी नेऊं. चिंता न करावी. हे गोष्ट गुप्त मनांत ठेवावी. गाईकवाड याचाही कारभार आहे तसाच असो द्यावा. मुंबईहून लिहिलें येईल तेव्हां सर्व समजेल. श्रीमंतांस कोणी कांहीं समजावील, हर एकाधी सला देईल, तरी कोणाचेंही ऐकों नये. याप्रमाणें ल्याहायासी सांगितलें. बारभाईची फौज व फतेसिंगाचे लोक एकत्र होऊन विश्वासराऊ यसवंताची लढाई जाहाली. दोनीशें माणूस विश्वासरायानें कापून काढिले. हें वर्तमान जासूद महाराजाकडे विश्वासरायाकडून पत्रें घेऊन येत होता त्याचे जबानीं ऐकोन उभयतां इंग्रजापासीं सांगितलें कीं, लढाई बंद जाहाली असतां बारभाईनीं व गायकवाडानीं मिळून सरकारचा अंमल कसा उठविला व झुंजले कसे ? हें ऐकोन आश्चर्य मानिलें व महमद इसफावर बसराईची फौज याउपरीं जाणार नाहीं हें त्याणीं सांगितलें. त्यास, हे इंग्रज अगोदर अन्याय कोणाचा होता हा लक्षांत धरितात. यास्तव अमीनखान अमदाबादेस गेले आहेत त्यांस, अमदाबादेचें कामकाज होणार नाहीं व इंग्रजाचा शब्द लागेल ऐसी वर्तणूक होऊं नये येविसीं अमीनखानास सूचना लिहिणें तैसी ल्याहावी. सबाह्य अभ्यंतर इंग्रजाचें लक्ष महाराजांकडे दिसतें. हे उभयतां कोपलदार गुप्त खलबत्ये आहेत. टेलर बंगाल्यास गेला. बाकी पांचजण मुंबइस राहिले. परंतु तिघेही फार शहाणे, समंजस व आपले मसलतीची चिंता करणार असे आहेत. या उभयतांनीं फार खातरजमा केली आहे कीं, त्यांस म्हटलें कीं, बंगालेवाले तुमचें न ऐकत, तेव्हां मग काय कराल, तुमच्या वचनावर आम्हीं फसावें कीं काय ? असें थोडेंसेंही बोललों. परंतु त्यांचें म्हणणें एकच, खामखा बंगालेवाले आमचें म्हणणें ऐकतील; फिकीर न करणें. याप्रों बोलणें जाहालें. मी जें त्यांसी कोंडून युक्तीचे वाटेनें काईल करून बोलिलों तें पत्रीं ल्याहावें तरी विस्तार होतो. यास्तव त्याचें बोलणें लिहिलें आहे. मुंबईस गेल्यावर सविस्तर सेवेसी लेहून पाठवितों. सेवेसी श्रुत होय. हे विज्ञापना.

टेलराची रवानगी करून मग हे मंबईहून निघाले. मुंबईकराचे हद्दत या

(पुढें मजकूर गहाळ.)

श्री.

## लेखांक १२१.

१६९७ मार्गशीर्ष.

राजश्री लक्ष्मणपंत अण्णा स्वामीचें सेवेसीः-

विनंति उपरी. इकडील वर्तमान श्रीमंतांचे पत्रावरून अवगत होईल. अमीनखान याची रवानगी अमदाबादेस तुह्मी येथें असतांच झाली होती. त्याउपरी जनरालाचें पत्र लढाई मौकूफ करावयाविसीं आलें. मशारनिलेस पाठविले ते फिरोन आणावयाचा पेंच युक्तीनें करणें तें जालें पाहिजे. याजकरितां आपाजी गणेश यांजकडून राजकारण हुजूर गेलें होतेंच. तेव्हां पांच लाख रुपये त्याजपासून घेऊन त्याजकडे अंमल सांगावा. याप्रमाणें करोन अमीनखानास समजोन सांगावें व आपाजी

गणेश याजकडून ऐवज द्यावा यास्तव राजश्री सदाशिवपंतांस श्रीमंतानीं अमदाबादेस पाठविलें. आपाजीपंतांकडून कराराप्रमाणें ऐवज न आला व अमीनखानाची सिबंदी फार चढली ती वारल्याखेरीज उठणें होत नाहीं, ऐसें दिसोन आलें. व अमीनखानाकडून लडाई मौकूफ करविली असतां, एक दिवशीं शहरांतून त्यांनीं याचे मोरच्यावर घालविलें. त्यास, इत्यादिक पेच पाहून, अमीनखानाकडे मामलत सांगितली. ऐशास आपाजी गणेशाकडून कारकून सदाशिवपंताकडे बोलावयास आले होते, त्यांस अमीनखानानें कैद केलें. बद्राहाची गोष्ट बोलावयास आले त्यांस धरणें युक्त नव्हे. त्याणीं तो त्यांच्या लबाड्या समजोन केलें असेल. परंतु सरकारचे आज्ञेशिवाय केलें तें कार्याचें नव्हे. परंतु उपाय काय ? दक्षणेकडे निघावयाचें केलें. याजकरितां उपेक्षा करणें प्राप्त जाली. इंग्रेजाकडून दोन तोफा खांबाइताहून खान मशार्निलेकडे देविल्या होत्या त्या माघाऱ्या देविल्याच आहेत; परंतु अमीनखान देतीलसें वाटत नाहीं. याजकरितां येविशींची सूचना जनरालास करावी. श्रीमंतानीं सविस्तर मजकूर तुम्हांस कळावे, याजकरितां लिहिले आहेत ते समजोन, युक्तायुक्त ध्यानांत आणून, तेथील मर्जी पाहून, व श्रीमंत सोनगडेचे सुमारें जातात, लडाई सुरूच होईल हें समजोन, जें बोलावयास युक्त तें बोलावें. केवळ पंचाइतीवर येऊन पडे तें. करावें. याजखेरीज आह्मांस आश्रय नाहीं. घासल्यानीं परिणाम काय हें आपणांस कळतच आहे. तेथें विस्तार काय ल्याहावा ?

राजश्री गोविंदराव गायकवाड सेनाखासखेल याजकडे सिनोर यावें ह्मणून जनरालानीं यास लिहिलें आहे, ह्मणून आपण श्रीमंतांचे पत्रीं लिहिलें, परंतु कारनेलीनें मजकूर येथें बोलिले नाहींत. वांटणीही देत नाहीं. ऐवज येत नाहीं. हा पेंच ! याजकरितां सोनगड—भोडगांवपावेतों जावयाचा विचार केला आहे. च्यार रुपये तिकडे तरी मेळवून फौजेस यावे लागतील. इंग्रेजास चिखलीपर्यंत जाणेंच होतें. सोनगडापर्यंत जावयाची परवानगीही याणीं आणिली आहे. भोडगांवापर्यंत गेलियानें सरकारची सोय, ह्मणून यासी बोलतो. हेही युक्तीनें परवानगी-पाणी लागतें याप्रों लेहून आणितो ह्मणतात. परंतु हें अंतर्यामचें बोलणें. याचें जनरालास कळूं न देतां पर्यायेंकरून पाण्याचें निमित्य सांगून त्याची परवानगी भोडगांवापासीं रहावयाची आलियास उत्तम आहे. घाटतोंडींच भोडगांव. गेलियानें फितुरी चढोन येतील. तेव्हां हे झुंजतील. अंगावर आलियास झुंजावें, ऐसी यास परवानगी आहेच. कजिया लागला ह्मणजे जनरालास मागून साहित्य पुरविणेंच लागेल. परवानगीही इतकियांत येतच आहे. त्याचेंही मानस तुह्मीं लिहिलें होतें कीं त्याजकडून कजिया लागलियास मग हे लढतील, निमित्य पाहतात. याप्रों आहे. त्यास तुमचे सलेस येईल तें करावें. हे दिवस लढाई सुरू व्हावयाचे आहेत. या दिवसांत पंचाईत न पडतां होईल तें करावें. कारनेलीची सरकारची पंचाइती पडली, ह्मणजे कामाचे वख्त विरुद्ध पडेल. सारे धारवट पहावे, लिहिणें तें तुह्मांस सर्व समजावें, या अर्थें श्रीमंत लिहितात. परंतु तुह्मी तेथील भावमर्जी पाहून कराल हे निशा आहे. कळावें. मजलाही श्रीमंतांची आज्ञा होती त्यावरून लिहितों. कळावें. रा॥ रावोपंत सुखरूप आ-

हेत. चिंता न करावी. बहुत काय लिहिणें ? लोभ असावा हे विनंति.

---

## लेखांक १२२.

१६९७ मार्गशीर्ष.

सं ठाऊक. त्या कोषलांतील मग गुंता काय ? त्यांचे बोलण्यावरून माझी खातरजमा पटत्ये कीं, बंगालियाहूनच कामें होऊन येत. दोनी महिने पुर्ते लागत नाहींत. त्यांत दहा दिवस टेलरास जाऊन जहाले. निमे वाट बंगालियाचा गेला. फौजेची खातरजमा करून जैसें गांठोडें आहे तैसें महाराजानीं जतन करोन राखावें. श्री कृपा करील. चिंता नाहीं. मी लौकर मुंबईस जातों. मजला चैन पडत नाहीं. सारा वेळ ह्याच उद्योगांत आहे. हे विज्ञापना.

---

श्री.

## लेखांक १२३.

१६९७ पौष शुद्ध ३.

राजश्री लक्ष्मण आपाजी गोसावी यांसि:—

सु॥ सीत सबैन मया व अलफ. फत्तेसिंग गायकवाड याजकडील तेरा लक्ष रुपयेपर्यंत आले, असें फत्तेसिंगाकडील कारभारी सांगतात. इंग्रेज दहापावेतों वसूल सांगतात. सरकारांत साडेसहापावेतों वसूल झाला आहे. कारनेल व होम दरबारांस आले, तेव्हां तुह्माविशीं जनरालानीं लिहिलें आहे, हा मजकूर सांगितला व फत्तेसिंगाच्या ऐवजाविशीं लिहिलें आहे. परंतु हुकूम आला नाहीं. कापड वगैरे जिन्नस आपले काय उपयोगी, ऐसा मजकूर लिहिला आहे. याजवरून अर्धी परवानगी तरी आहे. परंतु हुकूम नाहीं, ऐसें बोलले. ऐसियासी, आमची बहुत ओढ हें जाणून मागितल्यास कांहीं कापड वगैरे देतीलसें दिसून येतें. परंतु, त्याचा मजकूर कांहीं बोलण्यांत नाहीं. ऐवज आलाच नाहीं, ऐसें बोलतात. यास्तव त्यास निक्षूण ताकीद यावी कीं, जो जिन्नस फत्तेसिंगाकडील आला असेल तो बाजार—निरखाचे भावें देणें. त्याप्रों फत्तेसिंगाचे ऐवजांत मजुरा पडतील. सोनें, रुपें, कापड, जवाहीर जें असेल तें देणें, ह्मणून हुकूम यावा तेव्हां आह्मास प्राप्त होईल. दोन तीन लक्षांचा जिन्नस व नक्त मिळोन आल्यास महिनाभर स्वस्थ चालेल. नाहीं तर कांहीं अबरू रहातां दिसत नाहीं. नित्य दहा बारा हजार रुपये तलब चढते. पैशास ठिकाण नाहीं. बंगाल्याचे हुकुमाची वाट किती दिवस पहावी ? कारनेलीचा अथवा जनरालाचा दोष नाहीं. आपले दैवाचा दोष आहे ! याचा तपसील किती लिहावा? जाणिजे. छ २ जिलकाद. बहुत काय लिहिणें ?

( लेखनावधिः )

---

श्री.

## लेखांक १२४.

१६९७ पौष शुद्ध १२.

पुरवणी राजश्री लक्ष्मण आप्पाजी गोसावी यांसि:—

सु॥ सीत सबैन मया व अलफ. कारनेल आप्टण कलकत्त्याहून रवाना जहाले होते. ते पुणियास येऊन पोंहचले तेव्हां मसलती लांबेलसें दिसतें. त्यास, अपटणाची कांहीं दुराशा असली अगर सर जनराल कलकत्त्येकरास दहा पांच लाख कबूल केलियानें लडाई सुरू होऊन फितुरियाचें पुरतें पारपत्य होत असलियास जनरालाचे विचारें कबूल करोन मसलत शेवटास न्या-

वयाचें करणें. सध्यां आपटण आला आहे, त्यास याची दुराशा कांहीं आढळलियास, कबूल करावें. व कलकत्तेकराची दुराशा जनरालाकडून कळली तरी प्रसंगोपात्त दहा पांच पडती तरी कबूल करोन मोगलसुद्धां फितुरीं नेस्तनाबूद करावें. याप्रमाणें होत असलियास करणें. जाणिजे. छ १० जिलकाद. बहुत काय लिहिणें ?

हरयेक देण्यावेण्याची गोष्टी प्रयोजन पडल्यास करावी.उगीच कशास करावी ? येथें कारनेल ह्मणतात कीं आह्मी पहिल्या करारासिवाय कांहीं मागत नाहीं.इंग्रेजाचा स्वभावहि आहे कीं हरयेक कारभार पक्काच करावा. शंभरदां मागों नये, लटकें बोलों नये, ऐसें तरी आहे. तथापि बनेल प्रसंग तसा करावा. तुह्मांस आमची मर्जी विदितच आहे. इंग्रेजाची कारभाराची रीतहि वाकीफ जहाली आहे. तेव्हां बनेल प्रसंग तसें करावें. सारांश, आपलें काम मनोदयानुरूप होय तसें करावें. ज्या रीतीनें आपले मतलब साधतील व ओझें जड न पडे तसें बोलणें. छ मजकूर.

( लेखनावधिः )

---

श्री.

## लेखांक १२५.

१६९७ पौष वद्य ४.

राजश्री लक्ष्मण आपाजी गो। यांसिः—

सु॥ सीत सबैन मया व अलफ. तुह्मीं विनंतिपत्र पाठविलें तें पावलें. रा। गोपाल धोंडदेव याचें पत्र पाठविलें तें पावलें. ऐशास, मारनिलेचे पत्राचें उत्तर व ताकीदपत्रें पाठविलीं आहेत तीं त्याजकडे पावतीं करणें. राजकारणें पडेल तें करवणें. जाणिजे. छ १७ जिलकाद, बहुत काय लिहिणें ? ( लेखनावधिः )

श्री.

## लेखांक १२६.

१६९७ पौष वद्य ११.

पु॥ राजश्रीं लक्ष्मण आप्पाजी गोसावी यांसिः—

सु॥ सीत सबैन मया व अलफ. पौष वद्य तृतीयेचीं विनंतिपत्रें तुह्मीं पाठविलीं तीं छ २३ जिलकादीं पावलीं. विस्तारें मजकूर लिहिले, ते कळले. कलमें. त॥

हैदर नाईक व राजश्री भगवंतराव प्रतिनिधी याजकडील बातमीचें व अपटणाकडील वगैरे बातमीचें वर्तमान पांच सात कलमें विस्तारें लिहिलीं तीं सविस्तर कळलीं. याउपरींहि अधिकोत्तर आढळेल तें लिहीत जाणें. कलम १

सुरतेचे चौथाईविशीं जनरालास पत्र तुमचे लिहिल्याप्रों पाठविलें असे. तरी वाजवी चौथाईचा अम्मल द्यावयाविशीं मोगलास व गंभीरास ऐसीं पत्रें पाठवणें. कलम १

पेशजीचे कराराप्रों रुपये देणें अथवा जकातीची वगैरे हस्तबूद अंमल देणें ऐसें ल्याहावें. दोहींसहि आम्ही राजी. हस्तबूद अंमल दिल्यास तोटा जाला तरी आह्मांस कबूल असे.

प॥ चिखली, वासंदे, बलसाड येथील जकातीचे अमलाविशीं व भुतसर, बोहारी व भाटे यांची जप्ति गंभीरानीं केली त्याविशीं जनरालाशीं बोलिलों. त्याणीं सांगितलें कीं, गंभीर माहीत आहे, तो श्रीमंतापासीं गेला असे. तेथेंच जाबसाल होईल. ह्मणून बोलिले. त्याचा विस्तार लिहिला तो विदित जाला. ऐशास गंभीरानीं आलिया उपरीस सदरहुविशीं फार बोढिलें. तेव्हां पा। भुतसर हा महाल दरमहाचे ऐवजीं द्यावयाचें केलें. वरकड जकात वगैरे

वयाचा करार मशारनिलेनीं केला. हा मजकूर तुह्मीं जनरालास सांगणें. याउपरी दिक्कत पडणार नाहीं. पडली तरी लिहिलें जाईल. कलम १

अमलांत येईल तेव्हां खरें.

येकूण कलमें तीन. जाणिजे. छ २५ जिलकाद. बहुत काय लिहिणें ?

( लेखनावधिः )

---

श्रीशंकर.

## लेखांक १२७.

१६९७ पौष वद्य १४.

राजश्री लक्ष्मणपंत आण्णा स्वामीसः—

पोष्य सखाराम हरि साष्टांग दंडवत प्रा विनंति येथील वर्तमान ता। पौश वद्य चतुर्दशीपर्यंत सुखरूप जाणून स्वकीय कुशल लिहित जावें. विशेष. आपण पत्रें विस्तरें मजकुराचीं श्रीमंतास वद्य तृतीयेचीं पाठविलीं तीं एकादशीं पावलीं. आह्मांस संकलित हवाला देऊन चिठीमार्गें तरवारेचा ................................ ... कू. लेहून पाठविलीं, त्यावरून व सरकारचें पत्र पाहून सर्व कळलें. सारांश, तूर्त सर्व मसलत, अपटण आले, त्याजवर आहे. येविसींचें साधन जनरालापासून वगैरे जसें पडेल तिकडोन पाहून, अण्णा ! मसलत सिद्धीस जाई, तुमचे आमचे मनोदयें व श्रीमंताची इच्छा पूर्ण होये, ते गोष्ट हरप्रेतेनें, अर्थें, प्राणें, खर्च तुमचा आमचा जाला तरी करून, लढाईचीच ठरून, फितुरिभाचीं पारपत्यें घडेल ते गोष्ट, अण्णा ! करावी. मुंबईवाले जनराल यांचे हातून अपटण व मुंबईंतील कोशलदार व तेथील बंगालियांतून आले कोशलदार ऐसे लोभाविष्ट. पेशजीचे दारमदाराखेरीज आणखीही उमेदवार करून पल्यावर आणावे. बल्की, कलकत्तेवाले व कुंपनी यांचीही आणखी आशा दाखवावी. परंतु सर्व प्रकारें मसलत शेवटास न्यावी, हेंच घडवावें. सर्व मदार तुह्मांवर आहे. मसलतीचा मोहरा सर्व, अण्णा ! तुमचे माथां आहे. यशच घेऊन, आह्मां सर्वांत वरिष्ठता करून दाखवावी. तुह्मी प्रसंगानरूप समय पाहून बोलाल, कबूल कराल, तें श्रीमत् निभावितील. येविसीं सविस्तर कोठवरी ल्याहावें ? वरकड इकडील सर्व अर्थ, श्रीमंताचे आज्ञेचीं पत्रें आहेत, त्यावरून कळतील. वरकड सर्व राजकारणें वगैरे जीं साधनें त्यांचीं लक्ष्यें सर्वांचीं इंग्रजाकडे आहेत. याचे अनुकूलतेवर सर्व अनकूलता आहे. याणीं नेट मात्र धरावे. लढाई न पडतां महिन्या दोन महिन्यांत मसलत सिद्धीस जाऊन, सर्व लोभ इंग्रजांचे प्रविष्ट होतील. गुंता नाहीं. कळेल तैसी खर्चाची खातरजमा करावी. वरकड घराऊ मजकूर तरीः—तूर्त कारनेलीची बेमर्जी आह्मांवर आज च्यार पांच दिवस फारच जाली आहे. कारण कीं, गोविंदरायांचें बोलणें आह्मी बोलतों. यामुळें त्याचे मनांत विक्षेप वाढत आला. बारीक मोठे जाबसाल सरकारतर्फेचे करणें पडतात. यामुळें, वकिलीस बोलणार त्याणीं त्यांस मन मानेसें चिढविलें आणि तुफान उठविलें कीं, सखाराम हरीचे राऊत जाऊन कहीं मारितात. फितुरियाकडील बेरड वगैरे येऊन फौजा घाट उतरल्या. नवापुरावर पांच सात हजार फौज आली. तेव्हांपासून नित्य कहीवर चालवितात. एथें दोन तीन महिने गुजरले. चारा जवळ नाहींसा जाला. लांब जावें लागतें. एकीकडे कहीस रखवालीस जावें तों भलतेकडे दगा होतो. फत्तेसिंगाकडीलहि पें-

ढारी, राजपिंपळेवाले वगैरे यांचेहि राऊत फिरतात; परंतु सांप्रत फितुरियांकडीलच लोक येऊन, मारामार करून, कहींचे घोडे लष्करचे आजपर्यंत पांच सातें नेले. हालीं इंग्रेजाचे गाडे एकादशीस सुरतेहून येत होते ते लुटले. माणसें तोडलीं. फितुरियाचे पेंढार यांनींच कृत्य केलें. त्या समयीं लष्करचीं कहीहि पाडली. त्यांत माणसें दहावीस धरून नेलीं. तीं नवपुरास नेऊन सोडलीं. ऐसें असतां, आह्मांवरच तुफान घेतलें. सुरतअठ्ठाविशीचा अंमल गोविंदरायाकडे होता, तो फत्तेसिंगाकडे द्यावा, हे मोठी रदबदली कारनेलीची. इंग्रेजाजवळ गमाजी पाटील वगैरे कारकून. त्यांचे बोलणियावर फार. तेव्हां उत्तर हेंच कीं, फतेसिंगाकडील ऐवज झाडून पंचवीस लाख. पैकीं गोविंदरायास तिजाई मुलूक होता तो हिसा तरी सारा ऐवजाचा वजा करून, सोळा लक्ष सासष्ट हजारांचा भरणा करावा. ह्मणजे अंमल सोडितों. निदानीं तूर्त पांच लक्ष तरी द्यावे. पेशजी साडेसातपर्यंत पावले आहेत. त्याजकडील दहाचा भरणा जाला तो ऐवज अमानत तुह्मांजवळ आहे तो द्यावा. ते देईनात, ह्मणोन अंमल सोडिला नाहीं. गोविंदरायाचा अंमल कमाविसदार राखून सरकारांत वसूल आणविला. तूर्त वोढीस लाख पन्नास हजार रुपये घेतले. यामुळें इंग्रज आह्मांवर फारच रुष्ट, आम्हीच वडों देत नाहीं ह्मणोन, जाले. आणि हेनिमित्त मुद्दा पत्ता नसतां नाहक ठेऊन मारूं, हल्ला करूं, श्रीमंतानीं आम्हांस निरोप द्यावा किंवा सखाराम हरी घालवावे, पारपत्य करावें, नाहीं तरी आम्ही करितों, ऐसें अटीस आले. विलाज नाहीं! श्रीमंतही लाचार जाले! निरुपाय झाला! मोठें संकट सर्वांस प्राप्त झालें. केवळ निदानास गोष्ट आली. श्रीमंतही खरे लाचार जाले. तेव्हां पुढें प्रसंग जाला तो पुरवणीवरून कळेल. हे विनंति.

---

श्रीसांब. सपुत्रो विजयते.

## लेखांक १२८.

१६९७ माघ शुद्ध २.

पा। राजश्री लक्ष्मण अपाजी गोसावी यांसः—

सु॥ सीत सबैन मया व अलफ. थोरल्या मनसुब्याचीं शुभसूचनें लिहिलीं तीं कळलीं. बहुत आनंद जहाला. ऐसेंच दिवसेंदिवस शुभवार्तेचीच इच्छा आहे. कलम १

भूतसरचे पहिले लिहिल्याप्रों कलम पुसावें. उगेच दाबले आहेत. कलम १

हसोटचा मजकूर कारनेलीनीं उपक्रम केला. तेव्हां जवळ मेस्तर होमहि होते. त्यास काईल केलें. नारो गोपाळ व विश्वनाथ व त्रिंबकजी भालेराव जवळच होते. त्यांस काईल केलें. विश्वनाथ व नारो गोपाळ व त्रिंबकजी भालेरावहि पष्ट बोलले. तेव्हां, पाहिजे तरी हसोटची सनद अमानत आहे, माघारीं आणऊन देऊं, ऐसें बोलले. परंतु आह्मींच आणविली नाहीं. खटे मात्र होतात. जावसालांत काईल मात्र होतात. मिस्तर होमाचा दुभाषा लक्ष्मण आहे, तोहि जवळ होता. काईल केलें. पुढें सनद आणऊं. जलदी केली नाहीं. कलम १

जनराल व कोशल सारे मायेंत गोड बोलून, दिवसेंदिवस अधिक अधिक मेळवावे. त्यांची मर्जी किरकोळ मजकुरासाठीं खटी करावयाची नाहीं. युक्तीचे वाटेनें गोडीनें कायल करून होईल तितके जावसाल उगवावे. कलम १

मिस्तर हाटली दरबारास येत ना

आह्मीं बलावावें तरी कारनेल वाईट मानितील. त्याणीं यावें तरी तोच प्रसंग. यास्तव त्यास जनरलाचें लिहिलें आल्यास आठा पंधरा दिवसीं दरबारास येत जातील. माझी पूर्ती ओळखच नाहीं. सखाराम हरीची मात्र गांठ कधीं कधीं पडते. कलम १

हैदराकडील कागद लक्षाचे होन पाठविले ह्मणोन आला. होन तरी न आले येविसीं हैदर व बाजीरायास आह्मी परभारें लिहितों व जनरालानींहि ल्याहावें कीं, तुह्मीं लटीक श्रीमंतास लिहून लटीक वाद आह्मांकडे कसा आणिलांत. म्हणजे ऐवज फजीत होऊन पाठवीलच. आम्हास जनराल लटकें बोलणार नाहीं, हे खातरजमाच आहे. परंतु जनरालानीं त्यास फजीत करून ल्याहावें, हें बरें दिसतें. कलम १

आंकलेश्वराचे महालपों पाउण लक्ष द्यावे, ऐसें करारांत आहे. यांतच भाव आहे कीं, सरकारचे कमावीसदार असावे. निके रुपये मात्र यांस द्यावे. दुसरे उगऊन कलम लिहिलें नसेल. परंतु यांतच स्पष्ट भाव आहे. महाल पावणेदोन लक्षांचा आहे. त्याचा कमावीसदार राहिला तरी लक्ष रुो त्याणें आह्मांस द्यावे लागतील. तेहि त्यास नडच पडेल. तेव्हां सिबंदी वाढवून मनास येईल तसा खर्च वाढवितील. आणि ऐवज देणार नाहीं, हें कसें योग्य दिसेल? यास्तव कमावीसदार आमचा राहील. तो ऐवज पाउण यास पावते करील. येणेप्रों कलम १

दरमहाचे ऐवजांत बलसाड आहे. तेथें कमावीसदार आमचे असावे सबब कीं, कमाल बेरिजेस तोटा नफा आमचा. दरमहा ऐवज मात्र त्यांस निका द्यावा. त्यांचा कमावीसदार असिल्यास आम्हीं परगण्याची कमाल बेरीज दरमहांत धरूं तेव्हां त्यासच संकट पडेल. हे पेच समजवावे. कलम १

गोव्याकडील फिरंग्याकडील राजकारणाचा मजकूर जनरालाचे कानावर घालून त्याच्या विचारें जाहाल्यास करावें. कलम १

रा गोविंदराव गाइकवाड याचे जाबसालास तुह्मी माहित नाहीं, सबब त्याचे तर्फेनें कारकून पाठवावा, ह्मणोन नारो गणेश हजूर आहेत त्यास ताकीद केली. ते पाठवितील. तुम्हाजवळ येतील. त्यांची रुजुवात करून देणें. वरकड जाबसाल वाजबीचे रुईनें होईल तो करीत जाणें. गैरवाजबी पक्ष धरून गोष्ट कोणाचीहि न बोलणें. पत खरें बोलावयाची बहुत संरक्षण करणें. मोठें काम यांतच आहे. कलम १

खर्चाचा ताण मोठा बसला. कांहींच इलाज चालत नाहीं. किटिंग, फतेसिंगाकडील ऐवजाविसीं जनरालास लिहिलें आहे, जाब आला नाहीं, म्हणोन सांगतो. दोन तीनदां लिहिलें म्हणोन सांगितलें. याविसीं त्यास जरूर जरूर सांगावें. फौज पोटावांचून काय खाईल ? कलम १

सुरतेस बंदुखा वगैरे विकत घेऊं येविसीं एकंदर परवानगी गंभीरास यावी. कलम १

आपटणाची खबर नाहीं. कलम १

रा। छ २१. सवाल. शुक्रवार (लेखनावधिः) कलमें तेरा लिहिलीं आहत. पैकीं बेदरीचा चेंदूररायाकडे अंमल आला. पो छ २० जिल्काद.

---

श्रीशंकर.

## लेखांक १२३.

१६९७ माघ शुद्ध २.

राजश्रि लक्ष्मणपंत अण्णा स्वामीचे सेवेसीः—

पो० सखाराम हरी साष्टांग दंड-

वत प्रणाम विनंति येथील वर्तमान ता। माघ शुद्ध द्वितीयापर्यंत यथास्थित असे. विशेष. पूर्वीं आठा दिवसांत वर्तमान जालें तें अलाहिदा लिहिलेंच आहे. कारनेलीची बेमर्जी आह्मांवर त्यासीं कारणें तुम्हांस दिसतच आहेत. निमित्य, गाडे सुरतेचे वाटेवर येतां लुटलें तें तुमचे राव-तांनीं, हें ठेविलें. त्याचा मुद्दापत्ता कांहीं लागेना. फितुरियाकडील पेंढारी येऊन कहीं मारितात, हेंच गोष्ट पक्की दाखल्यांनीं पुरली. यामुळें विचारावर कारनेल आले आहेत. परंतु वारेवीराचे दुःख पेडवली याचें आहे. मसलत सर्व त्याजवर. याजमुळें मात्र सर्व सोसवें लागतें. विलाज नाहीं ! आह्मींही वोढिलें नाहीं. लाचारीस मात्र कूच करून चाललों. परंतु श्रीमंत येऊन माघारें आणिलें. आह्मी मानाजी शिंदे, वगैरे फौज मिळोन तफाव-तीनें डावे बाजूस उतरलों आहोंत. रात्रंदिवस ध्यास तुम्हांकडील लागला आहे. हरतरेनें अपटणास मोह जनरालाजवळोन पाडवावा आणि मसलतच सर्व सिद्धीस न्यावी. मूल खरें, याजवर भांडण भांडतील. तरी मुला-विर्सी इंग्रेजांनीं खातरजमा करून श्रीमंताचे वोटींत घालावें त्यास दगा पेंच नाहीं. परंतु फितुरियांचें पारपत्य झालें पाहिजे. त्याणीं मूल नसतां विनाकारण फितूर केला व दौलत गारद करून मोगलास दिली. पुढेंही लबाडी करतात. वचनें, प्रमाणें देऊन श्रीमंतांसीं बेमानी केली. पुढेंही इतबार नाहीं. त्यांचा अभिमान गैरवाजवी याणीं नच धरावा. ऐशी गोष्ट ज्या तरेनें होईल ते खटपट साधन आण्णा ! करावें. तुह्मी कराल तें येथें निभेल. परंतु सर्व मसलतींचा गुना तुह्मावर आला आहे. याचें विस्तारें कोठवर ल्याहावें ? इतके दिवस श्रममेहनत केलियाचें सार्थक निरार्थक होऊं न द्यावें. निदान जें मागतील तें इंग्रेजांस देऊं. राहील तीच दौलत करूं. परंतु नबा-बसुद्धां फितुरियांचें पारपत्य घडे तेच गोष्ट करावी. यांत श्री-मंतही कबूल आहेत. तूर्त लांबणीवर पडलें. येथें तापीतीरीं दोन महिने जाले. वैरण बारा पंधरा कोस, तेही मिळेना. महागाई, पोटास नाहीं. ऐसा पेंच जाला आहे. बारा पंधरा कोस कही जाती, तेव्हां फितुरियांकडील पेंढारी, बेदड व धाडचा राऊत निवडक येऊन कहीवर घालवितात. रखवालीस पथकें पाठवावीं तीं एकीकडे जाऊन दगा भलतीकडे होतो. त्यांतही नित्य फौजेनें जावें, हेलपटे, पोटास नाहीं. आम्हीं, मानाजीबावा आणखी एकदोन टोळिया, ऐसें बारीनें जावें. त्यांत घरकड गेले तरी दगाच होतो. मानाजीबावा, आम्हीं जावें, तरी नित्य पंधरा कोस जाणें येणें पडतें. फौज खराब होत चालली. सबब, हरतरेनें तजवीज करून येथोन दहा पंधरा कोस कुच चारापाणी पाहून सोनगडापुढें पूर्वेस घडे ते गोष्ट करून पर-वानगी पाठवावी. येथें बसलियानींच परि-णाम लागून फौज जगत नाहीं. येविर्सीचें साधन करून जरूर परवानगी पाठवावी. बारी चढोन गेलियांत सर्व मसलत सिद्ध आहे. मोठे हंगामाचे दिवस जातात. फितु-रियांकडील फौज गलबलली आहे. सर्वांचीं राजकारणें सिद्ध; परंतु बारी चढावी हें व इंग्रज काय करितात. इतकी वाट पाहतात. पुढें लढाई अगर फार दिवस मेहनत इंग्रे-जांस पडत नाहीं. सहजांत हें रुख मात्र होऊन खानदेशांत गेले ह्मणजे मसलती सिद्धीस जातील आणि सर्व गोष्टी त्याच्या व श्रीमंताचे मनोदयानरूप घडतात. [illegible] विर्सी तुह्मांस तिकडेही [illegible] च

येथून ल्याहावेसें नाहीं. सूचनाअर्थ लिहितों. वाचावयाचा कंटाळा न करावा. तूर्त कारनेलानीं फितुरियांवर रोष धरावा, त्याचे अपराध त्यास शासन योजावें; तें सोडून आमचेच गळां पडले. लाचार होऊन सोशीत आहों. श्रीमंतांचे मर्जीचाही दुसरा अर्थ नाहीं. कृपाच करीत आहेत. परिणामावरि सर्व नीट आहे. गायकवाडाचें आहे तसेंच आहे. कांहीं एक नवें घडलें अथवा घडणार नाहीं. मसलत ज्यारी जाली ह्मणजे श्रीमंतांचे चाकरीस फौजसुद्धां गोविंदराव यांस आणितों. येथील गुंता नाहीं. दुसरें तरी इंग्रजच होऊन राहिले आहेत. मेस्त्र इष्टोलाजवळोन आमची फर्मास व येक आरबी घोडा वळो करावयाला एक मागावा. रामसिंगास सांगत जावें. त्याचें वर्तमानही लिहीत जावें. बहुत काय लिहिणे ? कृपालोभ कीजे. हे विनंती.

---

श्री.

## लेखांक १३०.

१६९७ माघ शुद्ध ३.

राजश्री लक्ष्मण आप्पाजी यासिः—

सुहुर सन सीत सबैन मया. ग्रहणाचे आधले दिवशीं धवशा व हरी फडके भेटले. शत्रूस बहुत आव आला. धवशा नव्हता तेव्हां मध्यम होते, हालीं जबरदस्तीनें घाटाखालीं येऊन गांठ घालावी, हा त्यांचा विचार जाहला. सामान बहुत जहालें. तीस हजारपर्यंत जहालें. आमचें सामान थोडें. त्यांत भक्षावयास नाहीं. सबब वेदिल जहालें. कारनेल आठाची गोष्ट सांगतात व करितीलही. यशअपेश मनुष्याचे अधीन नाहीं. लोकदृष्टीनें आमची बाजू हलकी दिसते. लज्या रक्षील—दुसरा उपाय नाहीं. अंगरेजाची व आमची बेदी कर[illegible], सेवट बरा दिसत नाहीं. आतां मुंबईहून कुमक यावयास दिवसगत पाहिजे, लढाई तरी दोन च्यार पांचा दिवसां अलीकडे पलीकडे होईल. धवशा आला नव्हता तें आह्मीच लढतों, ऐसी बरावरी होती सांप्रत ते भारी दिसतात. इंग्रेज थोडे, [illegible] होईल तें पहावें. उपाय कांहीं सुचत नाहीं जनराल व सारे अंगरेज शहाणे म्हणो[illegible] वाटत होतें; परंतु या वेळेस आमची [illegible] जिती जाहल्यास त्यांचीही जहाली. अ[illegible] रूसी व प्राणासी गांठ आहे. अद्यापि अ[illegible] च्यार दिवस लागले तरी तुमची कु[illegible] आल्यास व कांहीं लक्ष दोन तरी खर्चा[illegible] आल्यास शत्रूचीं पारपत्यें होतील. नाहीं तरी मगची गोष्ट पत्रीं कशास ल्याहावी ! समजतच आहे. ते परिछिन्न गांठ घालि[illegible]तात. आमचे व अंगरेजी सामान [illegible] थोडें. खर्चास नाहीं, याजवरून सम[illegible] अंगरेज जनरालास लिहीत असतां [illegible] तर्तूद न केली, हें बारभाईचें पुण्य सम[illegible] दुसरें कारण दिसत नाहीं. मसलत मा[illegible] असतां सर्वही गमावलें. तेव्हां [illegible] अदृष्ट समजावें ! अतःपर काय वा[illegible] ल्याहावें ? आतां हिंमत सोडीन म्हटल्या[illegible] परिणाम दिसत नाहीं. सर्व भरवसा [illegible] चरणाचा आहे. दारू शिसेंही सामान [illegible] विल्यास कांहीं पाठवणें. आठच्यार दि[illegible] त्याणीं दम खादला व मुंबईचें [illegible] आल्यास मोठेंच काम होईल. दोहीं[illegible] येक फडशा होईल. आतां [illegible] नाहींसें दिसतें. जाणिजे. छ १ जिल्[illegible] बृहस्पतिवार. (लेखनावधि[illegible])

खास दस्तुरी पत्र याच मजकु[illegible] कारनेलीकडे दिल्हें आहे. तें ते जना[illegible]कडे पाठवितील. ते तुह्मांस देतील.

ः आहे. संशय येईल कीं, लखोटा
ला. तरी पत्र मोकळें दिलें आहे.
ल यांणीं वाचलें तरी चिंता नाहीं.
आहे. ह्मणोन मोकळेंच पत्र कारने-
ः दिल्हें. तें आगोदर पोंचलेंः असेल.
दुसरें पाठविलें आहे. जाणिजे.
रकूर. ( लेखनावधिः )

---

श्री.

लेखांक १३१.

१६९७ माघ वद्य ६.

जश्रि लक्ष्मण आपाजी गोसावी

—

ा सीत सबैन नया व अलफ.
अंकलेश्वर येथील पाऊण लाख रुपये
ठ इंग्रेजास द्यावे याप्रमाणें तहना-
करार असतां, मेस्तर राबट गंभीर
परगणे मजकुरीं ठाणें घालून झाडून
वंद केला आहे. त्याविशीं वारंवार
लिहिलें व गंभीरासही सांगितलें.
अंमल सुटत नाहीं. जनरालाची पर-
पाहिजे ह्मणतात. तहनाम्याखेरीज
करावयाविसीं जनरालानीं यास
ळें असें नाहीं. पावणेदोन लक्षांचा महाल
ा बसले आहेत. त्यास, तुह्मीं जनरा-
बोलोन माहाल सरकारचा सरकारांत
ाविसीं पत्र जनरालाचें गंभीरास
ीं. अगर सध्यां माहाल द्यावयाचा
ा असला, तरी लाख रु-
तऱ्ही परगणे मजकूरचे सरकारांत
येथें खर्चाची वोढ. कोठून ऐवज
यास जागा नाहीं. फौज पोटा-
हैराण आहे. दोन्ही प्रकारांतून को-
ो करून घेणें. माहाल सरकारांत
पाऊण लाख रुपये घेत जावे; अथ-
व्र रुपये सरकारांत सध्यां सालमज-
कूरचे द्यावे. पुढें कराराप्रमाणें अंमलांत ये-
ईल. व शहर सुरत येथील चौथाईची
बाकी सनवातची मोगलाकडे राहिली होती.
त्यास, मेस्तर गंभीराचे सुर्वतीमुळें निम्मेसिम्मे
सोडून देऊन ऐवज पेशजी घेतला. हालीं
सालमजकूरचा ऐवज वाजवी यावा त्यास,
सुरतकर मोगल निम्मे ऐवज देतो आणि
चौथाईचा दरोबस्त ऐवज पावला ह्मणून
कब्ज द्यावे ह्मणतो. गंभीरानीं ताकीद करावी
ते करीत नाहीं. याजकरितां हाही मजकूर
जनरालास समजावून एविसीं मोगलास व
गंभीरास पत्र पाठवावें कीं, वाजवी चौथाई-
चा ऐवज कराराप्रमाणें देणें. येणेंप्रमाणें पत्रें
पाठवून ऐवज पा[illegible] करणें. चहूंकडून नाना-
प्रकारचे लडेलट प्राप्त होतात. बाहेरील
मोगलाचा अंमल वंद करावा तरी गंभीर वाईट
मानितील. काय लिहितील नकळे. येथें तों
मसलतीचे लांबणीमुळें वोढ पडली तें लि-
हितां पुरवत नाहीं. ज्याचा भरवसा त्याज-
कडूनच विक्षेप होतो. उपाय नाहीं ! हें
सर्व जनरालांनीं चित्तांत आणून
सुधरावें हें उचित आहे. सर्व
भरंवसा त्यांचा आहे, ऐसें बोलणें.
तुमचीं पत्रें माघ शुद्ध षष्ठीचीं पावलीं.
त्यांचीं उत्तरें मागाहून समजोन लेहून
पाठवितों. जाणिजे. छ १९ जिल्हेज. बहुत
काय लिहिणें ?

( लेखनावधिः )

---

श्रीशंकर.

लेखांक १३२.

१६९७ माघ वद्य ८.

राजश्री लक्ष्मणपंत अण्णा स्वामीचे
सेवेसीः—

पोष्य सखाराम हरी कृतानेक सों
विनंती येथील वर्तमान ता माघ वद्य अ-

ष्टमीपर्यंत सुखरूप असो. विशेष. आपणाकडील माघ शुध द्वितीयेचीं व सप्तमी--नवमीचीं पत्रें आलीं तीं विस्तारें अक्षरशा सरकारचीं पाहिलीं व आह्मांस एक बंद पार्टीपोटीं व पुरवणीचा वर्ख ऐसें लिहिलियानें सर्व मजकूर समजला. अण्णा! आपण विस्तरें येथील मसलतीचे अर्थ ध्यानांत आणून काळजी करितां. येविसींचीं साधनेंही करितात, याचे प्रकार मजला विदित. आपणासारखे आपणच आहेत. परंतु यास तरी संशय नाहीं. मसलत पेंचांत पडली आहे. येथें उपाय नाहीं. गोष्ट बोलली आहे. सर्व श्रीमंतांनीं वरचेवर लिहिलेंच आहे. याउपरी कांहीं [illegible] सुचत नाहीं. व लिहवत नाहीं. सारे विलग अर्थ जाले आहेत. त्याहीही आपले आपल्यांत विरुद्धें वाढलीं आहेत. इंग्रज आह्मावर कारनेल किरण रुष्ट जाले आहेत. त्यास संबोधनास आपले थोरले ग्रहस्त सरकारबावा अनुकूल [illegible] रो गोपाल गोदादर्शनीं हे एकत्र हो[illegible] दिवस खलबतें करितात. श्रीमंताची मर्जी [illegible] सवत--मत्सरें वाढवावें. हें सर्व येथूनच [illegible]हे. यामुळें अर्धींच विलग. त्यांत हे [illegible]र्थ प्राप्त! तेव्हां बुडत्याचे पाय खोलीं, ऐसें जालें आहे. आह्मी येथें मुलें माणसें सुधा आहे. त्यास, कोणी आलिया संकटीं पडलों आहीं ऐसेंशास इंग्रजी स्थलें सुरत भडोच. याशिवाय कोठें जागा नाहीं. सबब जनरालासी पक्कें बोलोनें त्याचें आश्वासन घ्यावें. दोहीस्ते लाऊन हरयेक जागा ठेऊं. नंतरीं खातरेस येईल तिकडे जातील. त्यास मनाई न करावी. परवानगीनें ठेविली तैसी परवानगीनें जावी, ऐसें न करावें. बारीक मोठे पेंच सर्व ध्यानांत तुमचे आहेत. ल्याहावसें नाहीं. इतके अर्थास संभाळोन जें कर्तव्य तें करावें आणि अपटणास लेहून पाठवावें. वरकड गोविंदराव--बावाचे वगैरे मजकूर लिहिले ते सर्वांवर आहेत. येक श्रीमंताचे कल्याणाखेरीज बाकीचें नीट आहे. हे गोष्ट प्रमाणच आहे. त्यांतही साधन रदबदली करणें तितक्या करून ठेवाव्या. बावाची मर्जी करणें सर्व तुह्माखेरीज नाहीं. आपला ऐवज देवलाबाबत वेदरचे तलावरील गुतऊन ठेविला आहे. सांगाल त्याहाल तेथें पावता करूं. वरकड दरबारीं मसलतसमईचें कांहीं सुचत नाहीं. प्राणरक्षण कसें होईल हेंच सलाह पडलेलें आहे. अनुपत्यकालांत सर्व गोष्टी प्रतिकूल मसलतीस पडल्या आहेत. विलाज नाहीं. राजश्री आबा आले. ते आह्मी येक जागाच आहों. त्यामुळें नारिंगाची मसलतैक्य होऊन इंग्रज आह्मावर चिडविलें. त्यास सदाशिवबावा अनुकूल पडले आहेत. श्रीमंतास विनंती करून नारोपंताचें जाणें इंग्रजाकडे मना करविलें. त्यास त्या कामांतून काढिलें, हें समजोन कर्नेलीजवळोन रदबदली सख्त श्रीमंतासी करविली कीं, त्याखेरीज दुसरा कामांत नसावा. ऐसें केलें आहे. तेव्हां कर्नेलीचे मर्जीस्तव नारोपंत फिरोन कामांत घालणें प्राप्त. श्रीमंतांनीं अप्पाजीपंत निहाय नेमिले होते, परंतु आतां पुढें चालत नाहीं इंग्रज दाव धरूं लागले आहेत. मसलत विलग. त्यांत हे प्रकार बनले आहेत. ऐसे बारीक मोठे प्रकार किती ल्याहावे? नानाप्रकारचे पेच व कटकटी! कोणांत कोणी नाहीं! ऐसी गोष्ट जाली आहे. इतकेंहि सोसून आमचा निश्चय जो आहे तोच खंबीर प्राण जाईतों सुटणार नाहीं. प्राणाचा संकल्प घालोन श्रीमंताची सेवा आरंभिली आहे. त्याचा शेवट करावा. एक वेळ फितुरियांचें पारपत्य व्हावें. श्रीमंत दौलतीवर बसले ह्मणजे कृतकृत्य जालों. पुढें इच्छा दुसरी नाहीं, यांत संशय नाहीं.

कसेंही गुजरलें तरी श्रीमंताचे चरणाचें लक्ष व मसलतीचे शेवटास जाणियाचें ध्यान दुसरें कदापि होणार नाहीं, हे खातरजमा तुमची आहे व माझा निश्चय हाच यांत गुंता नाहीं. परंतु आढळले अर्थ लिहिले आहेत. श्रीमंताचे मर्जींत दुसरा प्रकार नाहीं, हे माझी खातरजमा. परंतु ज्याणीं जें समजवावें तें ऐकावें, हा प्रकार प्रारंभापासून आहे तो मात्र आहे. त्यास विलाज नाहीं. अस्तु ! श्रीकृपेनें मसलत मात्र सिद्धीस जावी, हेच काळजींत आहे. परंतु ऐशा बखेडियांनीं दुष्मन शेर होतात व कितेक येणारांसहि संशय पडतो. गोविंदराव गाईकवाडामुळें लोक दोष ठेवितील. आह्मासी इंग्रज असें चालल्यानीं श्रीमंताचा व इंग्रजांचा इतबार लोक कसा धरितील. हे मसलतीस विरुद्ध हें समजोन श्रीमंतांनीं आज्ञा निक्षून करावी, तें मात्र घडत नाहीं. अस्तु! दैवच मसलतीचे विलग, त्यास यत्न काय ? तथापि जेथवर होईल तेथवर प्रेत्न सेवक लोकांनीं करावा, यांतच श्रेयस्कर जाणून श्रम साहास करीत आहों. परिणाम लावणार श्री व श्रीमंत आहेत. बहुत काय लिहिणें ? कृपा लोभ कीजे. हे विनंती.

---

श्री.

## लेखांक १३५.

१६९७ फाल्गुन शुद्ध ८.

राजश्री लक्ष्मण अप्पाजी गो यांसिः—

सु॥ सीत सबैन मया व अलफ. एक दोन पत्रें तुमचीं आलीं, त्यांत जनरालाचे बोलण्याची खातरजमा लिहिली. आठ पंधरा दिवसांत लढाई सुरू व्हावयाचें होईल, झणून विनंति लिहिली होती. त्यास, येथें पत्रें पाऊन पंधरा रोज जाले. अद्यापि कांहीं दृष्टोत्पत्तीस येत नाहीं. प्रथम दिवस दिसतो. तापीतीरास तीन महिने एक जागा मुक्काम जाले. वैरणफांटें मिळावयाचें संकट. फौजेस रोजमरा नाहीं. पोटाचा गवगवा. लोकांनीं काय करावें ? पोटास तों पाहिजे ? त्याचे श्रम कोठपर्यंत पहावें ? तुमचे लिहिल्याचे तकव्यावरी पंधरा दिवस लोकांस उमेद होती. खर्चास असते तरी, चार दिवस अधिक उणे लागते तरी निभावलें जातें.याजकरितां हे प्रकार युक्तीनें जनरालासी बोलून, सत्वर येथून कुच होय तें करणें. खानदेशांत गेलियानंतर, चार दिवस मुक्काम तेथें पडले तरी कामास पडतील. घोड्या माणसांत बाकी राहिली नाहीं. घोडी खराब जाहलियाउपरी लढाईच्या उपयोगी तरी काय पडतील ? इत्यादि प्रकार सुचऊन जलदी होय तें करणें. हैदर—नाईकाचे ऐवजीं जनरालानीं रुपये देविले आहेत, म्हणून कारनेल यांनीं विनंति केली. सुरतेस राउत पाठवावें, म्हणून सांगितलें. त्यावरून तेथें राउत पाठविले. ऐशीं हजार रुपये गंभीरांनीं द्यावे. त्यास, रुपये नाहींत, पंधरा रोजीं पन्नास हजार देऊं, याप्रमाणें म्हणतात. येथें तों मोठें संकट, आजीचा दिवस गेला, प्रातःकालीं काय करावें, ऐसें प्राप्त आहे. गंभीर सरकारचे कामास नानाप्रकारें बोढितो. अलाहिदा पुरवणी—पत्रीं लिहिलें आहे, त्याजवरून कळेल. जाणिजे. छ ६ मोहरम. बहुत काय लिहिणें ?

(लेखनावधिः)

---

श्री.

## लेखांक १३३. (२)

१६९७ फाल्गुन शुद्ध ८.

पुा राजश्री लक्ष्मण यांसीः—

सुा सीत सबैन मया व अलफ.जावीत-जंग हरि बल्लाळ यास सामील जाले. परंतु नगर व अशेरी दोन किल्ले द्यावयास फुतुरियांनीं कबूल केले आहेत ते द्यावे, ऐसें जावीतजंग ह्मणतात. हरि बल्लाळ ह्मणतात कीं, एक लढाई मारा, त्यानंतर किल्ले देऊं. यामुळें दोघांची अट पडोन जावीतजंग दोन कोस रुसोन मागे फिरले, असें वर्तमान आलें आहे. दुसरें: जावीतजंगाचें बोलणें सारे फौजेनें माझें आराध्याचे आंत रहावें. फितुरी तें ऐकत नाहीं. हेही बातमी आली. जनरालास सांगावीसें असलियास सांगणें. जाणिजे. छ ६ मोहरम. बहुत काय लिहिणें ? बारभाईकडील बातमी लिहिली आहे. परंतु बाजार आवाई आहे. जाणिजे. छ मजकूर.

( लेखनावधिः )

---

श्रीसांबः सपुत्रो विजयते.

## लेखांक १३४.

१६९७ फाल्गुन शुद्ध ११ वृद्धि. राजश्री लक्ष्मण अपा गोसावी यासिः—

सुा सीत. आज करनेल किटिंग यांणीं साहित्यपत्र आपला कारभार स्थीर रहावा ह्मणोन मागितलें. त्यांत भाव स्पष्ट दिसोन आला कीं, दुसरा कोणी करनेल याचे जागा पाठवून यास तेथें नेणार. ऐसियासी याणें साहित्यपत्र मागितलें, तेव्हां आह्मास देणेंच पडलें. दुसरा प्रकार ह्मणावा तरी, हे आम्हासी खेचाखेची बहुत करीत होते. परंतु आमचें काम व्हावें, या पल्लयावरहि बहुत. यास्तव आम्हांस यास काढावेंच काढाव, हा आग्रह नाहीं. काढिले तरी हेच पाहिजेत, हाहि आग्रह नाहीं. जनरालाचा मर्जी दरकार आहे, कोणेहि प्रकारें काम सेवटास जावें. परंतु यांचे मुरवतीबद्दल पत्र देणें लागलें. हा प्रकार तेथें श्रुत करणें. दोहीं प्रकारांस आह्मी राजीच आहों. दुसरा येईल तोही ओढक मिळाला तरी हाच बरा. यास्तव कोणी अमीनादाखल आम्हांजवळ नेहमीं असावा म्हणजे आमचे मसलतीस सोय पडेल. हें पत्र बहुतच गुप्त लिहिलें असे. कोणास कळों नये. कळल्यास हे वाईट मानितील. यास्तव सावधपणें कानावर घालणें.जाणिजे. छ १० मोहरम. ( लेखनावधिः )

---

श्री.

## लेखांक १३५.

१६९७ फाल्गुन शुद्ध ११ वृद्धि. राजश्री लक्ष्मण आपाजी गोसावी यांसिः—

सुा सीत सबैन मया व अलफ. कितेक इंग्रेजाकडील पेंच व घरचेही कितेक आहेत ते वारंवारं कोठवरी ल्याहावे ? बाहेरील मनसबे तोडजोडी कराव्या त्या राहिल्या. घरांतीलच पेंच उलगडणें प्राप्त होतें. एक प्रकार असतां तरी ल्याहावयास येतें. नित्य नवेच प्रकार इंग्रेजाचे व किरकोळ. याजकरितां जनरालाकडील इतबारी आमचें बोलणें समजावयास येथें असलियानीं समजोन त्यास सांगेल. इकडेही समजावील. याजकरितां जनरालांसी बोलोन हर कोण्ही पाठवावा, म्हणून पेशजी तुम्हांस लिहिलें होतें तें अद्याप जालें नाहीं. तरी याउपरी जनरालासी बोलोन त्याचा इतबारी शाहाणा दुभाश्या ऐसा पाठवून देणें. मसलतीस लांबण पडली. खर्चाची वोढ, लोकांचे गवगवे त्यांत नाना प्रकारचे. हें कोठवरी सोसावें ? अथःपर मसलतीची गोष्ट सिध्धीस जात असलीयास उत्तम. नाहीं तर मुमईस उठोन यावें लागेल. सविस्तर मजकुराची आज्ञा करोन

बाबू कोलटकर यास पाठविलें आहे. याचे जबानीवरोन कळेल. संकलितार्थ, अलाहिदा पुरवणीपत्रीं लिहिलें आहे, त्याजवरून कळेल. जाणिजे. छ १० मोहरम. जनरालासही मोघमपत्र सविस्तर तुम्हांस लिहिलें आहे म्हणून पाठविलें असे. पावतें करणें. किरकोळ मजकूर वारंवार जनरालासी बोलावें, हें उचित नाहीं. परंतु येथें प्राप्त होतात तें तुम्हांस कळावें याजकरितां लिहिा आहे. युक्त समजावया योग्य तें सांगणें. मुख्यत्वें त्याचा ईतबारी दुभाशा प्रमाणिक येथें डेन्याजवळ राहून बाजबी त्यांस सांगे ऐसा आला म्हणजे लढे पडणार नाहींत. छ मजकूर. सरकारची जोडी कलकत्त्यास मेस्त्र टेलर याजकडे पाठविली होती. त्या जोडीबा जनरालास तेथून पत्र आलें तें पाठविलें असे. पावतें करणें. पुरवणीपत्र पाठविलें नाहीं. सविस्तर जबानीवरून कळेल छ. मा. (लेखनावधिः)

---

श्री.

## लेखांक १३६.

१६९७ फाल्गुन वद्य ३.

पु॥ राजश्री लक्ष्मण आपाजी गोसावी यांसिः—

सु॥ सीत सबैन मया व अलफ. मसलत लांबणीस पडली. खर्चास तोड नाहीं. याजकरितां इंग्रेजी सरंजाम सोडून, फितुरियांवरी चालून जाऊन, लढाई करावी, श्रीनें दौलत दिल्ही आहे तरी त्यास मारून घेऊन, नाहीं तर होणार तें होईल, ऐसें योजिलें होतें. परंतु, तातड न करावी, दोन लाख रुपये कर्ज देतों, म्हणून कारनेल हो[illegible] बोलिले. त्याउपरी गाहाणवट द्यावें, [illegible] दिक्कत घातली. सरकारांत गहाण टे[illegible] कांहीं नाहीं. हे जावसाल कर[illegible] च्यार रोज गेले, तों धोशा येऊन मिळाला. तें सबळ जालें. याजकरितां तोहि प्रकार राहिला. हालीं मसलत कांहीं सुचत नाहीं. तेविशींचे प्रकार अलाहिदापत्रीं विस्तारें लिहिले आहेत. कळतील. ऐशीं हजार जनरालानीं हैदरनाईकाचे ऐवजीं देविले. त्यापैकीं पन्नास आले. तीसहि आल्यादाखल. परंतु वोढ भारी. रोजमरादेखील जाहला नाहीं. कोठपर्यंत ल्याहावें? जाणिजे. छ १७ मोहरम. (लेखनावधिः)

---

श्री.

## लेखांक १३७.

१६९७ फाल्गुन वद्य ६.

राजश्री लक्ष्मण अप्पाजी गोसावी यांसिः—

सु॥ सीत सबैन मया व अलफ. अपटणाचें पत्र आलें. त्यांत भाव, गंगातीरीं यावें, ऐसा आहे. त्यास, जनरालाचे विचारास आली तरी नाजूक मसलत आहे. त्यास, पक्केपणें जनरालांची व मुंबईकर सारे इंग्रजाची अनुकूलता मात्र असली पाहिजे. त्याचा कटकणा ऐसा करावा जे, दारमदारांचें बोलणें हें [illegible] पक्ष समजोन होत नाहीं. तेव्हां [illegible] यांनीं त्यांचें वर्तमान ऐकिलें, [illegible] येथें येऊन [illegible] ऐकावें. त्यास, [illegible], यानंतर दिवसगत [illegible]. [illegible], देशीं तोड [illegible] कीं, [illegible] इंग्रजमुद्दां [illegible] श्रीगंगातीरीं [illegible] तेथें [illegible] निकडीनें [illegible]

राजकारणें आहेत त्यांचीं साधनें करून मेळऊन घेऊं. फौजहि जमा होईल. मुलूक मारून पोटासहि मिळेल. आमची मजबुदी जाली, ह्मणजे फितुरी सहजांतच पेचांत येतील. इंग्रजांसहि मेहनत पडणार नाहीं. मसलत सिद्धीस जाईल. परंतु या गोष्टीस इंग्रजाची अनुकूलता पक्की पाहिजे. कितेक राजकारणें येतील, त्यांत मातबरांची खातरजमाहि आंतून करावी लागेल. ही येक मसलत आहे. आमचा अभिमान धरून मसलत सेवटास नेणें व कांहीं अपटणांचेंहि मान्य करणें. त्यासहि साधन आहे. हा प्रकारहि बोलोन पाहाणें. फितुरी लबाड, कृत्रिमी, आह्मांस कैदेदाखल ठेवावयाची योजना करून अपटणांस अनेका प्रकारें समजावलें आहे. त्यांचा आंतील भाव बारीक अर्थ अपटणाचे ध्यानास आले नाहींत. सबब तुम्हीं जनरालापासून त्यास सुचवावें आणि या प्रकारची मसलतहि जनरालास कळवावी. हे अपटणास समजों नवें आणि मसलत मारावी. हाहि कटकआहे. तूर्त अपटणानीं लिहिलें, हें तरी प्रत्यक्ष डौल कैद करावयाचा आहे. तेव्हां इंग्रजाचे घरीं आह्मी आलों असतां त्याचे स्वाधीन आह्मांस करून कैद करवितात हे गोष्ट त्यांचे अभिमानास उचित कीं काय ? फितुरियांनीं कृत्रिम करून बाह्यात्कारें दाहा लक्षांचा खर्च चालवितों, ऐसें समजाविलें. इंग्रज आम्हांपासून गेले ह्मणजे ते आपले खेळास चुकणार नाहींत. हे सर्व अर्थ तुम्हांस माहीत आहेत. येविसीं विस्तर कोठवरी ल्याहावा ? सर्व मदार जनरालावर आहे. प्रसंगास तुह्मी तेथें आहां. कळतील तेशा तोडजोडी बोलाव्या. इकडेहि वरचेवर कळवीत जाणें. जाणिजे. छ २० मोहरम. (लेखनावधिः)

---

श्रीसाब सपुत्रो ४.

## लेखांक १३८.

१६९७ फाल्गुन वद्य ६.

पु॥ रा॥ लक्ष्मण आपाः—

सु॥ सीत. आपटण व बारभाईकडून सलूखाचा पैगाम आला तो अलाहिदापत्रीं लिहिला आहे. त्यावरून कळेल. केवळच एक—कली आहे. कैदेचा मजकूर आहे, हा आपटण समजला असेल किंवा नसेल. हजार राऊत व शागीर्द पेशा दोन—सें माणूस ते ठेऊन देणार. खर्च ते चालविणार. म्हणून उपकार. दाहा लक्षांतच सारें. परंतु त्याचीं माणसें ह्मणजे कैद, हें ते समजलेच नसतील. जनरालास सांगितल्यानें समजतील. त्यांचे मतें इंगरेजी काइद्याप्रों तीं माणसें आमचे हुकुमांत राहातील. तरी तसें नाहीं. कैदेचा प्रकार स्पष्ट दिसतो. दरमहा पंचवीस हजार ते धर्मादायाप्रों देतील तेव्हां देतील. ऐसा सलूख करून आम्हांस काय कर्तव्य आहे ? दौलत करावी ह्मणोन अंगरेजाचा आश्रय धरिला. त्यास, कैद ! तेव्हां दैव ह्मणावें ! तेव्हां हा प्रकार आह्मी कबूल करीतच नाहीं. जनरालही करणार नाहींतच. त्याची चर्चाच नाहीं. परंतु तहच करणें, तेव्हां भीमा, दुसरा गोदावरी, तिसरा गुजरात व तापी—उत्तर—तीर, देखील माळवा, ऐसें उत्तम, मध्यम, कनिष्ट प्रकारचा तह होईल तरी करावा. चवथा प्रकार तीनही होईनात, आह्मांजवळ तरी मसलत करावयास खजाना नाहीं, जनरालाजवळहि खजाना नाहीं, हैदर तरी पाठवीत नाहीं. चो महिन्यांनीं लक्ष आले तरी काय होणार ? तेव्हां एकटी गुजरात तरी निवळ आम्हांकडे असावी. परंतु हा तह पक्का नाहीं. गुजरातेंत गुजराण करून वर्ष दोन वर्षे राहूं. सारे दवलतीचा दावा आहे. तेव्हां याचा काढ

जनरालाचे हातून विलायतेस पक्का करावा. पातशाहा व कंपनी राजी करून, त्यांचा हुकूम हिंदुस्तानचे सारे जनरालास आणून मग आपले मनोरथ सिद्धीस न्यावे. गुजरात तरी फौजेचें व आमचें पोट भरावयास काल गुदराणीस पाहिजे. वरकड त्याणीं लिहिला प्रकार हा तर होणेंच नाहीं. याबद्दल मरण कबूल ! परंतु कैद पुरवत नाहीं ! निदानीं दहा लक्ष अंगरेज जनरालांनीं घेऊन आम्हांस रेवातीरीं भडोचेजवळ ठेवावें. रणगड बहुत मर्जीची जागा, तेथें राहून दाहाच घेऊं. परंतु त्यांचे कैदेंत राहाणें नाहीं. भडोचेजवळ रणगडास राहूं, तेथें वर्ष दोन वरीस स्नानसंध्या करून काल नेऊं. राजकारणें विलायतेंतील व हिंदचीं ज्यारी असतील, त्यांस अंगरेजांनीं मना करूं नये. अंगरेजाचे आश्रयानें राहाणें, म्हणोन त्यांचें संमत पाहिजे. रणगड भडोचेहून सतरा कोस आहे. तेथेंच नेहमीं राहूं. भडोचेहून साहित्य यावें. आम्हीही मजबुतीनें राहूं. दरमहा लक्ष रुपये म्हणजे बारांत खर्च चालवूं. गुदराण करून राहूं. डबाई वगैरे माहाल आहेत तो ऐवज बारांतच. हे केवळ कनिष्ठाहून कनिष्ठ प्रकार. परंतु तुटोंच लागले तरी जडावें, म्हणोन तुम्हांस लिहिले आहेत. हे प्रकार जनराल त्यांसीं पहिल्यानें बोलतील तरी कांहींच होणार नाहीं. ते खचतील. यास्तव निदानींचा विचार होईल तरीच बोलावा. नाहीं तरी तोंडाची वाफ गमाऊं नये. याखेरीज सिबंदीचें कम-तरीन पन्नास साठ लक्ष देणें आहे. याची वाट जाहाली पाहिजे. याचा विचार जाहला पाहिजे. कळावें म्हणोन सविस्तर लिहिलें आहे. हा प्रकार कोणासींच बोललों नाहीं. तुम्हांस मात्र च्यार पांच पर्याय सलुखाचे लिहिले आहेत. तेही खजाना नाहीं, लाचार आहों, स कमतीचा सलूख करावा लागतो. नाहीं तरी हे गोष्टच बोलणें उचित नाहीं. जाणिजे. छ २० मोहरम. (लेखनावधिः)

---

श्री.

## लेखांक १३९.

१६९७ फाल्गुन वद्य ७.

पारसी पत्र.

कारनेल अपटण यांस पत्र लिहिलें आहे त्याची नकलः—

तुम्हीं पत्र पाठविलें त्यांत तहाचा मजकूर लिहिला तो सर्व कळला. ऐशास, आमचा व इंग्रेजाचा तह जनराल व कोसल मुंबईकर यांचे मारुफातीनें कुंपनीचे मोहरेनसी करारमदार जाहाला तोच सर्वां इंग्रेजांनीं सेवटास न्यावा. आम्हीं कुंपनीचे सरकारांत करारमदार करून दिल्ह्याप्रों आमलांतही आणून दिल्हें. त्याजकडील आमचें कार्य राहिलें तेंही तहनामियाप्रों सेवटास नेतील हाच भरंवसा आहे. कदाचित् तफावत दिसोन आलिया विलायतेस जाणें प्राप्त आहे. पेशजी परस्परें तह ठरला आहे, त्याखेरीज दुसरा मजकूर कसा घडेल ? तुम्हीं बंगाल्याहून आलेत, ते परस्परें फितुरियाकडे जाऊन त्यांचें सांगितल्याप्रों मनमानेसें लिहिलें. तेव्हां कबूल कसें करावें ? आम्हांजवळ येऊन, आमचेंही वर्तमान मनास आणून, मग जावसाल करितां, तरी तुमची दूरदेशी व वाजवीची चाल नजरेस येती. येक-पक्षींच ऐकोन, आम्हांकडील कांहींच मनास न आणितां लिहिलें. यावरून अपूर्व दिसोन आलें ! त्यांणीं तहाचे मजकूर तुम्हांस सांगितले, त्यांतील दगाबाजीचे कुन्हे आहेत ते तुम्हांस समजले नसतील. सबब

असें आह्मांस लिहिलें ते गोष्ट मंजुर पडणार नाहीं. छ २१ मोहरम.

---

श्रीसांबः सपुत्रो विजयते.

## लेखांक १४०.

१६९७ फाल्गुन अखेर.

राजश्री लक्ष्मण आपाजी यांसिः—

सुहूर—सन सीत सबैन मया व अलफ. अपटणानें तह केला, हा शेवटास जाणार नाहीं. श्रीमंतांचा तह पडल्यासिवाय साऱ्या दौलतीस चैन नाहीं. बारभाई थकले. फौजेस यावयास रुो नाहीं. बहुत हैराण जाहाले. यास्तव कांहीं तह पाडावा, ऐसें, हरि फडके व आपा बळवंत वगैरे फौजेसमीप आहेत, या सरदारांचे मनांत आलें आहे. बातमी खरी आहे. अमदाबाद द्यावी, निदानीं सारी गुजराथ द्यावी, आणि तह पाडावा, ऐसें आंत वाटतात. येविसीं त्यांणीं पुणियाकडेही लिहिलें असेल. अपटणाचें संमत घेऊन आह्मासी बोलतील, ऐसें तह—कीक बातमींत वर्तमान आलें. ॥ .१७. हें आगाव पत्र तुह्मांस लिहिलें गुजरातेवर तह करावा किंवा न करावा ? गुजरातेपैकीं दोवे गायकवाडांचा कारभार पुणियास ठेवितील. सरंजाम्यांचे महाल आहेत. त्याविसींहि सलोखा करतील. तेव्हां थोडकेंच राहील. बहुतकरून इंग्रेजांनीं निवडक परगणे घेतलेच आहेत. तेव्हां दहा पांच सात कोठें निभ्वळ रहातील हें कळत नाहीं. आमचा भाव कीं, इंग्रेजास हुकूम बंगालियाचा अर्धा तरी आलाच आहे, बाकीहि श्रीकृपेनें येईल. विलायतेचाहि येईल. याणीं सारीच दौलत आमची कायम करून द्यावी, ह्मणजे आमचे नफे व इंग्रेजाचेही नफे आहेत. पुढें मोगलाचें पारपत्य करावें. त्यांत चवथाई देऊं. आमचे सरंजामी हरामखोर आहेत. त्यांचे पारिपत्यास अनकूळ असावें. तेथें दहला देऊं. एकूण इंग्रेजाचे बहुतच नफे. आमचे तरी आहेतच, कदाचित् तूर्त ( पुढें गहाळ ).

---

श्रीसांबः सपुत्रो ४.

## लेखांक. १४१.

१६९८ चैत्र शुद्ध १.

राजश्री लक्ष्मण अपाः—

सु॥ सीत. लौकर वाचून जनरालासी व आणिक मायेचे कोशलदारासी व इष्टोरासी बोलावे याविसीं मनन करून बोलणें.

इंगरेजी सरंजाम लढाईचा बंद. याजमुळें मनसुबा रुतणीस पडला. यास्तव नवाब निजामअली व धवशाचें राजकारण आह्मीं तयार केलें. त्याचीही अर्जी आहे. परंतु त्यास संवशय इंगरेजाचा आहे कीं, आह्मी श्रीमंताकडे जालों आणि बारभाईकडे अपटणाचे हुकुमावरून मुंबईकर इंगरेज जाहाले तरी मनसुबा सेवटास जाणार नाहीं. यास्तव जनरालांनीं खातरजमा करावी कीं, आह्मीं रघुनाथरावाचा पक्ष करूं, निदानी बहुत संकट पडलें तरी उगेच राहूं, परंतु बारभाईचा पक्ष धरणार नाहीं. असें लेहून द्यावें, म्हणजे काम होतें. विलायतेच्या हुकुमाचा पेच नाहीं. तो यावयास वर्ष पाहिजे. तोंपावेतों बारभाईचीं पारपत्यें होऊन दौलत कायम होईल. सविस्तर बोलून पक्कें करून ठेवणें. येविसीं सुरतकर मोगलाकडून धवशाची खातरजमा करावी लागेल व देऊं, करूं तें देतील. येविसींहि खातरजमा करावी. पुढें त्याजकडून तफावत होईलच, तेव्हां माघारें यावयास येईल. येविसीं सविस्तर बोलणें. कलम १

खर्चास नाहीं, ह्मणोन वारंवार तुह्मांस लिहिलें. फतेसिंगाकडील ऐवजाविषीं लिहिलें. त्यावरून जनरालासी ताकीद करणें आली कीं पावती पाठवून देणें. त्यावरून गळीं लागले आहेत. सा लक्ष भरणा कमपेश जाहाला, आणि द्वाहाची पावती मागतात. इतके दिवस मनास येईल तसा रुपया उखळला. सारे इंगरेज एकमत होऊन एक साक्ष देतील. आम्हीं तरी परिछिन्न पावती देत नाहीं. मनसुबा तरी, उरावर शत्रु. तशांत यासी वाद सांगणें प्राप्त. पावती यावी तरी च्यार लक्ष रुपये बुडवावे. येविसीं तोडजोड बोलून त्याचा कोणी इतबारी आल्यास आह्मांस चैन पडेल व च्यार रुपये मिळतील नाहींतरी नित्य कटकट कोठप रियंत करावी? त्यास तरी लोभामुळें सुचत नाहीं. दुसरा कोशलद्वारांतील अथवा गारद्दीन कोणी येता तरी आह्मास पेच न पडता. तूर्त दुहीरी पेचांत आहों. येविसीं वारंवार किती ल्याहावें? कलम १.

सर्व भरंवसा जनरालावर आहे. परंतु त्याच्या बंदीमुळें दुसरी राजकारणें करावीं लागतात. येविसीं हस्तें परहस्तें आमचें काम करूं, ऐसें पूर्वी जनराल तुह्मांसी बोललेच असतील. त्याच्या दस्तऐवजावर धरून बोलणें. जाणिजे. छ २९ मोहरम.

( लेखनावधिः )

श्री.

## लेखांक १४२.

१६९८ चैत्र शुद्ध २.

राजश्री लक्ष्मण अपाजी गोसावी यांसिः—

सु॥ सीत सबैन मया व अलफ.

धौशाकडील राजकारण आलें आहे. हा मजकूर पहिलाही तुह्मांस लिा।च आहे. व हालीहि अलाहिदा पत्रीं लिा। आहे. कळेल, तात्पर्य, मोगलाचें राजकारण अंगरेजाचे मध्यस्तीखेरीज बनत नाहीं. याविसीं मागें कच्ची खातरजमा अंगरेजाकडून जरूर जाली पा।. याचा प्रकार जनरालासी फार समजोन बोलणें. जनरालाकडून कार्य आमचें सेवटास जाईना. आपटणानें गुंता पाडिला ह्मणून मोगल अनुकूल करून घेणें प्राप्त जालें. व मोगल मागेल तें देणें प्राप्त. याचा संशय कदाचित् जनरालाचे मनांत येईल कीं, आपले मध्यस्तीनें मोगल अनकूल करून देविल्यानें श्रीमंत व मोगल येकत्र होऊन फितुरियाचें पारिपत्य करितील, आपण अभिमान धरिला असतां आपल्याच्यानें कांहीं जालें नाहीं, तेव्हां आपल्यास श्रीमंतांनीं जें देऊं केलें आहे तें प्राप्त होणार नाहीं, कंपनीचे सरकारचा नफा आपटणांनीं फितुरियापासोन ठराऊन घेतला असेल तोही बुडेल, तेव्हां मोगल अनकूल श्रीमंतांस करून देणें वाईट. असे चितांत आणून, मोगलाचे खातरजमेविसीं जनराल आमचे अनुकूल होणार नाहींत. अशी उगीच आशंका चित्तांत आली. म्हणून हा मार तुह्मास कळावयाकरितां लिा। असे. तरी असी आशंका तरी जनरालाचे चितांत न ये आणि मोगलाचे राजकारणाचे खातरजमेस जनराल अनुकूल होत, तसे तऱ्हेनें बोलोन धौशाची व निजामअलीची खातरजमा अलाहिदा लिा।प्रमाणें करीत तें करणें. तुह्मी शाहाणे व आमचे यख्तीयारी आहां. न तुटतां तोडजोड होईल तें करणें. जाणिजे. छ ३० मोहरम. ब्रहस्पतीवार.

( लेखनावधिः )

श्रीसांब: सपुत्रो ४.

लेखांक १४३.

१६९८ चैत्र शुद्ध ६.

अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य राजश्री लक्ष्मण आपाजी गोसावी यांसि:—

सेवक रघुनाथ बाजीराऊ प्रधान नमस्कार. सु॥ सीत सबैन मया व अलफ.

फतेसिंग गायकवाड याजकडील ऐवज सरकारांत द्यावयाविसींचा मजकूर जनरलाजवळ बोलिलों. त्यांणीं ऐवज द्यावयाविसीं किटिणीस लिहितों म्हणून कबूल केलें. लिहिलें असेल. त्यास, फतेसिंगाबाबतचा ऐवज जिन्नस व नख्त जें असेल तें किटिणीजवळ मागोन घ्यावें. न द्यावयाविसीं जनरलाचा आग्रह नाहीं, ह्मणून लिहिलें. त्यास, येथें किटिणीकडून गाईकवाडाबाबत नख्त तो एक पैसा देत नाहीं. कापड व जवाहीर मिळोन चाळीस पन्नास हजारांचें आलें आहे. त्यास, जवाहिरास विकून फौजेस पोसस यावें, तरी जवाहीर कोणी साहुकार घेत नाहीं. चाळीस पन्नास हजारांचें जवाहीर व कापड याणें फौजेस दुरोजा पुरणार नाहीं. जवाहीर गाईकवाडाबाबत गाहाण ठेवून कोणी ऐवज देईल तरी पाहूं. एकंदर ऐवज देत नाहीं. फार पुसिलें तरी दिक होऊन परवानगी आणवितों, अथवा खर्च जाहला, ह्मणतो. शुद्ध बोलतच नाहीं. + + येथें सरकारचा + + सरदार असावा. इंग्रजा + + + + पाऊण लाख + + द्यावें. नाहींतरी + + पाऊण लाख रुपये घेऊन सर + + लाख रुपये द्यावें. + + सरकारचा कमावीसदार ठेविला नाहीं. महाल पावणेदोन लाखांचा. यास इंग्रजांनीं लाख रुपये सरकारांत द्यावे. साल-मजकूरचें येणें. हा मजकूर जनरालासी बोलोन ते लाख रुपये मागोन घेऊन हुजूर पाठवणें. अगर, येथें किटिणीकडून देवावे म्हणून परवानगी जनरलाची पाठवून देणें. असो. अंकलेश्वर कांहीं अंग्रेजास दिल्हें नाहीं. पाऊण लाख रुपये मात्र दरसाल द्यावें, असा करार आहे. तोटानफा सरकारचा. हेंच आम्हांस पुरवलें. त्याचा आग्रहच असल्यास एक लक्ष रुपये सरकारांत मागावे. कलम १.

सारांष खुलासा मजकूर. हरप्रकारें पांच-चार, तीन, तरी लक्ष रुपये पाठवावे. कांहीं कुमक तोफा माणूस देऊन इकूर पाठवावा व लढावयाची परवानगी यावी-ह्मणजे सत्वर कार्यसिद्धि होईल. सरकारचीं कामें व जनरालाचीं. दुहेरी नफे होतील. आमची सर्व मदार जनरालावर आहे. सविस्तर बोलणें जसें पुढें सांगतील तसें करूं. परंतु खर्चाशिवाय फौज रहात नाहीं. नाकर्ते पण येतें.

कळावें हे विनंति.

सुरतकर मोगलाकडून चवथाईचा ऐवज येत नाहीं. याविसीं जनरालासी बोलणें त्यावरून जनरालाजवळ बोलिलो. त्यास जनराल बोलिले कीं, मोगलाचा मुलूक लष्करामुळें चोळटला, त्यास भक्षावयाचें मानसीक; याप्रमाणें बोलिलें, म्हणून लिहिलें त्यास येथें खर्चाची वोढ, फौजेस पोटास नाहीं, सबब दिलगीर. गाईकवाडाकडील ऐवज हि इंग्रजाकडून येईना. सुरतकराचा हा तपशील. फितुरियांची फौज बारी उतरली. हरिपंतांस ज्याबीतजंग धौशा मिळाला. तेथें ते जगले. त्यांची फौज बारी उतरली, सबब, सुरतअठावीशींतील अंमल झाडून उठला. रुपयास ठिकाण नाहीं. पोटाचा विचार कांहीं सुचत नाहीं. सुरतअठावीशींतील सरकारचे

परगणे व गायकवाडाकडील परगणे येथें ऐवज नेहमीं नेमणूक आहे त्याप्रमाणें परगणियांतून पावला. ज्याजती च येंदा घेतला. १

दोन लाख रुपये येथें इंग्रजांनीं कर्ज देतों ऐसें इंग्रजांनीं—किटींग व होम दोघांनीं हि—कबूल केलें आहे, म्हणून तुह्मास लिहिलें. परंतु बोलिले मात्र, पैसा एक दिल्हा नाहीं. पुढेंहि मिळत नाहींसें दिसोन आलें. कलम १.

सुरतेतील मोगलानें सालमजकूरीं जाजती च ऐवज दर परगण्यांत घेतला. कोठें नेमणुकेप्रमाणें घेतला. कमी तरी कोठेंही घेतला नसेल. परगणे चोळटले तरी त्यांस कांहीं तोटा नाहीं. सरकारची व गायकवाडीची मात्र नुकसानी. त्याचा ऐवज गुंतला आहे तो घेऊन जाजती च घेतला. याप्रमाणें रुजू करून देऊं. जनरालांनीं इतबारी पाठविल्यास होईल. गंभीर मात्र त्याजविसीं लिहीत असतील. त्याचा अर्थ तर्कानें समजावा. ऐवजाचा नफाच त्यास जाहाला. सरकारचा व गाईकवाडाकडील चौथाईचा अंमल सुरळीत होत नाहीं. पन्नास रुपये देऊन शंभराचे कबज मागतो. यास्तव आह्मी ऐवज घेत नाहीं. अगदीं वसूलच पडला नाहीं.

---

## लेखांक १४४.

१६९८ चैत्र शुद्ध ६.

निदानीचे पक्ष लिहिले आहेत. वाचून प्रसंगानुरूप बोलणें. आह्मांस तर भय प्राप्त जाहलें कीं, याच्यानें किमपि हुकूम अपटणाचा मोडवत नाहीं. पुढें हे तरी परस्वाधीन. काय करतील न कळे. तेव्हां आबरूवर आलें, त्यापेक्षां प्राण जातील तरी बरें. आबरू शत्रूचे हातीं न जावी. बरकड जें दैवीं असेल तसेंच खाऊन राहूं. सर्वस्वें बुडालों. आतां इतकीच इच्छा राहिली. लौकर बोलून पक्कें करणें. त्याची हिंमत कांहींच नसली तरी, भेट घेऊन, लागलेंच खर्चाची कांहीं बेजमी करून, होनावराकडे हैदराकडे पावते करावे. बोलून ठेवणें. रुबरूही येविसीं बोलणें होईलच. जाणिजे. छ ४ सफर.

(लेखनावधिः)

---

श्रीसांबः सपुत्रो ४.

## लेखांक १४५.

१६९८ चैत्र शुद्ध ६.

राजश्री लक्ष्मण आपाः—

सु॥ सीत. आजपर्यंत पत्रें लिहीत गेलों. तुम्हांस पावलींच. उत्तरेंही आलीं. सेवटीं निदानीं हे फळ दृष्टीस आलें. आतां कांहीं तोड दिसत नाहीं. आपटणानें आमची व जनरालाची व कोशलद्वारांची आबरूच घेतली. आह्मी तरी सर्वस्वें बुडालों. गुजरात अमदाबादेखेरीज सोडविली होती तेहि हातची गेली. परम दुःख! काय ल्याहावें? असो! सांप्रत येकदोन पर्याय लिहिले आहेत. त्यांचीं उत्तरें जलद यावीं. यामीं तुम्ही निदानीं जनराल कोशलांनीं करावें. पत्रीं काय लिहावें? तथापि लिहिलें असे. तूर्त जनरालाचें भेटीसच येतों. जनरालाची पुर्ती ममता व पुढें जनरालास औदेस पाहून आपलें काम करून घ्यावें. त्यास, त्याचे हातीं कांहीं दिसत नाहीं. जता आपटणानें ठराव केला तसेंच त्यांणीं लिहिलें. तोडमोड देखील नाहीं. पुढें आह्मीं तेथें राहिलों तेव्हां दुसरा हुकूम आला कीं यास चौकीचीं माणसें देऊन पुण्यास पाठवणें. तेव्हां यांणीं त्यास साफ ल्याहावें कीं, आमचे वरीं जो येईल त्यास दुसऱ्याचे हातीं देणेंच नाहीं. हा

तरी आमचा बच्याव होऊन भडोचेसच चार साहा महिने विलायतेचा हुकूम येई तोंपर्यंत पोटाची बेगमी करून ठेवावी. शागीर्दपेशा व हत्ती घोडे मिळोन दरमहा तीस हजार तरी पाहिजेत. यांत त्यांची मर्जी. खर्चाविशीं काय ओढावें? परंतु शत्रूचे हातीं परिछिन्न देऊंच नये, निदानीं यांचा उपायच नाहीं. लक्ष दोन लक्ष. निदानीं कर्जवाम तरी देऊन हैदराकडे तरी पोहचतें करावें. हरयेक बहाना करावा. मागें बळ राहील त्यासही पोहचाऊन द्यावें. पुढें कपाळीं असेल तें होईल. कलम १.

आंगरेजाप्रों थोर बलकट नाहीं म्हणोन त्यांचा पक्ष केला. सेवटीं आमचे कपाळानें घालविलें! येविशीं जनरलास काय शब्द ठेवावा? दैव आपलें! वारंवार जनरालास छळूं नये. दैव असेल तसें होईल. कलम किता.

दहा लक्ष सिबंदीसुद्धां बारभाई देतात. इतक्यांचेच परगणे डबाई वगैरे रेवातिरीं द्यावें. तेव्हां त्यांतच गुजराण करूं. दुसरा काय इलाज? निदानीं काशीप्रयागाकडे लाऊन द्यावें. प्रयागीं अथवा श्रीजवळ चित्तास येईल तेथें राहूं. दाहापांचाचे जें देणें तें तेथेंच परगणेच लाऊन द्यावें. याप्रों आपटणास लेहून करवावें. कपाळीं नसल्यास मग लटके हव्यास कशास करावे? पण शत्रूचे कबजात राहणें यापेक्षां जीव जाईल तर बहुत उत्तम! कलम १.

---

आज मारवाडांत निघोन गेल्यास वाट फुटेल. हजार पांचशें दोनसें चाकरीस तरी येतीलच. परंतु तुमचे लिहिल्यावरून यांकडेच आलों. यांणीं स्वस्थता करून ठेवावें. निदानीं हैदराकडे खर्चास देऊन पोहचवावें. कलम १.

सवासहा लक्षाचे जवाहीर गाहाण पूर्वीं ठेविलें तें माघारें आमचें आम्हांस द्यावें. यास खर्चासही द्यावयाचें न होय, तरी साहा लक्ष गाहाण घेऊन, पांच चार लक्ष खर्चास देऊन, हैदरखानाकडे पोहचतें करावें. काम न जाहलें तेव्हां जवाहीर आमचें माघारें देतील. बेइमान नाहींत हे तर खातरजमाच आहे. कलम १.

निदानींचे पक्ष लिहिले आहेत. वाचून प्रसंगानुरूप बोलणें. आम्हांस परम भय सांप्रत जाहालें कीं, याच्यानें किमपी हुकूम आपटणाचा मोडवत नाहीं. पुढें हे तरी परस्वाधीन. काय करितील न कळे. तेव्हां आबरुवर आलें, त्यापेक्षां प्राण जातील तरी बरें. आबरु शत्रूचे हातीं न जावी. वरकड जें दैवीं असेल तसेंच समजून राहूं. सर्वस्वें बुडालों! आतां इतकीच इच्छा राहिली. जाणिजे. छ ४ सफर, चैत्र शुद्ध शष्टी, सोमवार.

( लेखनावधिः )

---

श्री.

## लेखांक १४६.

१६९८ चैत्र शुद्ध १०.

राजश्री लक्ष्मण आपाजी गोसावी यांसिः-

सुा सन सीत सबैन मया व अलफ. फितुरी व धवशाजवळ कारनेल किटिण कूच करून जातात. धवशाकडील राजकारण लागलें आहे. त्याची वाट आठ दाहा दिवस पाहावी लागते. तिकडील राजकारण होतें न होतें. याजमुळें फौजेचा जथ राखिला पाहिजे. इंग्रज तरी कूच करून जातात. मुंबईचा हुकूम यांस एका महिन्याचा. त्यास, महिन्याचा दिवस तीन चार बाकी आहेत. दोन चार दिवस आम्हीं यांजवळ रजबदल करून मागितले. येकूण सात

आठ दहा दिवस आह्मांजवळ राहावें, असा करार करून घेतला असतां, मध्येंच कूच करून जाऊं लागतात. कारण कीं, फतेसिंगाकडील ऐवज यांजकडे दाहा लक्ष पैकीं सरकारांत सवासाहा लक्ष पावला असतां दाहाची पावती मागतात. न द्यावी तरी दबावून कूच करून जातात. पेंचामुळें उपाय नाहीं. दहा दिवस राहावें ऐसा करार करून घेतला असतां, पावतीची अडणूक दाखवून मध्येंच कूच करून जातात. सबब पावती देणें प्राप्त जाहालें. अडकून पावती घेतली. जनरालास व तेथील कोशलदार तुमचे मायेचे असतील त्यांस समजाऊन ठेवावें. अद्यापि पावती दिल्ही नाहीं. परंतु आज उद्यां निकडच पडली तरी द्यावी लागेल. जोंपर्यंत चुकेल तोंपर्यंत देतच नाहीं. इलाज नाहीं तेव्हां द्यावी लागेल. कांहीं तपसील लाऊन देऊं.यास तरी फतेसिंगाकडून तेराची भरती ह्मणोन फतेसिंगाकडील कारभारी दोन तीनदां बोलले होते. हे दाहाच पांवले ह्मणत होते. तीन वरते घेतले असतील. दाहांत साडेसाहा आह्मांस पावले. साडेतिहींची तफावत. लाख पन्नास हजारही नव्हेत. किती रुपये आह्मी द्यावे. आमचें लस्कर उपाशीं मेलें. आह्मांस व आमचें जनावरांस देखील चंदी मिळतां संकट. सांप्रत पाव चंदी देतों.ऐश्या समयांत हेही रुपये हातीं येत नाहीं. रुपयाविसीं दैवयोगच नाहीं. असो! येविसी तोड कशी करावी तें तुह्मींच विचार करून लिहिणें. तेथें प्रयत्न होईल तो करणें. हजुर आल्यापेक्षां तुमचें तेथें रहाणें बहुत उपयोगी आहे.सांप्रत आह्मांस जनरालाचें येथें येणें. जें देतील तेंच समजून राहाणें. नर्मदातीर भडोच आहे. तेथें राहाण्याचें मानस आहे. शहरापासून पावकोस अर्धकोस राहावेंसें मानस आहे. अथवा पेठेंत बनल्यास राहूं. सर्व भरंवसा त्याचा आहे. काय करितील ते करोत. सर्व हकीकत त्यांस जाहीर करावी. त्यासी प्रतारणा करावयाची नाहीं. जर धवशाकडील राजकारण सिद्ध जाहालें तरी श्रीकृपेनें जाहालेंसें समजतों. व्हावेंसें दिसतें. परंतु होईल तेव्हां खरें.आतां सर्व आशा सोडून तीर्थवास तरी करावा. जितकें खर्चास मिळेल तितक्यांत संवसार करावा. व्याप करून फळ नाहीं, तेव्हां कशास करावा? फिरंगी गोवेकर यांजकडीलहि राजकारण आहे. बनलें तरी करितों. हाही मजकूर त्यांचे कानावर घालणें. परंतु सर्वांमध्यें श्रेष्ठ अंगरेज. त्यांस सामील करून शत्रूची पारपत्यहि निमे जाहलीं असतां, फिरोन हिसका बसला. तेव्हां वैराग्य ही प्राप्त जाहालें. तुह्मी त्याहाल तसें केलें जाईल. शत्रूचें हातीं न जावें इतकेंच पुरे. तीर्थवास, उत्तम स्थल, इतकें मात्र पुरे. जाणिजे. छ ८ सफर.

---

श्री.

## लेखांक १४७.

१६९८ चैत्र शुद्ध १३.

राजश्री लक्ष्मण अपाजी गोसावी यांसिः-

सु॥ सीत सबैन मया व अलफ.

कारनेल किटीण याचे वाकडेपणाचे अर्थ सरकारांतून तुह्मांस लिहित गेलों त्याप्रों जनरालासी बोलला असाल. त्यास, हाली कारनेल सरकारांत वाकडेपणा दाखवीत नाहीं. तरी कोण्हेविसीं जनरालासी याचे वर्तणुकीचे भाव न बोलणें. कळल्यास रुष्ट होतील. याजकरितां बोलला असाल ते बोलला. पुढें एकंदर न बोलणें. सरकारचें जवाहीर साहा लक्षाचें गाहाण ठेविलें आहे. त्यास, सरकारचे फौजेस पोटास द्यावयास ऐवज नाहीं. याजकरितां [illegible]

हरतऱ्हेनें बोलोन, जवाहीर हातास येईल तें करणें. म्हणजे हरकोठें गाहाण ठेऊन फौजेस रोजमुरा द्यावयास येईल. जाणिजे. छ ११ सफर. बहुत काय लिहिणें ? कारनेलीचा रंग पाहून, मागाहून लिहिलें येईल त्याप्रो बोलणें. छ मजकूर.

(लेखनावधिः)

---

श्री.

## लेखांक १४८.

१६९८ चैत्र वद्य ५.

राजश्री लक्ष्मण आपाजी गोसावी यांसिः—

सुा। सीत सबैन मया व अलफ. धौशाचे विद्यमानें नबाब निजामअलीखांचें राजकारण आलें आहे. परंतु, जनरालाकडून खातरजमा पा।, त्याविशीं जनरालाशीं तुह्मीं बोलिलेंत, त्यांनीं उत्तर केलें तें सविस्तर लिहिलेंत तें समजलें. त्यास ये गोष्टीचा अर्जू धौशाची फार आहे कीं, जनरालाकडून पक्की खातरजमा असावी कीं, पक्ष करणें तरी श्रीमंताचाच करूं, हें न घडे तरी फितुरीयांकडे कदापी होणार नाहीं. असें लिहिण्यांत यावें व कोणी आमचा विश्वासूक सुरतेस येईल त्याची तेथेंच खातरजमा व्हावी. असे भाव आहेत. त्यासी येविशीं जनरालांनीं धौशाचे नांवें पत्र पाठवावें कीं, श्रीमंतांचें वडिलांचें बोलणें ठरेल त्याप्रो तुह्मी त्यांचे उपयोगीं पडावें, इकडील संशय कोणेविषयीं न धरावा, आह्मी पुरंदरकर यांचा पक्ष करणार नाहीं, कोणेहि औशीं त्यांची कुमक करणार नाहीं, खातरजमा असों देणें. म्हणून पत्र आह्माकडे पाठवावें. हा उत्तम पक्ष. हें न घडे तरी, याच अन्वयें आमचें तऱ्हीं नांवें पत्र पाठवावें कीं, धौशे व नबाब निजामअली यांनीं तुमची कुमक केलिया आम्हांस खुशी आहे. त्यांचे हातें आपलें काम करून घ्यावें. पुरंदरकरांची कुमक आह्मीं कोणेही औशीं करणार नाहीं, असें पत्र साफ यावें. आणि गंभीरास येक पत्र जनरालाचें यावें कीं, धौशे व निजामअली यांकडील कोणी तुम्हांकडे भला माणूस आला तरी तुम्हीं खातरजमा करणें कीं, पुरंदरकरांची कुमक जनराल व आह्मीं करणार नाहीं, फुरसत पडली तरी श्रीमंतांचीच कुमक करूं असें पत्र सुरतकरांस यावें. ह्मणजे या कार्याचें साधन पक्कें जालें. धौशाचें पत्र साफ आलें आहे. त्याची नक्कल करून पाठविली असे. तीच जनरालांस वाचून दाखवावी. मजकूर गुप्त ठेवावा. मुख्य पक्ष धौशास जनरालाचे खातरजमेविशीं बिनकिलाफ यावें व गंभीरास हि लिाप्रो यावें. जर धौशास पत्र नच देत, तरी आमचे तऱ्हीं नांवें पत्र लिाअन्वयें यावें. हें जलद करून पाठवावें. धौशाचे मजकुराविशीं सरकारचें पत्र पावलें ह्मणून जनराल ह्मणत होते, असें तुमचे लिहिल्यांत. त्याजवरून तुमचे लिाप्रो जनरालांस पत्र पाठविलें असे. हें त्यांस देऊन, धौशाचे खातरजमेचें पत्र लिहिल्याप्रमाणें जें येईल तें घेऊन सत्वर पाठवणें. जनरालांस पत्र लिहिलें आहे. त्याचा मसोदा तुम्हांकडे पा। असे. मजकूर कळेल त्याअन्वयें बोलणें. जाणिजे. छ १९ सफर.

(लेखनावधिः)

श्री.

## लेखांक १४९.

१६९८ चैत्र वद्य ५.

राजश्री लक्ष्मण आपाजी गोसावी यांसिः—

सु॥ सीत सबैन मया व अलफ. अपटणाचीं पत्रें सरकारांत करनेल कीटिंग यास हालीं आलीं. त्यांचा भाव पहिल्या लिहि-

त्यावर सक्तता असे. हालीं नरम भाव लिहिले आहेत जे, आपण तह केला याचा प्रकार कलकत्येवाले यांच्या हुकमाप्रमाणें केलें असे. त्यास, आपणास तूर्त तुमची कुमक करू नये व बारभाईंची कुमक करू नये. त्यास, तूर्त तुम्ही हरयेक कोणी मोगल अगर भोसले आपले कुमकेस आल्यास आणावे. यांत आमचा आग्रह नाहीं. आह्मास विलायतेचा हुकूम आला म्हणजे आम्ही आपली कुमक करूं, विलायतेचा हुकूम, आपणच कुमक करावी, ह्मणून येईल, बारभाईची कुमक करावी, असा येणारच नाहीं. आह्मीं बारभाईची कुमक करणार नाहीं. तूर्तचा प्रकार जाहाला. त्यांत तूर्त इंग्रजी कुमक आहे, तो सरंजाम माघारा नेववावा, हें मात्र ठरविलें आहे. यांत आम्हांवर रोष नसावा. कलकत्याच्या हुकमावरून करावें लागलें. याप्रा हालीं नरम—पणाचे लिहिणेयांत भाव आहेत. म्हणून करनेल यांनीं निवेदन केलें व सरकारांत पत्रही आलें. त्यास, करनेल तेथेंच जात आहे. याचा भाव तेथें तुम्हीं मनास आणावा. तेथील कोशलदार वगैरे इंग्रजांस समजला असेल. त्यास, तेथील शोध करून लिहून पाठविणें. छ १९ सफर. मंगळवार पंचमी, प्रातःकालच्या ६ घटिका दिवस.

( लेखनावधिः )

---

श्री.

## लेखांक १५०.

१६९८ चैत्र वद्य ६.

राजश्री लक्ष्मण आपाजी गोसावी यांसिः—

सु॥ सीत सबैन मया व अलफ. कारनेल आपटण याणीं सरकारांत पत्र लिहिलें आहे त्याचा दर जवाब एक खुशकीच्या मार्गें रवाना केला असे व येक हालीं तुह्मांकडे पाठविला आहे. तरी तुह्मीं जनराल यांचे विद्यमानें मशारनिलेकडे रवाना करणें. अपटणास पत्र लिहिलें आहे त्याची नक्कल पाठविली आहे ही पाहून जनरालास सविस्तर अर्थ समजावणें. जाणिजे. छ २० सफर. बहुत काय लिहिणें?

( लेखनावधिः )

---

श्रीसांबः सपुत्रो ४.

## लेखांक १५१.

१६९८ चैत्र वद्य ६.

पु॥ राजश्री लक्ष्मण आपाजी गो॥ यांसिः—

सु॥ सीत सबैन मया व अलफ. सरकारांत खर्चाची वोढ आहे, ही तुह्मांस समजूनच आहे, याविशीं जनरालासी बोलोन कांहीं तोड काढावी, म्हणून तुह्मांस वारंवार लिहिलेंच आहे व तुम्हींहि बोलतच असाल. अपटणानें तह केला, त्यांत तीन लक्ष सालिना खर्चास देऊन कोपरगांवीं राहावें ऐसें ठराविलें. त्यास, कोपरगांवीं रहाणे कसें घडतें? हा मजकूर विस्तारें पेशजी ऐक दोन पत्रीं लिहिला. कोंपिनीच्या स्थलांत राहूं. येथें सदरहू ऐवज जनरालांनीं अपटणास लिहून फितुरी याजकडून आपण घेऊन आमचा खर्च चालवावा. ह्मणून एक दोन पत्रीं लिहिलें होतें. त्याजवरून जनरालाजवळ बोलला. त्यांणीं आपटणास लिहिलें. त्याचा जाब जनरालास आला कीं, कोंपीनीच्या स्थलांत राहून खर्चास द्यावयास अनकूल पडणार नाहीं. याप्रों त्याचा जाब आला, ह्मणून जनरालानीं सांगितलें, ह्मणून लिहिलेंत. त्यास, याविशीं पेशजी तुह्मास लिहिलें असेल, त्यावरून तुह्मीं जनरालासी बोलला. परंतु,

फितुरि याजकडून खर्चास घेऊन राहावें, हें योग्य नाहीं. खर्च चालला पाहिजे, हें संकट जनरालास. परंतु पदरचा खर्च करून चालवावों हि हिंमत न होय. तरी आमचेच ऐवज दोन तीन आहेत ते दाखवावे. एक, सा लक्षाचें जवाहीर गाहाण आहे तें आपटणानें फितुरियास द्यावें, ह्मणोन ठराविलें आहे. अपटण आमचे जवाहीर कोण देणार ? जनरालानीं अपटणास साफ ल्याहावें, ज्याणें आह्मापाशीं जवाहीर दिलें त्याचें त्याजवल आह्मीं देऊं, दुसऱ्यास देणार नाहीं, तुह्मी काय समजोन फितुरियास द्यावें ह्मणून ठरावितां, आम्हांस दुसरेयास देतां नये, ज्याचें त्यास देऊं म्हणून आपटणास जनरालानीं ल्याहावें आणि आमचें जवाहीर आम्हांस द्यावें. ह्मणजे सा लक्षाचे जवाहीर हरयेक जागा ठेवून, निदानीं तीन लक्ष रुपये मिळतील. हा येक ऐवज. दुसराः कारनेल किटिंग यांणीं फतेसिंगाबाबत दहा लक्ष रुपये वसूल करून घेतले. त्यापैं। सरकारांत सा सवा सा लक्ष अजमासें दिल्हे आणि पावती दहाची घेतली. त्यापों बक्षीस लक्ष सवा लक्ष जाऊन बाकी बाजवी दोन अडीच लक्ष पावेतों निघतात. याचा तपसील तुम्हांस लिहिलाच आहे. हा ऐवज जनरालांनीं बाजवी आह्मांस देवावा. व मोगल सुरतकर याजकडे चौथाईचा ऐवज येणें. त्यास सालमजकुरीं पैसा आला नाहीं. मोगलाकडे चाळीस पन्नास हजार रुपये येणें. तो सुद्रामत देत नाहीं. त्यास गंभीरास जनरालांनीं ताकीद करून, सदरहु ऐवज देवावा. हे तीन ऐवज आमचे आह्मांस देवावे. पदरचें देणें यांत लागत नाहीं. याप्रों जनरालाजवळ बोलोन, जवाहीर वगैरे लिहिल्याप्रों मागोन घ्यावें. आपटणाचें पत्र सरकारांत आलें, त्याचा जाब त्यास लिहिला आहे. तो त्यास जनारलाकडून पावता करावा. त्याच्या मसुद्याची नकल पाठविली आहे. तात्पर्य, बहुत नरम लिहिलें आहे. याचें कारण आमची कुमक इंग्रेजांनीं सोडिली व त्यांजवळून मोगल तहवरजंग गेला तो आमच्याच सूत्रानें गेला. पुढें दो तीं महिन्यांनीं आम्हांस उपयोगी पडेल. हालीं उभयतां आंगजोरच आहों. त्यांत फितुरयाची फौज फार सडली. महागाई. वैरण मिळत नाहीं. घोडीं माणसें उपासी मरतात. लोकांस रोजमरा सा सात महिने नाहीं. सबब फौज उठोन जात आहे. तीजमध्यें कुवत नाहीं. याप्रमाणें तिकडील हैराणगत तूर्त आहे. पुढें जमनील. हालीं त्यांची आपली बरोबरी आहे. सबब लढावयाचा विचार ठराविला आहे. सरकारचे फौजेचा लढावयाचा दम भारी आहे. व येथें सुरतेस सरंजाम पाहिजे तो मिळतो. दारूगोळा, सिसें व सिबंदी गाडद मिळते. लोकांतही दम मोठा. यास्तव लढाईची तर्तूद करीत आहों. या दिवसांत गाठल्यास मनसबा ठीक पडतो. पुढें ते भारी होतील. सबब आह्मीहि बलकटीच आंतून करितों. त्यांस न समजावें, समजल्यास सावध होतील. यास्तव नरम जाब आपटण यास लिहिला आहे. लढाई आठ पंधरा दिवसांत व्हावी, ऐसें आहे. गोविंदराव वगैरे बोलाविले आहेत. तेहि इतक्यांत येतील. लढावयाचा केवल निश्चय नाहीं. बनल्यासारिखें होईल. तुह्मी सुरत, मुंबई, भडोच या तीनही स्थलांतून हरयेक मर्जीस पडेल तेथेंच राहूं. तेथें खर्च चालला पाहिजे. तो जनराल देतीलच. परंतु जनरालावरही संकट न पडतां आपला ऐवज त्याणीं उगऊन दिल्यास त्याचे हातीं आहे. येणेंकरून त्यास संकट नाहीं, व आमचे काम समजोन प्रसंगानुरूप बोलणें. जाणिजे. छ २० सफर. ( लेखनावधिः )

## लेखांक १५२.

१६९८ चैत्र वद्य ७.

अजम मेस्तर बाढम ईस्कोयेर कोशलदार बंदर सुरत दाम महबतहू:—

छ मलाज मुख लिसान दस्तगाहाय अतिजाद दोस्ताआन. आजीज्यानीब चिंतो विठल सलाम आंके. येथील खेरखुशी जाणून आपली खेरअफीयत कलमीं करीत जावी. दिगर. अजम उइलिम हारनबी जनराल यांस खत अद्मीयासोबत पाठविलें आहे. त्यास, ज्याहाजावरून आद्मीयाची रवानगी करून मुंबईस पोंहचत ऐसें करावें. व तिकडून जबाब घेऊन येईल त्यास ईजानेबानजीक पोंहचाऊन द्यावें. रो छ २१ सफर. दराज काय लिहिणें ? हे किताबत.

---

श्रीशंकर.

## लेखांक १५३.

१६९८ चैत्र वद्य १४.

राजश्री लक्ष्मण अप्पाजी गोसावी यांसि:—

सु॥ सीत सबैन मया व अलफ. खासा स्वारी सुरतेस येऊन राहिली. लोकांचे शिबंदीचा गवगवा. मसलत सर्व प्रकारें बिघडली. सर्व संकटप्राप्त्या एक इंग्रजांचे प्रतिकूलतेमुळें जाली.परंतु याचे घरीं असरियास येऊन राहिल्यानीं दुसरियाचा उपद्रव लागों देणार नाहीं व राहूं तोंपर्यंत जा ह्मणणार नाहीं, ऐसी खातरजमा पक्की होती. यामुळें वीस बेवीस रोज येथें गुजरले. वरचेवर तुह्मांस व जनरालांस पत्रें लिहीत गेलों. अपटणांसहि दोन पत्रें लिहिलीं. कांहीं तरी सोय निघेल. जनरालांनीं अंगेज केला आहे. त्याची काळजी त्यांसच असावी. आजपर्यंत ज्याचा हात इंग्रजांनीं धरिला तो सोडला नाहीं. ऐसा यांचा लौकिक ऐकत आलों ऐसें असतां, सांप्रत आह्मांस पटकी बसविली. केवळ विश्वासघात, मोठे दगाबाजहि बेइमानी होत गेले, त्यांच्यानेंहि कोणाचा जाला नसेल ऐसा, जाला आहे.त्यांचें विस्तर कोठवर ल्याहावें ! असो ! एथें दम खाऊन शिबंदीचा गवगवा वारावा,लोकांचे हातून मुक्त व्हावें, तोडजोड पडेल तैसी पाडावी, दुसरे कोठें गेलियास परिणाम नाहीं, ऐसें जाणून लाचारीस आजपर्यंत मुक्काम करून राहिलों. मुंबईस यावें अथवा भडोच सुरत येथें राहावें, तरी शिबंदीनें प्राणाशीं गांठ घातली आहे. यांचे हातून उलगडा जाला म्हणजे मग जो विचार करणें तो करावा. ऐसें असतां, काल छ २७ सफरीं मेस्त्र गंभीर व कारनेल किटीण यांनीं येऊन साफच सांगितलें कीं, इतके दिवस तुह्मी येथें राहिलां, त्यास शहराआसपास तसदी फौजेची लागती, फडके वगैरे फौजा तुह्मांवर येणार, आह्मांस कुमक होणार नाहीं, व फौजसुद्धां तुह्मांस ठेऊन घेतलें, याची बद्लामीहि आह्मांवर येईल, यास्तव कूच करून जावें, हरकोठें दम खाऊन फौज जगवावी, बचाव जे रीतीनें होईल तैसा करावा, आमचे भरवासियांवर राहूं नये. शहरांत येत असाल तरी दोनशें माणसांनसीं यावें, महमुदीबागांत शहरांत जागा करून देऊं,जाजती लोक आंत घेणार नाहीं. ऐसें तुटकेंच बोलिले. इतके दिवस मसलतीची उमेदच दाखवीत गेले. टेलरचें पत्र आलें, यांत कांहीं बरें असेल असें ह्मणत होते. त्याचा जाबसाल परस्पर त्यांस जनरालाचा आला व तुह्मींही त्याचें बोलणियाचे भाव सुचवून लिहिलें. बंगालवाले जनरालांचें पत्र तरी आह्मांस

पावलें नाहीं. परंतु अर्थ ध्यानांत आला. त्याजवरून केवळ संकटाचे दिवस प्राप्त जाले. तेव्हां फिरंगियाचें राजकारण, सुरतेंत त्याची कोठी आहे, त्याचे हातून दवणकरांसीं लागूं केलें. त्याणीं, येऊन राहावें, आमचे पेटयांत आलियास बाहेरील पेंच पडों देणार नाहीं, फौजसुद्धां बचाव करूं, पुढें गोव्याकडील जाबसाल आणून मसलत करणें तैसी होईल. इतका त्यांचा आसरा धरून तूर्त प्राण रक्षावयाकरितां तेथें गेलों. परंतु सर्व भार इंग्रजांवर आहे. ज्या तरेनें आमची कुमक होय ते गोष्ट त्याणीं करावी. त्यांचे घरींहून दुसरे जागा गेलों, ऐसें न समजावें. कालहरण मात्र केलें आहे. हे अर्थ जनरालासी बोलावे. जाणिजे. छ २७ सफर. तूर्त सुरतेस आहों. कलकत्तेकराचें पत्र पाठविलें आहे, त्याचा जाबसाल तुह्मांकडून आला ह्मणजे करणें तैसें केलें जाईल. छ मजकूर.

---

## लेखांक १५४.

१६९८ वैशाख शुद्ध ६.

वर्ष सहा महिने गुजरातेवरच तह पडला तरी कबूल करावा लागेल. तेव्हां, इंग्रेजांकडील पा मावारे द्यावे ऐसा तह आपटणानें ठराविला आहेच. त्याप्रों सारे पा आमचे हवालीं करावे. परगणेयाची स्मरणानें नांवनिसी:—

नेहमीं दिल्हे होते.

- १ उपींड
- १ जंबूसर
- १ आमोद मागाहून मेस्तर शाहानें करून घेतले.
- १ आंकलेश्वराचे दरसाल उकते पाऊण लक्ष द्यावें.

आपटणाचे तहाप्रों हेहि माहाल आह्मांकडे येतील. कदाचित् भीड पडलीच तर थोडीबहुत रदबदली आह्मांस ऐकावी लागेल. परंतु आमची मर्जी नर्मदातीरीं बहुत. यास्तव हसोट अंकलेश्वर हे तरी घेणें प्राप्त आहे. जंबूसर मातबर, सबब द्यावें लागेल. कदाचित आमोद मात्र आपले रजावंदीनें त्याजकडे ठेऊं. उपींड तीही लक्षांचे, आमोद लक्षाचे बेरजेचे अजमासें लिहा आहे. येविसीची तोडजोड कसें बोलावें, त्याचा विचार आपले जागाच दोन दिवस करून, गणदोष मनन करून बोलणें. हा कागद अद्यापि येथें कोणासही जाहीर नाहीं तेथेंही जाहीर नच व्हावा. मेस्तर शाहा पुर्ता ममतेंत असल्यास, त्यास विचार पुसावा. बापू सारस्वत योग्य असीलियास बोलणें. नाहीं तरी जनरालासीच एकांतीं बोलणें. परंतु त्यासहि लोभ असेलच. तेव्हां बोलणें सख्तच पडेल. लोभापुढें वाजवी गैरवाजवी समजत नाहीं. त्यांजपासूनच आह्मास काम घेणें. तरी त्याचाच लोभ तोडावा हें त्यास कसें गोड वाटेल ? यास्तव प्रसंग पाहोन बोलावें. परंतु केवळ पोकळ सोडूं नये. आपटणानेंच त्याचा लोभ तोडला आहे. जर ते आह्मांस दौलतीवर बसवितील तर आह्मीं लिहून दिल्हें आहे, त्यापैकीं एक गांव मावारा घेत नाहीं. व आणिकही मर्जीस आल्यास थोडें बहुत देऊं. परंतु त्याचे कराराप्रों त्याच्यानें सेवटास न जाई, तेव्हां आमचा करार कोठें राहिला? जवाहीर व पा मावारे देणें त्यास वाजवीचे रईनें प्राप्त आहे. वाजवी विचारतील तरी देतीलच. परंतु या कालांत वाजवी ह्मणजे जुलूम ह्मणतात. तपशीलवार लिहिलें आहे. उत्तर तपशीलवार लिहिणें आणि बापू सारस्वत हुजूर पाठवणें. कलम १

तुमच्या चित्तांत जावयाचेंच असल्यास अगाधरे विनंति: लिहिणें. म्हणजे येथून कारकून पाठविला जाईल. त्याच्या हवालीं तेथील बंदोबस्त करून, मग तुम्हास जावयाचें असल्यास जाणें. जाणिजे. छ ११ रबिलावल. हें वर्तमान ऐकलें. परंतु खरें कीं खोटें, हें समजत नाहीं. तथापि, तुह्मा-विसीं हुजूरची खातरजमाच आहे कीं, हुजूरचा निरोप घेतल्या शिवाय जाणार नाहीं. परस्परें ऐकलें, सबब लिहिलें असे. छ मजकूर.

आज्ञा प्रमाण.

( लेखनावधि: )

पौ. छ २८ रबिलावल, सन तिसा सबैन.

---

श्री.

## लेखांक २१८.

१७०१ चैत्र वद्य ८.

राजमान्य राजश्री सदासिव धोंडदेव यांसि:—

रघुनाथ बाजीराव नमस्कार. सु॥ तिसा सबैन मया व अलफ. कल्याणच्या ठाण्यांत घोडीं पाडाव केलीं, त्यांपैकीं तीन घोडीं सुभानराव मोरे याजवळ साधीस आहेत. त्यास फत्तेसिंग यांजवळ कवायती लोक आहेत. ते खर्चीकरितां गवगवा करितात, ह्मणोन त्यानें हुजूर अर्ज सांगोन पाठविला. त्यावरून हें पत्र तुह्मांस सादर केलें असे. तरी मोरे यांजवळ सरकारची तीन घोडीं आहेत तीं ठाण्यांत अवघे मिळोन पाडाव केलीं असल्यास, वाजवी मनास आणोन, मोरे याजवळून घेऊन, तुम्हीं व फत्तेसिंग मिळोन फरोख्त करोन, याचा ऐवज होईल तो लोकांस वांटणीप्रमाणें देणें. फत्तेसिंगास सुरतेच्या मार्गें हुजूर येणें म्हणोन आज्ञा केली आहे. त्याजबरोबर त्या लोकांसहि र॥ करणें जाणिजे. छ ११ रबिलावल.

( लेखनावधि: )

पो छ २५ रबिलावल.

सन तिसा.

---

श्री.

## लेखांक २१९.

१७०१ चैत्र वद्य १३.

राजमान्य राजश्री सदासिव धोंडदेव नातू यासि:—

रघुनाथ बाजीराव नमस्कार. सु॥ सन तिसा सबैन मया व अलफ. बद्दल देणें खर्चास रुपये.

१०० सैद आबदुला मुंबईंत आहे त्यास.

१०० सेख महमद.

---

२००

एकूण दोनशें रुपये तुम्हांकडील तसलमातीचे ऐवजीं देविले असेत. पावते करून कबज घेणें. जाणिजे. छ २६ रबिलोवल.

आज्ञा प्रमाण. ( लेखनावधि: )

पो. छ २२ रबिलाखर.

सन तिसा सबैन.

बार.

---

श्री.

## लेखांक २२०.

१७०१ वैशाख वद्य ५.

राजमान्य राजश्री सदासिव धोंडदेव यांसि:—

रघुनाथ बाजीराव. सु॥ तिसा सबैन मया व अलफ. तुम्ही चिरंजीवांकडे पुण्यास जाणार ह्मणोन ऐकलें. सबब, तेथें रवानगीस हुजूरून बाळाजी विश्वनाथ कारकून पाठविले आहेत. तरी तुमचे तसलमातीस ऐवज आहे, त्या

खरेदीस ऐवज लागेल, तो सरकारचे ऐवजापैकीं खर्च करणें. छ मजकूर.
आज्ञाप्रमाण.

( लेखनावधिः )

पौ छ १८ साबान, सन समानीन, श्रावण व॥ सप्तमी.

---

श्री.

## लेखांक २२३.

१७०१ श्रावण शुद्ध ८.

( श्रीमत् रघुनाथराव. )

राजमान्य राजश्री सदाशिव धोंडदेव यांसी:—

रघुनाथ बाजीराव नमस्कार. सु॥ समानीन मया व अलफ.

चिमणाजी गोपाल याजकडे पणवेलीपैकीं साडेचारशें रुपये सिल्लक आहे, ते पेशजी लक्ष्मण रणसोड याजकडे देण्याविषयीं पत्रें त्यास सादर जाहालींच आहेत. त्याजवरून मशारनिलेनीं लक्ष्मण रणसोड याच्या हवालीं ऐवज केला असल्यास उत्तम. नाहीं तरी तुह्मीं त्याजकडून ऐवज मागोन घेणें. दिक्कत करूं लागल्यास जनराल यास पत्र दिल्हें आहे. हें त्यांस देऊन त्यांजकडून निक्षूण ताकीद करवून ऐवज आपले पदरीं घेणें. ऐवज दिक्कत न करतां दिल्यास जनराल यास पत्र द्यावयाचें प्रयोजन नाहीं. कलम १.

तुह्मांकडे बेलापूर वगैरे माहालचा ऐवज जमा करविला होता. त्यास, कोणे महालचा काय ऐवज तुम्हांकडे जमा काय जाहला आहे व त्यांतून खर्च काय जाहला आहे, त्याचा झाडा तपसीलवार हजूर लिहून पाठवणें. दोहों हजारपर्यंत तुह्मजवळ शिल्लक असल्यास आपलेजवळ ठेवणें. दाहा हजारावर असतील ते हजूर पाठवून देणें. कलम १.

एकूण कलमें दोन लिहिलीं असेत. त्याप्रों करणें. जाणिजे. छ ६ साबान. आज्ञाप्रमाण.

( लेखनावधिः )

पौ छ १८ साबान, सन समानीन श्रावण व॥ ४.

---

श्री.

## लेखांक २२४.

१७०१ श्रावण शुद्ध १४.

राजमान्य राजश्री सदाशिव धोंडदेव यांसि:—

रघुनाथ बाजीराव नमस्कार. सु॥ समानीन मया व अलफ. त्रिंबक पांडुरंग यांस पंचवीस रुपये दरमहाची नेमणूक करून सनद सादर जाहली आहे. त्यास, हालीं हें पत्र नदर केलें आहे. तरी त्रिंबक पांडुरंग यास रुपये न देणें. दरमहा बंद करणें. तुह्मांकडे खर्चाची नेमणुकीची याद पहिली सादर केली आहे त्याची नकल हजूर पाठवून देणें. जाणिजे. छ १३ रमजान. आजतागाईत तुह्मांकडे जमा काय व खर्च काय जाहाला आहे व बाकी सिलक काय राहिली ते तपशीलवार लेहून पाठविणें. छ मजकूर. ( लेखनावधिः )

पो छ ४ सवाल, आश्विन शु॥ ६.

---

श्री.

## लेखांक २२५.

१७०१ श्रावण वद ५.

राजमान्य राजश्री सदाशिव धोंडदेव यांसि:—रघुनाथ बाजीराव नमस्कार. सु॥ समानीन मया व अलफ. भागो व बाके

तांच्याचे व दुबारी गोळे वोतावयाचा फर्मा पंचरसी विश्वनाथ नारायण याचे येथें आहे तो सरंजाम तोफा वोतावयाचा जो असेल तो जहाजावर घालून हुजूर रा॥ करणें. जाणिजे. छ १८ साबान. आज्ञाप्रमाण. या कामाकरितां बाळू कुमकर पाठविला आहे, याजबरोबर रा॥ करणें. छ मजकूर.

( लेखनावधिः )

पो छ ३ रमजान,
सन समानीन, भाद्रपद शुद्ध ५.

---

श्री.

## लेखांक २२६.

१७०१ श्रावण वद्य ५.

पु॥ राजश्री सदाशिव धोंडदेव यांसिः–

सु॥ समानीन मया व अलफ. दोन शेर बार्क नवा चांगला औषधास पाठऊन देणें ह्मणोन पेशजी तुह्मांस लिहिलें होतें. त्यास आणखीही त्याशिवाय येक शेर मध्यम ऐकूण तीन शेर पाठवून देणें. कदाचित् दोन शेर चांगला न मिळाल्यास तीन शेरही मध्यम प्रतीचा पाठवून देणें. जाणिजे. छ १९ साबान. आज्ञाप्रमाण.

( लेखनावधिः )

पो। छ ३ रमजान,
सन समानीन, भाद्रपद शु॥ ५

---

श्री.

## लेखांक २२७.

१७०१ श्रावण वद्य १०.

राजमान्य राजश्री सदाशिव धोंडदेव व विश्वनाथ नारायेण यांसिः–

रघुनाथ बाजीराव. सु॥ समानीन मया व अलफ. केशवजी कासार वोतारी हुजुरून आठा रोजाचा निरोप घेऊन आपले घरीं मुंबईस आला आहे व यांजबराबर सरकारांतून बाळू शेटचा खिजमतगार दिल्हा आहे. त्यास हा आठ रोज घरीं राहील. उपरांत हुजूर येऊं लागेल ते समयीं तोफा वोतावयाची हातेरें वाकें व भाते व दुबारी गोळे वोतावयाचा पंचरसी फर्मा वगैरे सरंजाम या दोघांबरोबर देऊन हुजूर रा॥ करणें. जर केशवजी आठा दिवसांनंतर निघावयास हेगई करूं लागल्यास, भवानजी विसाजी यांस पत्र दिल्हें आहे तें त्यांस देऊन जनरल यांजकडून ताकीद करून केशवजीस पाठवून देणें. जाणिजे.

छ २३ साबान आज्ञाप्रमाण.

( लेखनावधिः )

पो॥ छ ५ रमजान सन समानीन.

---

श्री.

## लेखांक २२८.

१७०१ श्रावण वद्य १२.

पु॥ रावजी सदाशिव धोंडदेव यांसिः–

सु॥ समानीन मया व अलफ. कवायती लोक व बंदुका येथें आहेत, त्यांस हुजूर रवाना करावयाची जसी आज्ञा होईल त्याप्रमाणें वर्तणूक करीन, म्हणोन लिहिलें तें कळलें. त्यांस, बंदुका व कवायती माणूस आहे तें हजूर पाठऊन देणें. लोकांस दर असामीस दोन तीन रुपये खर्चास देणें. जाणिजे. छ २५ साबान. आज्ञाप्रमाण. लोकांस जामीन ठाव ठिकाण मिळाले तरी उपयोगी. बंदुखा घेऊन पटऊन गेले तरी बंदुखा व रुपये नाहक बुडतील ऐसें न करणें.

( लेखनावधिः )

पो॥ छ १४ रमजान, सन समानीन, भाद्रपद वद्य २.

श्री.

## लेखांक २२९.

१७०१ श्रावण वद्य १२.

राजमान्य राजश्री सदासिव धोंडदेव यासिः—

रघुनाथ बाजीराव नमस्कार. सु॥ समानीन मया व अलफ तुम्ही विनंति पत्रें दोन पाठविलीं तीं प्रविष्ट जाहालीं.

बाळाजी विश्वनाथ यांची मोजदाद जिनसाची दिली होती, ते माघारे घेतली. त्यांणीं नेमणुकेशिवाय पाउणशें रुपये खर्च केला आहे. त्याचा तें फडशा हजूर करणार ह्मणोन लिहिलें तें कळलें. त्यास, तुह्मींहि तगादा न करणें. बाळाजी विश्वनाथ हजूर आल्यावर समजोन फडशा करोन घेतला जाईल. कलम १.

व्यंकटराव पिलाजीचा व रतनजी पारसी याचा मजकूर लिहिला तो कळला. पुढें त्याजकडे पत्रें पाठवावयाचीं असेत. परंतु कोणी ममतेचा जाऊं लागेल त्याजबरावर पाठऊं. सबब जहाजाच्या शोधांत हमेषा राहावें. येकादे माणसांस नेहमीं तेंच काम पाहिजे. बारभाईंनीं वकील कलकत्यास र-॥न॥ केल्याचा वगैरे बातमीचा मजकूर लिहिला. तो कळला.

पक्की बातमी लिहिली येईल तितकीच लिहित जाणें. बाजारी बातमी न लिहिणें. त्यांतहि जरूर असल्यास लिहिणें. परंतु ही बाजारी बातमी, असें लिहीत जाणें. कलम १.

तावदानाचा मजकूर लिहिलांत, कीं पहिल्या बेताची मिळत नाहीं. त्यास, थोडीशी जाजती असली तरी कार्यास येईल. त्याच मेजाची कशी मिळतील ?

जाजतीच मेजाचीं घेऊन पाठवणें.

कल्याणापैकीं कांहीं जिनस विकावयाचा होता तो आतां खासा स्वारी सुर्तेस आली. सबब फरोक्त करीत नाहीं ह्मणोन लि॥. त्यास कल्याणपैकीं आरसे आहेत त्यांपैकीं ज्यांची कलई उडाली असेल व पालखीस लागू होत असें असतील ते पालखीकरितां हजूर पाठविणें.

ह्मणजे दुसरे पाहिजेत तितकेच खरिदी करणें. बाकी ज्या आरशास कलई असेल ते विकणें व दुसराहि कल्याणपैकीं जिनस असेल तो फरोख्त करणें. ज्यांत किफायत नजरेस येईल तेंच तुह्मी करणें. तुमची नजरही बरी आहे.

मिर्जा तेथें आहेत. त्यास तुह्मीं त्याजकडे सहजांत जाऊन त्यास पुसणें कीं, श्रीमंत सुर्तेस आले आहेत त्यास तुमचे चित्तांत जावयाचें आहे किंवा नाहीं. हा त्याचा भाव काढून हजूर लेहून पाठवणें. सरकारतर्फेनें हा त्यासी जाबसाल न बोलणें. तुह्मी होऊन आपले तर्फेनें सहजांत त्यासी बोलोन, त्याचा शोध घेऊन लिहिणें. त्यासी आपले तर्फेनेंच बोलणें. कलम १

येकूण कलमें साहा लि॥ आहेत. त्या प्रे॥ करणें. जाणिजे. छ २५ साबान आज्ञाप्रमाण.

(लेखनावधिः)

पे॥ छ १४ रमजान, सन समानीन, भाद्रपद व॥ २.

---

श्री.

## लेखांक २३०.

१७०१ भाद्रपद शुद्ध १०.

राजमान्य राजश्री सदाशिव धोंडदेव व विश्वनाथ नारायण व लक्ष्मण रगोंद यांसिः—

रघुनाथ बाजीराव. सु॥ समानीन मया व अलफ. कलाइनी लोक यांस आंगरख्याबद्दल आज्ञे आंगरखे होन पैसा पडुकर

बखारींत चवकसीनें खरेदी करून, आपाजी आइतोले पाठविले आहेत, याजपाशीं देणें. जाणिजे. छ ९. रमजान. आज्ञाप्रमाण.

( लेखनावधिः )

पे॥ छ १'१ रमजान,
सन समानीन, भाद्रपद वद्य २
वार.

---

श्री.

## लेखांक २३१.

१७०१ भाद्रपद शुद्ध १०.

राजश्री सदाशिव धोंडदेव यांसिः—

सु॥ समानीन मया व अलफ. नरलपैकीं कवायती गारदी याचे आंगरखे बाळाजी सदाशिव याणीं तुमच्या हवालीं केले आहेत ते व आणखी तुह्मांजवळ जे आले असतील ते झाडून हुजूर पाठवणें. जाणिजे. छ ९ रमजान. आज्ञाप्रमाण.

( लेखनावधिः )

पो छ १४ रमजान, सन समानीन भाद्रपद वद्य २.

---

श्री.

## लेखांक २३२.

१७०२ भाद्रपद वद्य ४.

राजश्री भगवंतराव कदम यासिः—

अखंडीत लक्ष्मी अलंकृत राजमान्य राजश्री स्नेहांकित रघुनाथ बाजीराव आशिर्वाद. सु॥ इहिदे समानीन मया व अलफ. तुह्मी विनंतिपत्र पाठविलें तें प्रविष्ट जालें. लिहिला मजकूर सविस्तर निवेदन जाहाला. ऐसियास तुमची निष्ठा आहे तसी कृपाहि हुजूरची आहे. त्यास, तुमचा कारकून हजूर आल्यानंतरी आज्ञा करणें ती केली जाईल. जाणिजे. छ १७ रमजान.

---

श्री.

## लेखांक २३३.

१७०१ भाद्रपद वद्य १२.

राजमान्य राजश्री सदासिव धोंडदेव यासिः—

रघुनाथ बाजीराव नमस्कार. सु॥ समानीन मया व अलफ. बार्क पाठविला तो पावला. त्यांत सदासिव वैद्याबाबद् आहे तो किमतीस बरा पडला आहे. दास्तर टेणट याजकडील पाठविला, त्यांस रुपये अडीचपट आधिक पडून फार उंचहि नाहीं. तरी हाली गोविंदा जांबूळकर खिजमतमार पाठविला आहे. याजबराबर दहा शेर बार्क जितका उंच मिळेल तितका सदासिव वैद्य याचे गुजारतीनें खरीदी करून हुजूर पाठविणें. जाणिजे. छ २५ रमजान. आज्ञाप्रमाण.

( लेखनावधिः )

पो ४ सवाल आश्विन शु॥ ६.

---

श्री.

## लेखांक २३४.

१७०१ आश्विन वद्य ७.

राजमान्य राजश्री सदाशिव धोंडदेव यासिः— रघुनाथ बाजीराव नमस्कार सु॥ समानीन मया व अलफ. सरकारांत दारू करणार कारीगर यांचा दरकार आहे, त्यांस तुह्मी जनराल यांस हटकून दोन कारीगर त्याजवळ मागणें. शेवटीं त्याणीं येकच दिल्यास त्यास हजूर पाठविणें. जर जनरल यांणीं द्यावयास आनमान केल्यास तेथें कारीगर असतील त्यांचा शोध करून, त्यास फोडून तेथें त्याचा दरमहा असेल त्याहून जाजती च्यार पांच रुपये सरकारातून केले जातील हा लोभ दाखवून, आणि तेथें घरीं जातों म्हणोन निरोप घ्यावा अथवा सुरतेस जातों असा निरोप घेऊन हुजूर तुम्हीं त्यास पाठवून देणें. पेशजी

तुम्हास पालखीच्या तावदानाविसी पांच च्यार वेळां लिहिलेंच आहे. त्याप्रों तावदानें पालखीच्या मेजाचीं हुजूर पाठवणें. जाणिजे. छ २० सवाल आज्ञाप्रमाण.

( लेखनावधिः )

पौ छ १ जिलकाद, सन समानीन.

---

श्री.

## लेखांक २३५.

१७०१ आश्विन वद्य १०.

राजमान्य राजश्री सदासिव धोंडदेव यांसिः—

रघुनाथ बाजीराव नमस्कार. सु॥ समानीन मया व अलफ. बेहराम पारसी याचीं मुलेंमाणसें यांचे खर्चाची नेमणूक दरमहा रुपये ५ पांच करार करून पेशजी सनद सादर जाहली आहे. त्यास, तुह्मांकडून येक रोजमरा मात्र पावला, बाकी पावलें नाहीं. सबब, हुजूर ई॥ छ १ जिलकाद सन तिसा ता॥ सवाल अखेर सन मजकूर पावेतों हिसेब रुपये ५५. पैकीं आदा हुजूर रुपये ३० तीस व तुह्मांकडून रुपये ५ ऐकूण पस्तीस रुपये आदा होऊन, बाकी रुपये २० वीस तुह्मांकडून देविले असेत तर पेशजी सनद दिल्ही आहे ती पाहून सनदेंत ज्या महिन्यापासून रोजमरा देत जाणें ह्मणोन लिहिलें असेल तें हस्तकबिल धरून, हिशेब होईल त्यांत पस्तीस रुपये वजा देऊन, बाकी वीस रुपये देविले आहेत. यांत जे निवतील ते देणें. पुढें सदरहूप्रमाणें पांच रुपये दरमहा देत जाणें. जाणिजे. छ २३ सवाल. आज्ञाप्रमाण.

( लेखनावधिः )

पौ छ ३ जिलकाद सन समानीन.

बार.

श्री.

## लेखांक २३६.

१७०१ कार्तिक शुद्ध ८.

राजमान्य राजश्री सदाशिव धोंडदेव यांसिः—

रघुनाथ बाजीराव नमस्कार. सु॥ समानीन मया व अलफ. तुह्मीं विनंतिपत्र पाठविलें तें प्रविष्ट जाहलें. रा॥ व्यंकटराव पिलाजी यांजकडे पत्रें पाठवावयाचीं असल्यास अगोधर पाठवावी, ह्मणोन वगैरे मजकूर लि॥ ते कळलें. त्यास हरजीवनराव व हणमंतराव या उभयतां कारकुनांस पत्रें लेहून पाठविलीं आहेत. जिदा बंदर येथील हकमांसहि खलिता पाठविला आहे. त्यास, ज्याहाज जाऊं लागलें ह्मणजे हीं पत्रें रवाना करणें. आजपर्यंत कारकून बंदर जिदा येथेंच होते. त्यास ज्याहाज सोईचें पाहून जर तें बंदर—मजकुरीं असल्यास तेथें त्यांस पावतें करावें. नाहीं तरी, पुढें विलायतेस गेल्यास तेथें त्यांस जाऊन पोहचत अशा सोईच्या जहाजांवर रवाना करणें. जिदा बंदर येथील हकमांस खलिता आहे तो त्यांस पावता करावयाविसीं जहाजवाल्यांस सांगोन रवाना करणें. तुमचे तीर्थरूपांस आरोग्य जाहलें असल्यास तुह्मीं हजूर येणें. जाणिजे. छ ७ जिलकाद. जनरल गाडर्ड येथून मुंबईस गेले आहेत. त्यास खलिता पाठविला आहे. हा पोहोंचतां करून उत्तर घेऊन पाठवणें. छ मजकूर. आज्ञाप्रमाण.

( लेखनावधिः )

पो॥ छ १९ जिलकाद सन समानीन.

---

श्रीमार्तंडभैरव.

## लेखांक २३७.

१६९५ पौष वद्य १३.

राजश्रीराव विराजित राजमान्य राजश्री भावान नाईक राक्षे स्वामीचे सेवेसीं.

पो॥ भगवंतराव शंकर सां॥ नमस्कार विनंति उपरी राजश्री बाबूराव रामचंद्र यांसि रु॥ ५२०० पांच हजार दोनशें तुम्हांकडून देविले आहेत हे वैशाखअखेर देणें मिती शके १६९५ विजईनाम संवत्छरे पौष वद्य १३ मु० तुंगाभद्रातीर जेष्ठ शुध्ध प्रतीपदेपासून रु॥ पुढें राहिले तर दरसदे रु॥ ·॥· प्रं॥ व्याज देऊं हें खत लिहिलें सही

हस्ता अक्षर कृष्णाजी सखादेव दि॥ मा॥र.

---

श्री.

## लेखांक २३८.

१६९५।१६९६.

हिसेब रंगो सखाजी सिलेदार सु॥ अर्बा सबैन त॥ सन खमस सबैन सालिना तेनात बोली बारमाही नक्की रुा.

२०० खासा अ॥ १
१००० स्वार अ॥ ४ दर २५० प्रों॥

---

१३००        ५

मुदत कबज इ॥ छ० ५ जिलकाद त॥ छ० १३ रमजान ये॥ माहे १० रोज ८ ये॥ १११०

वजा सूट माहे १ रोज २५ ये॥ रु॥
१७०॥=

बाकी ९३९।=

वजा दर से॥ रु॥
१९

१५॥= नाणे बटा.
१० दरबारखर्च

---

२५॥=
२४१।

बाकी रु॥
६९८८=
रु॥
२१५॥

बाकी रु॥
४८२॥=

पैकीं वजा दर असामीस रु॥
१० सरदारी खर्च
५ कारकुनी

---

१५
रु॥
७५

बाकी रु॥
४०७॥=

---

श्री.

## लेखांक २३९.

नकल.

१६९६ आषाढ वद्य ५.

अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य रे॥ बाळाजी कृष्ण गोसावी यांसिः—

सेवक माधवराव नारायण प्रधान नमस्कार सु॥ खमस सबैन मया व अलफ. राजबाग राजश्री चिंतो विठ्ठल यांस ईनाम आहे. त्यास बागेच्या बेगमीस व बैल चरावयास मौजे कोथरूड येथील कुरण पेशजीपासून बागाकडे आहे. तें हालीं तुम्हीं जप्त केलें आहे. ऐश्यास बागाचे

बैल सालाबाद चरतात, तेथें चरूं देणें. व बागेचे बैलाचे बेगमीस तीस पसतीस हजार गवत निघतें तें काढीत असतात याशीं कुरण आहे तें बागाकडे पेशजीशीं करार केलें असे तरी राजबागाकडे चालवणें. जाणिजे. छ० १८ जमादिलावल. आज्ञा प्रमाण. सिक्का. मोर्तब.

बार.

---

श्रीम्हाळसाकांत.

## लेखांक २४०.

१६९६ आषाढ वद्य १४.

राजश्री बाळाजी विश्वनाथ प्रे॥ मोह गोसावी यांसि.

छ॥ अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य स्ने॥ गोविंदराव गायकवाड सेना खासखेळ समशेरबहादर दंडवत. सु॥ खमस सबैन मया व अलफ. बदल देणें बाबूराव कासी रोजमुरा व अर्जबाबचे येवजी शीं मजकूर येथील सालमजकूरचे रसदेचे येवजी रुा १००० येक हजार देऊन पावलियाची कबज घेणें. हिसेबीं मजुरा असे. श्रावण अखेर निमे म॥ अखेर निमे देऊन कबज घ्यावें. जाणिजे. छ० २७ जमादिलावल.

| श्री राजाराम छत्रपती अखिल प्रौढ प्रताप धुरंधर गोविंदराव गायकवाड सेना खासखेल समसेर बहादर |
|---|

मोर्तब सुद.

बार.

---

श्री.

## लेखांक २४१.

छ० १५ रावल

१६९६ वैशाख शुद्ध ४.

विज्ञापना येथील वर्तमान ता॥ छ० २ रावल मु॥ अवंतिकापुर येथास्थीत असे. विशेष. येथील मजकुराचीं कलमें येणेंप्रमाणें.

चिमाजी नारायेण याच्या वाड्यांत रहावयास जागा दिल्ही आहे. कुशावा हि पहिल्यापासून याच वाड्यांत रहात होते त्या शीं॥ दुसरी जागा निकालस येथें मिळणार नाहीं. क्षिप्रेचे उदक समीप व देव हि समीप यास्तव सर्वांच्या विच्यारें येथें रहावें असें ठरलें त्याजवरून येथें राहिलों. घोड्याची सोय वाड्यांतच जाली आहे. पालखीस व उंटास मात्र जागा येथें नाहीं. त्याजला दुसरे ठिकाणीं जागा करून दिल्ही आहे. जाग्याची बेगमी जाली आहे. चिंता नाहीं. कलम १.

राजश्री बजाजीपंत नि॥ पाटीलबावा याजकडून हजार रुपये येणें त्याजपैकीं ब्रह्माणपुरचे मुकामीं तिनसे रुपये घेतले व येथें तीनसे येकूण सा शे रुपये घेतले. बाकी च्यार से राहिले. ते हि येका दों रोजांनीं देतों म्हणोन म॥निलेनीं मान्य केलें आहे. याशिवाय खर्चास लागल्यास मी देईन. तुम्हीं कोणेविसीं चिंता न करावी म्हणोन आमची खातरजमा केली आहे. पीरखान हि बरेबर समाचार घेत असतो त्याणें हि मागितलें आहे कीं दोन च्यार हजार रुपये तुम्हास लागल्यास राजश्री बाळाराव यांणीं येथें म॥दारीं कारकून याजवर चीठी दोन हजार रुपयाची दिल्ही त्यास मा॥निलेस चीठी दिल्ही

त्यांणीं आम्हासी उत्तर केलें कीं दोन हजार रुपये देविले परंतु नेमून दिल्हा नाहीं तथापि तुमची खर्चाची अडचण तरी से दोन ( से ) रुपये देतों तेव्हां आम्ही त्याजला खर्चाची वोढ फार सांगितली मग पांच से रुपयाची चीठी सावकारावर घेतली आहे परंतु येथील चालीच्या सिक्यास व भूपाळ व कुरराचे चालीचा ऐवज त्यांणें देविला. त्यास दर सेकडा पांच सा रुपये बटा पडतो त्याजमुळें गोपाळपंत याजकडे दोन तीन वेळ गेलों यावरोन ऐवज दुसरा नाहीं म्हणतात त्यास मी देईन. तुम्ही दुसरिया जवळ न मागावे. जे समई तुम्हांस पाहिजेत ते समई सांगावे. याप्रों सांगितले आहे सारांष उभयताचें लक्ष आपले ठिकाणीं लागलें आहे मार्गी येतांना हि वारंवार परामर्ष करीतच आले वोझेंगाड्रें व घोडीं पागेपैकीं जे समई मागितलीं ते समई देऊन सांभाळून आणिलें. येथें हि कोठें देवधर्मास जाणें तरी घोडीं रथ पाहिजे तरी सांगत जावें. पाठवून देऊं. याप्रों त्यांचे निरोप हि येत असतात. आम्हांस कोठें जाणें परंतु त्याजकडून अनमान कांहीं नाहीं. गवताचे व लांकडें जळाऊ याचें विचारिलें आहे. थोडीबहुत बेगमी करितों म्हणोन बजाजीपंत यांणीं मान्य केलें आहे त्याजपैकीं दोन गाडे लांकडें जळाऊ आज पाठविलीं मागती येक वेळ त्याजकडे जाऊन कांहीं बट्टा कमी जाला तरी उत्तम नाहीं तरी निदान पक्ष येवज बट्टा देऊन घेतों बाकी दीड हजार रुपयेविसीं बाळारावजीस त्यांणीं लि॥ आहे. त्याचें उत्तर येईल तेव्हां देणार ऐसा भाव बोलण्यांत दिसतो. त्यास येक पत्र बाळारावजीचे गोपाळपंत याजला घेऊन जरूर पाठवावें कीं उज्जनींत ऐवज बट्टा न पडतां चालत असल्याप्रों ऐवज देणें दिक्कत न करणें याप्रों घेऊन पाठवावे म्हणजे ऐवज त्याजपासून घेतो. हालीं चीठी दिल्ही आहे तो तर ऐवज घेतों. कलम १.

येथें कोट व हालीं सिका चालतो. येथून तट्टें पांच व उंटें दोन सामानासुद्धां पाठविलीं आहेत. पावतील. आपाजी सावाजी याची पालखी पो आहे. त्याच्या भोयांस आलेले हिसेब खर्चास आणखी हि जेथवर प्रेत्न होऊन गवत व लांकडें येतील तीं घेतच आहों. बाकी गवत व लांकडें विकत घेणें लागतील त्यास कुशाबांनीं येथें उजनप्रगणियपैकीं दोन गांव कमाविसदारापासून केले आहेत. येथून पांच सात कोस तेथें गवताची व लांकडाची सोय पाहून खरीदी घेतों. गवताचा भाव त्या खेड्यांत रुपयाचे हजारा बारासे मिळतें. पेंढी नासिकच्या आपल्या कुरणच्या पेंढीप्रों आहे. येथें शहरांत गवत रुपयाचे पांच से अधिक मिळत नाहीं तेव्हां खेड्याहून आणवावें हें उत्तम दोन उंट येथें आहेत व दोन तट्टें आहेत घेऊन येत जातील. पेंढी लहान फार आहे. कडबा रुपयाचा तिन से च्यार से मिळतो. परंतु च्यार से कडबा मिळून आपल्याकडील ऐसी शंभर पेंढी होईल याप्रमाणें लहान पेंढी आहे. कुशाबाच्या गांवापैकीं च कांहीं रुपये २५ पंचवीस दिल्हे आहेत व तटें उंटे याजला खर्चास मार्गी हणवंताजवळ रुो २५ पंचवीस दिल्हे आहेत त्याचा हिसेब तेथें समजून घ्यावा. लक्ष्मणराव पाग्या याजब॥ पाठविली आहेत. लक्ष्मणराव याची व हणवंताची रुबरु करून दिल्ही आहे. मार्गी सांभाळून घेऊन जाईन. तेथें पोंचऊन पत्र पो याप्रों

करार केला आहे. जामदारखानियामागें राहावयास मिसल नेमून घेतली आहे. चौकी पाहरा करवून नेऊन पांचवितों म्हणोन मान्य केलें आहे. कलम १.

येथून पागेचा सरंजाम वगैरे पाठविला आहे त्याची याद अलाहिदा असे. कलम १.

कुशाबाकडून कांहीं येवज हस्तगत करणें येविसींचा तगादा मा।रनिलेस लाविला आहे. त्याणें उत्तर केलें कीं अठावीस हजार रुपये वसूल जाले ते सोय पडली तरी तेथें घेऊं. सोईचा असल्यास नाहीं तर गवतच घेऊं. कलम १.

येथून मोत्तादार वगैरे पाठविले आहेत त्यास आदा येणेंप्रों

| | रोजमरा | आवाव |
|---|---|---|
| हणवंता खो। | ३ | ५ |
| येसू | ३ | ० |
| गुणाजी | ३ | ३ |
| भवानी | ३ | ० |
| सारवान | ३ | ० |
| आणिक नवा ठेविला दरमहा रु॥ ४ छ० मजकुरापासून तेरीख पडले काम करावे तूर्त | ० | २ |
| | १५ | १० |

रोजमरा छ० १६ सफरचा सर्वांबद्दल दिल्हा आहे. आघाव मात्र दिल्हे आहे. तेहि लिहिले आहेत. कलम १.

बऱ्हाणपूरच्या मुकामीऊन एक पत्र व उजनीच्या मुकामीं पावल्यावर दोन पत्रें अजूरदार याजब॥ पाठविलीं आहेत. पावलीं असतील. कलम १.

येजमानाकडे पाठविले बाकी ऐकूण तीस हजार च्यार से वसूल जाले नाहींत त्याची वरात पाटीलबावाची घेतली ती च दाखविली. आम्ही उत्तर केलें कीं आम्हांस वरातेसी समंध काय आहे येथें खर्चास लागेल ते तुम्हांपासून घेत जावें यांस॥ आज्ञा आहे त्याचा जावसाल केला कीं येथें दुसरा ऐवज कोठून यावा सारांष आम्ही तगादा करावयास आळस करीत नाहीं. परंतु प्राप्त होणें कठीण आहे. एक पत्र हि आपण कुशाबास ल्याहावें कीं हर तजवीज करून च्यार पांच हजार रु॥ बाबूराव याजकडे देणें मग जे वसूल होतील ते घेऊं परंतु पत्र पाठवावें. कलम १.

येथें तीन घोड्या सरकारच्या व दोन तट्टे राहिलीं आहेत व येक घोडी आमची येकूण साहा त्याजला माणसें तीन मात्र मोतादार ठेविले आहेत. अधिक नाहीं व दोन गाडीचे बैलाविसीं कुशाबास सांगितलें आहे. हे देऊन दुसरे तरणे घेतो. बैल आणून देतो. म्हणोन मान्य केलें आहे. बाळाजीपंताकडून दोन माणसें चौकी पाहरियास घ्यावयाची सोय नाहीं. त्याजला विचारिलें त्यांणीं उत्तर केलें कीं तुमच्या वाडियासमोर का॥दार राहतात त्याचीं माणसें तुमच्या दरवाजियासमोर आहेत त्यास आम्हीं सांगितलें आहे तुम्हीं चौकी पाहरियाची काळजी न करावी. रुबरु हि का॥दार याची करून दिल्ही आहे. का॥दार याच्या दरवाजियास व आपल्या दरवाजियास मधीं गली मात्र आहे. अर्धी प्रहर माणसें का॥दार याचीं आपले दरवाजियापुढें असतात. का॥दार यास हि आम्हीं सांगितलें आहे चिंता नाहीं. कलम १.

चिरंजीव राजश्री मुकुंद आपा याजवर हजार रुपयाची उंट गवत बाहेरून गाव खेडियाहून आणवावें लागेल यास्तव ठेविलें आहेत. से॥ दापीबाई याजकडे येक शिसमतगार नवा ठेवून दिल्हा आहे. मातुश्री कामीकडे

सट्या आहे च. त्र्यंबका कोठीचे कामावर व जामदारखाना याचे खोलींत आहे. तोही मजबूद आहे. संदूक मेळवितो. त्यांत लिहि-ल्याप्रों लेखित जाऊं. पिराजी साा दार व लक्ष्मण व समाधान व तुळाजी खास बार-दार येकूण चौघे आहेत. रात्री चौघांनी च्यार प्रहर जागत जावें. देवधर्मास जाणें तरी येथील घरचा बंदोबस्त राखून बरोबर जातात. चिंता नाहीं. जामदारखानियाचे खालीं जवळ नेहमी समाधान पुर्वा अष्टौ प्रहर वसवीत असतो. त्याजला दुसरें काम नाहीं. कलम १.

चिठी ब्रह्माणपुरी दिल्ही होती त्यास मा।रनिले आपले भेटीस आले याजमुळें आमची व त्यांची भेट जाली नाहीं. हरि-श्चंद्रपंत तेथें होते त्याजला ऐवजाविसीं विचारलें त्याच्यानें कार्य जालें नाहीं. दोन माणसें तेथून हि आणलीं होतीं उजनीस पावल्यावर त्याजला निरोप दिल्हा. बम्रू जासूद व गोविंदा म्हणोन प्यादा येकूण दोन असामी होत्या. कळावें. कलम १.

गवताची व लांकडाची बेगमी पुर्वी बाळाजीपंत याजकडून होती दिसत नाहीं. जे होईल ती करून बाकी खरीदी करावी लागेल. कलम १.

येणेंप्रमाणें कलमवार लिहिलें आहे त्या-जवरून विदित होईल. स्वारी इकडे येणार त्यापूर्वी च सुचना अगोधर आली म्हणजे दाणादुणा खरीदी करणें तरी ठीक पडेल. नाहीं तरी माहागाई होईल ऐसें आहे. यास्तव अगोधर सुचना असावी. तिकडून कोण्ही नासिकास जाईल तरी बाबाजी गणेश याजला नासिकच्या बंदोबस्ताविसीं लेहून पाठवावें. तेथें दाणादुणा कांहीं आहे. हरभारा तो व बधारियाच्या वागांतील भात वगैरे होईल ते प्रीख्त करवावें. आतां ठेऊन उपयोग काय आहे. मेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना. आपलेकडील वर्तमान वरचेवर लेहून पाठवीत जावें. हे विज्ञापना.

---

श्री.

## लेखांक २४२.

१६९६ श्रावण शुद्ध १३.

पो। छ० २७ जा॥खर श्रावण

श्रेवेसी कृष्णाजी सिवदेव सा। नमस्कार विज्ञापना. ता। श्रावण शुद्ध १३ मुक्काम अवंतिकापुरी येथें स्वामीचे कृपेंकरून वर्त-मान यथास्थित असे. विशेष. आपली रवीची वरात रतलामेवरी खंडेराव त्रिंबक याजवरी होती. चैत्रअखेरचा वायदा होता. त्यास वैशाखमासीं ऐवजाची नि-कड मा।रनिलेस केली तेव्हां सरकारांतून च्यार दिवस ऐवज न देणें म्हणोन का।दा-रास ताकीद केली. त्याजउपरीं इंदुरास श्रीमंत आले तेव्हां आम्ही यासमागमें गेलों. तेथें राजश्री आबाजी माहादेव याचे व पाटीलबाबाचें रहश करून दिल्हें आ-मचे ऐवजाची निकड लाविली तेव्हां ताकीदपत्र का।दारास दिलें. तो तें च ल-स्करास आले मागतीं त्यांनीं दोन महि-न्याचा वायदा करून घेतला कीं रसदेचा ऐवज तूर्त सरकारांत यावा लागतो. या-स्तव दोन महिन्यांनीं ऐवज पडे ऐसे सर-कारांतून करार करून त्यांणीं घेतला तो दोन महिने जाहाले रसदेचा हि ऐवज त्यास मिळेना. आणि लोकांचें हि त्यास देणें फार. माहालचा ऐवज वसूल घेतला तो मागील कर्जदारास दिल्हा. पुढें आणखी कर्जदारांनीं त्यास फार च अडविलें. रस-देचा ऐवज मिळेना. तो आमचे ऐवजास ठिकाण च नाहीं. दुसरेयास मामलत

सांगावी ऐसें जाहालें. आम्हीं आपले ऐवजाविसीं सरकारांत निकड लाविली तेव्हां त्यांणीं सांगितलें कीं तुम्हांस ऐवजाचें अगत्य असलें तरी सालमजकूरचा रसद देऊन जमा मामलत करणें म्हणजे त्याची बाकी रांगड्याकडे असेल ती तुमचे हातास येईल. नाहींतरी येणार नाहीं. खंडेराव यास निकड लावावी तरी त्याची अवस्ता फार च कठीण. त्रिंबक मल्हार याजवरी चिठी देणें म्हणोन निकड लाविली परंतु त्याचें चित्त शुध नाहीं. त्यांणीं त्यास बाहेर घातलें. चीठी कांहीं कबूल करणार नाहीं. याचे स्वाधीन त्यांणीं शें दोनशें घोडे मात्र केले. ऐवज झाडून देशास घेऊन आले. त्याजमुळें त्यास कर्ज भारी जाहालें. दुसरेयांणीं मामलत केली तरी बाकी आपले हातास येणार नाहीं. ऐसें जाणोन मामलत आपलेकडे करून घेतली. नर्मदेपर्यंत लष्करासमागमें गेलों होतो. कळावें. आषाढमासीं नर्मदेचे मुकामींहून मामलत आपलेकडे करून घेऊन येथें आलों. चवथ व नजराणा मिळोन पंचावन हजार रु॥ तूर्त यावे लागले यांची तरतूद हा कालपर्यंत करितों. रु॥ उजनींत मिळत नाहींत. सावकाराचीं झाडून दिवाळीं निघालीं फारकरून ऐवजाची तोड पडली. एका दो दिवसांत रतलामेस जाऊन आपले बाकीची रुजुवात करितों. रांगडे पंधरा वीस हजारपर्यंत बाकी कबूल आहेत त्यास रुजवातमुळें जाजती निघेल. त्यापैं॥ वसूल करून लौकरी च पाठवितों. कार्तीक मार्गश्वर मासीं वसूल चालीस लागेल. पेशजी आठावीस हजार राजश्री विष्णुपंत नानाकडे भरले. हालीं आज्ञा कराल तेथें जमा करितों आम्ही येथील बाकीची रुजुवात करितों त्याची निशा पत्रीं घेऊन दसरियाचे सुमारें भेटीस येतो. पुढें आणखी ऐवज सिंदे याजकडे येणें त्यास आपली त्याची समक्ष होईल तेव्हां त्याची तोड निघेल. याजकरितां लवकर च येतों. शेवेसी श्रुत होय हे विज्ञापना

---

श्री.

## लेखांक २४३.

१६९६ श्रावण शुद्ध १३.

राजश्रियाविराजीत राजमान्य राजश्री बाळाजीपंत आपा स्वामीचे शेवेसीः—

पो॥ कृष्णाजी सित्रदेव सां॥ नमस्कार विनंति. उपरी. येथील कुशल ता॥ श्रावण शुध १३ मुकाम अवंतिकापुरीं येथें स्वामीचे कृपेंकरून वर्तमान यथास्थित असो. विशेष. बहुत दिवस स्वामीकडून पत्र येत नाहीं तर ऐसें न करावें. सदैव पत्रीं परामर्ष करीत असावें. आम्ही येथें खर्चाचे वरातेकरितां पेचांत पडलों. निदान कोठें ठिकाण लागेना तेव्हां मामलत करणें प्राप्त जाहाली. बाकीची रुजुवात करून निघेल ते वसूल करून पाठवितों. आणि मी हि लौकर च स्वामीचे भेटीस येतों. कार्तिकमासीं कांहीं ऐवजाची तोड पाडून लौकर च येतों. इतके दिवस श्रम केले त्यासारखे ऐवज वसूल करून पाठविला म्हणजे सार्थक. नाहीं तरी व्यर्थ रिकामे येऊन काय सांगावें ? यास्तव याचा निकाल करून घेतल्यावरी येतों. कळावें. बहुत काय लिहिणें ? लोभ करावा हे विनंति.

---

श्रीम्हाळसाकांत.

## लेखांक २४४.

१६९६ श्रावण वद्य १३ वृद्धि.

राजश्री आनंद शंकर वैद्य जकात गोसावी यांसिः—

छ. अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य स्ने॥ गोविंदराव गायकवाड सेना खासखेल समशेर बहादुर दंडवत. सु॥ खमस सबैन मया अलफ बद्दल देणें शिलेदार बाबूराव काशी याची रोजमरा व अर्जबाबाचे ऐवजीं रु. ६८

श्री राजाराम
छत्रपती अखिल प्रौ
ढ प्रताप पुरंदर गोविं
दराव गायकवाड से
ना खासखेल सम
सेर बाहदर

सालमजकुरचे रसदेचे ऐवजीं देऊन पावलियाचा कबज घेणें. हिशेबीं रोजमरा असे. श्रावण अखेर निम्मे भा॥ अखेर निम्मे देऊन कबज घ्यावें.

जाणिजे. छ० २७ जमादिलाखर.

मोर्तब
सुद

बार.

---

श्रीम्हाळसाकांत.

## लेखांक २४५.

१६९६ श्रावण वद्य १३ वृद्धि.

राजश्री रतनभाई पारसी प्रो। वाणदेवी गोसावी यांसिः—

छ. अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य स्ने॥ गोविंदराव गायकवाड सेना खासखेल समशेर बहादर. रामराम सुहुरसन खमस सबैन मया व अलफ. बदल देणें सिलेदार बाबूराव कासी यासि रोजमुरा व अर्जबावचे ऐवजी प्रे॥ मजकूर येथील सालमजकूरचे रसदेचे ऐवजी रुो ४००० च्यार हजार देऊन पावलियाची कबज घेणें.

श्रीराजाराम
छत्रपती अखिल प्रौ
ढ प्रताप धुरंधर गोविं
दराव गायकवाड से
ना खासखेल सम
सेर बहादर

हिसेबी मजुरा असे. जाणिजे. छ० २७ जमादिलाखर श्रावणअखेर निमे. भा॥ अखेर निमे द्यावे. छ० मा॥र.

मोर्तब
सुद

---

श्रीम्हाळसाकांत.

## लेखांक २४६.

१६९६ श्रावण वद्य १३.

राजश्री जिवाजी रघुनाथ प्रो। कामरेज गोसावी यांसिः—

छ. अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य गोविंदराव गायकवाड सेना खासखेल समशेर बहादर दंडवत. सु॥ खमस सबैन मया अलफ बद्दल देणें शिलेदार बाबूराव काशी याचा रोजमरा व अर्जबाबचे ऐवजीं रुपये २००० दोन हजार प्रो॥ मा॥र येथील सालमजकुरचे रसदेचे ऐवजीं देऊन पावलियाची कबज घेणें. हिशेबी मुजरा असे. श्रावणअखेर निमे भा॥ अखेर निमे देऊन

कवज घ्यावें. जाणिजे. छ० २७ जमादिलाखर.

| श्री राजाराम छत्रपती अखिल प्रौढ प्रताप पुरंदर गोविंदराव गायकवाड सेना खासखेल समसेर बाहदर. | मोर्तब सुद |
|---|---|

बार.

श्रीम्हाळसाकांत.

## लेखांक २४७.

१६९६ श्रावण वद्य १३ वृद्धि.

राजश्री भिकाजी यादव प्रे॥ चिखली गोसावी यांसिः—

छ० अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य गोविंदराव गायकवाड सेनाखासखेल समशेर बाहदर. दंडवत. सु॥ खमस सबैन मया अलफ बदल देणें. शिलेदार बाबूराव काशी याची रोजमरा व अर्जबाबेचे ऐवजी रु. २००० दोन हजार प्रे॥ मा॥र येथील सालमजकूरचे रसदेचे ऐवजी देऊन पावलियाचा कवज घेणें. हिशेबी मुजरा असे. श्रावण अखेर निम्मे भा॥ अखेर निम्मे देऊन कवज घ्यावें. जाणिजे. छ० २७ जमादिलाखर.

| श्री राजाराम छत्रपती अखिल प्रौढ प्रताप पुरंदर गोविंदराव गायकवाड सेनाखासखेल समसेर बाहदर | मोर्तब सुद |
|---|---|

बार.

श्री.

## लेखांक २४८.

१६९६ भाद्रपद वद्य १.

राजश्री चिंतो विठ्ठल स्वामी गोसावी यांसि विनंती उपरी हैदर नाईक याजकडे सालगु॥ तीर्थस्वरूप राजश्री दादासाहेबीं ऐवज करार केला त्यापैकीं राजश्री कृष्णाजी नाईक दातार यांस दोन लक्ष रुपये द्यावयाचा ठराव तुमचे विद्यमान अप्पाजीराम याजवळ जाहाला त्याविशीं मागें तुमचें व नाईकांचें पत्र घेऊन अप्पाजीराम यांजकडे पाठविलें होतें. त्याचे जाब आले ते पाहून नाईकांस दाखवून राजश्री नारो अप्पाजी याजकडे पाठविले आहेत ते तुम्हांसी बोलतील. त्यास येविसीं फिरोन कागदपत्र काय लागतील ते तयार करून नाईक सांगतील त्याप्रमाणें ऐवज आणावयाची तर्तूद करून ऐवज सरकारांत सत्वर येई तें करणें + जाणिजे छ० १३ रजब सु॥ खमस सबैन मया व अलफ* हे विनंति.

श्री.

## लेखांक २४९.

१६८९ कार्तिक शुद्ध ७.

राजश्री————

छ० अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य स्ने॥ तुकोजी होळकर दंडवत. सु॥ समान सितैन मया व अलफ राजश्री नानाजी गोविंद यांची बोली सरकारांत सालमज-

+ ह्या फुलीपुढील अक्षर नानाफडणिसांचें; व * ह्या फुलीपुढील चार अक्षरें सखारामबापूचीं.

कुरीं करून त्यांच्या पथकाच्या सरंजामांत प॥ मजकूर ऐवजीं जागा रुपये १४२४८॥ चौदाहजार दोनशें साडे अठेतालिस रुपयाची करार करून हें पत्र सादर केलें असे. तर तुम्हीं प॥ मजकूर पै॥ सदरहू चौदाहजार दोनशें साडे अठेचाळिस रुपयाचे तनखियाचे गांव मशारनिलेस नेमून देऊन चालविणें. जाणिजे छ० ५ जमादिलाखर. बहुत काय लिहिणे ?

श्री
म्हाळसाकां
त चरणी तत्प
र मल्हारजि सु
त तुकोजी हो
ळकर.

मोर्तब
सुद.

बार.

---

श्रीशंकर.

## लेखांक २५०.

१६९६ कार्तिक.

हिसेब बाबूराव कासी सिलेदार सु॥ खमस सबैन इ॥ छ १४ साबान गुदस्त त॥ छ १५ रमजान सालमजकूर येणें माहे १३ तैनात बारमाही नक्की रु॥

३३२०० बारमाही तैनात

| | | |
|---|---|---|
| ३००० | खासा | १ |
| ५००० | असामदार | ५ |
| १२०० | कारकून | १ |
| २४००० | स्वार अ॥ ८० दर ३०० | |
| ३३२०० | | ८७ |

२७५० जाजती माहे १ दरमहा रु॥

३५९५०

पैकीं वजा सूट माहे २ दरमहा रु॥ ३००० प्रे॥ ६०००

बाकी २९९५०

पैकीं दरबारी खर्च दरसदे प्रे॥ १० प्रे॥ रु. २९९५

बाकी २६९५५

वसूल वाटे सुधा गु॥ रु॥ २८१४

बाकी रु॥ २४१४१

पैकीं वजा नाणे वटा दरसदे रु॥ १५॥ प्रे॥ ३७७२

बाकी नख्त रुपये २०३६९

पालखीची तैनात रु॥ ९००

ये १००० चाकरी माहे १३

आकार १०८० वजा सूट

माहे २ दरमहा रु॥ ९० प्रे॥ १८०

बाकी रु.

अफतागीर बदल रु॥ ७५

२१३४४

रु॥

६४८॥ पोतापैकी सालमजकूर

परभारे बराता महालानिहाय

| | |
|---|---|
| १००० | प्र॥ बालेश्वर २०० पैकीं |
| २००० | प्र॥ कामरज |
| ३४१॥ | की॥ कटोदरें दर ६८१॥ पैकीं |
| २००० | प्र॥ घनदेवी ४०० पैकीं |
| १००० | प्र॥ मोई |
| २००० | प्र॥ चिखली |
| ४३१७॥ | लालजी प॥ प्र॥ पेटलाद |
| ५०० | प्र॥ ढवलके |
| ३ | गु॥ पैकीं |
| ८७७ | पादरे |
| ० | सोनगड पेशजी १००० गेर |

१४०३९॥

१४६८७॥

| | |
|---|---|
| | ६६५६॥ |
| बाकी | २१३८॥ |
| किता मोबम वि॥ मोरो दामोदर २३२७॥ वसूल १८९ बाकी लग्नाबद्दल देविले | १००० |
| | ९७९५ |

यासी ऐवज रु॥
१००० सोनगड वरात
१२०० नख्त देविले

२२०० ६९९५

| | |
|---|---|
| बाकी | ५ |
| जाजती दिल्हे | |
| | ७००० |

यासी येवज माहाला निहाये रु॥
११५० प्र॥ व्यारें
११५० प्र॥ राणी आई अंतापूर
११५० प्र॥ चिखली
११५० प्र॥ माहे
१२५० प्र॥ वडवड
१२५० प्र॥ खडकीधा मोडी

७०००

श्रीम्हाळसाकांत.

## लेखांक २५१.

१६९६ कार्तिक वद्य १२.

राजश्री भगवंतराव गायकवाड पो॥ व्यारें गोसावी यासः—

छ. अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नेे॥ गोविंदराव गायकवाड सेनाखासखेल समशेरबहादर दंडवत रामराम. सु॥ खमस सबैन मया व अलफ बदल देणें सिलेदार बाबूराव कासी यासि रुसकतीचे ऐवजीं रु॥ ११५० साडे अकरासे प्र॥ म॥रीचे ऐवजी देऊन कबज घेणें. जाणिजे छ० २५ माहे रमजान.

श्री राजाराम
छत्रपती आखिल प्रौ
ढप्रताप धुरंधर गोविं
दराव गायकवाड से
नाखासखेल सम
सेर बाहदर

मोर्तब सुद.

श्रीम्हाळसाकांत.

## लेखांक २५२.

१६९६ कार्तिक वद्य १२.

राजश्री रतनजी पारख* पो॥ घनदेवी गोसावी यांसिः—

छ. अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य गोविंदराव गायकवाड सेनाखासखेल समशेर बाहदर रामराम सु॥ खमस सबैन मया अलफ बदल देणें शिलेदार बाबूराव काशी याची देणें रुपये २००० दोनहजार पो॥ म॥रीचे ऐवजी देऊन कबज घेणे. जाणिजे. छ० २५ माहे रमजान.

श्री राजाराम
छत्रपती आखिल प्रौ
ढ प्रताप पुरंदर गोविं
दराव गायकवाड से
नाखासखेल सम
शेर बाहदर

मोर्तब सुद.

* रतनजी पारसी हा पारख होता.

श्रीम्हाळसाकांत.

## लेखांक २५३.

१६९६ कार्तिक वद्य १२.

राजश्री आनंद शंकर वैद्य जकात किल्ला कटोद्रें गोसावी यांसिः—

छ. अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य गोविंदराव गायकवाड सेनाखासखेल समशेर बाहदर दंडवत. सु॥ खमस सबैन मया अलफ राजश्री बाबूराव काशी याची वरात पेशजी सादर आहे. त्यास वराते प्रो॥ ऐवज पत्रदर्शनीं देऊन कबज घेणें. फिरोन बोभाट येऊं न देणें. जाणिजे छ० २५ माहे रमजान.

| श्री राजाराम छत्रपती अखिल प्रौ ढप्रताप पुरंदर गोविं दराव गायकवाड से नाखासखेल सम सेर बाहदर | मोर्तब सुद |
|---|---|

---

श्रीम्हाळसाकांत.

## लेखांक २५४.

१६९६ कार्तिक वद्य १२.

राजश्री बाळाजी विश्वनाथ पे॥ मोंहे गोसावी यासी—:

छ. अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य गोविंदराव गायकवाड सेनाखासखेळ समशेर बाहदर. दंडवत सु॥ खमस सबैन मया अलफ राजश्री बाबूराव काशी याची वरात दर्शनीं तुम्हावरी सादर आहे. त्यास वराते प्रे॥ ऐवज पत्रदर्शनीं देऊन कबज घेणें. फिरोन बोभाट येऊं न देणें. जाणिजे. छ०२५ माहे रमजान.

| श्री राजाराम छत्रपती अखिल प्रौ ढप्रताप पुरंदर गोविं दराव गायकवाड से नाखासखेलसम सेरबाहदर | मोर्तब सुद |
|---|---|

---

श्रीम्हाळसाकांत.

## लेखांक २५५.

१६९६ कार्तिक वद्य १२.

राजश्री जिवजी रघुनाथ पे॥ कामरेज गोसावी यांसिः—

छ. अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य गोविंदराव गायकवाड सेनाखासखेल समशेर बाहदर दंडवत. सु॥ खमस सबैन मया अलफ रा॥ बाबूराव काशी याची वरात पेशजी तुम्हावरी सादर आहे. त्यास वरातेचा ऐवज अद्यापि दिल्हा नाहीं तरी हालीं पत्रदर्शनीं देऊन कबज घेणें. फिरोन बोभाट येऊं न देणें. जाणिजे. छ २५ माहे रमजान.

| श्री राजाराम छत्रपती अखिल प्रौ ढ प्रताप पुरंदर गोविं दराव गायकवाड से ना खासखेल सम सेर बाहदर | मोर्तब सुद |
|---|---|

---

श्रीम्हाळसाकांत.

## लेखांक २५६.

१६९६ कार्तिक वद्य १२.

श्री राजाराम
छत्रपती अखिल प्रौ
ढ प्रताप पुरंदर गोविं
दराव गायकवाड से
नाखासखेल सम
सेर बाहदर

चिरंजीव राजश्री त्र्यंबकराव गायकवाड प्र॥ खडक धामोडी यप्रति गोविंदराव गायकवाड सेनाखासखेल समशेर बाहदर आशिर्वाद सु॥ खमस सबैन मया अलफ बदल देणें शिलेदार बाबूराव काशी यासी रुकसतीचे ऐवजी रुपये १५०० दीडहजार प॥ मा॥ रीचे ऐवजीं देऊन कबज घेणें जा॥णिजे छ २५ माहे रमजान.

मोर्तब
सुद.

---

श्रीम्हाळसाकांत.

## लेखांक २५७.

१६९६ कार्तिक वद्य १२.

राजश्री सिदो तुकदेव पो. चिखली गोसावी यांसि:—

छ. अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य गोविंदराव गायकवाड सेनाखासखेल समशेर बाहदर दंडवत. सु॥ खमस सबैन मया अलफ बदल देणें सिलेदार बाबूराव काशी यासी रुसकतीचे ऐवजीं रुपये ११५० साडे अकरासे पो मजकूरीचे ऐवजीं देऊन कबज घेणें. जा॥णिजे छ० २५ माहे रमजान.

श्रीराजाराम
छत्रपती अखिल प्रौढ
प्रताप पुरंदर गोविंदराव
गायकवाड से
ना खासखेल सम
सेर बहादर.

मोर्तब
सुद.

बार.

---

श्रीम्हाळसाकांत.

## लेखांक २५८.

१६९६ कार्तिक वद्य १२.

राजश्री जिवाजी रघुनाथ पे॥ कामरेज गोसावी यांसि:—

छ. अखंडितलक्ष्मी अलंकृत राजमान्य गोविंदराव गायकवाड सेनाखासखेल समशेर बाहदर दंडवत. सु॥ खमस सबैन मया अलफ बदल देणें शिलेदार बाबूराव काशी यांसि देणें रुपये २००० दोन हजार पे॥ म॥रीचे ऐवजीं देऊन कबज घेणें. जाणिजे. छ० २५ माहे रमजान.

श्रीराजाराम
छत्रपती अखिल प्रौढ
प्रताप पुरंदर गोविं
दराव गायकवाड से
नाखासखेल सम
सेर बाहदर.

मोर्तब
सुद.

बार.

---

श्रीम्हाळसाकांत.

## लेखांक २५९.

१६९६ कार्तिक वद्य १२.

| श्री राजाराम<br>छत्रपती अखिल मौ<br>ढ प्रताप पुरंदर गोविं<br>दराव गायकवाड से<br>नाखासखेल सम<br>सेर बाहदर |
|---|

चिरंजिव राजश्री त्रिंबकराव गायकवाड पो। वलवडे या प्रती गोविंदराव गायकवाड सेना खासखेल समशेर बाहदर आशिर्वाद. सु॥ खमस सबैन मया अलफ वदल देणें शिलेदार बाबूराव काशी यांची रुकसतीचे ऐवजीं रुपये १५०० दीड हजार पे॥ मा॥रीचे ऐवजीं देऊन कबज घेणें. जाणिजे. छ० २५ माहे रमजान.

| मोर्तब<br>सुद |
|---|

बार.

---

श्रीम्हाळसाकांत.

## लेखांक २६०.

१६९६ कार्तिक वद्य १२.

राजश्री भगवंतराव गायकवाड पे॥ आंतापूर.

छ॥ अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य गोविंदराव गायकवाड सेनाखासखेल समशेर बाहदर रामराम. सु॥ खमस सबैन मया अलफ बदल देणें सिलेदार बाबूराव काशी यासी रुकसतीचे ऐवजी रुपये ११५० साडे अकरासे पे॥ मा॥रीचे ऐवजीं देऊन कबज घेणें. जाणिजे. छ० २५ माहे रमजान

| श्री राजाराम<br>छत्रपती अखिल मौ<br>ढ प्रताप पुरंदर गोविं<br>दराव गायकवाड से<br>ना खासखेल सम<br>सेर बाहदर. |
|---|

| मोर्तब<br>सुद |
|---|

बार.

---

श्रीम्हाळसाकांत.

## लेखांक २६१.

१६९६ कार्तिक वद्य १४.

गंगाभागीरथी मातुश्री भवानीबाई गायकवाड वडिलांचे सेवेसीः—

अपत्य गोविंदराव गायकवाड शेना खासखेल समशेर बहादर दंडवत विनंती. उपरी बदल देणें राजश्री बाबूराव कासी नि॥ चिंतो विठ्ठल यांस सोनगड जिल्हेचे सुकडीचें ऐवजी रु॥ १००० एक हजार देऊन पावलियाची कबज घेणें. हिसेबी मजुरा असे जाणिजे. छ० २७ माहे रमजान.

| मोर्तब<br>सुद |
|---|

---

श्रीम्हाळसाकांत.

## लेखांक २६२.

१६९६ कार्तिक वद्य ३०.

चिरंजीव राजश्री त्र्यंबकराव गायकवाड पे॥ खडक धामोडी यांसि गो[illegible]

कवाड आशिर्वाद सुहुर सन खमस सबैन मया अलफ बाबूराव काशी नि॥ राजश्री चिंतो विठ्ठल याची वरात तुम्हावर सादर आहे. त्यास मा॥रनिले रुख्सत होऊन देशीं जातात. त्यास वराते प्रे॥ ऐवज तूर्त देऊन पावलियाचा कबज घेणें. फिरोन बोभाट येऊं न देणें. जाणिजे छ० २८ माहे रमजान.

| श्री राजाराम<br>छत्रपति अखिल प्रौ<br>ढ प्रताप पुरंदर गोविं<br>दराव गायकवाड से<br>नाखासखेल सम<br>सेर बाहदर | मोर्तब<br>सुद |
|---|---|

श्रीम्हाळसाकांत.

## लेखांक २६३.

१६९६ कार्तिक वद्य ३०.

राजश्री सिदो तुकदेव पे॥ चिखली गोसावी यांसिः —

छ. अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य गोविंदराव गायकवाड सेनाखासखेल समशेर बाहदर. दंडवत सु॥ खमस सबैन मया अलफ राजश्री बाबूराव काशी याची वरात पेशजी सादर आहे. त्यास वराते पे॥ ऐवज पत्रदर्शनीं देऊन कबज घेणें बोभाट येऊं न देणें. जाणिजे छ० २५ माहे रमजान.

| श्रीराजाराम<br>छत्रपती अखिल प्रौ<br>ढ प्रताप पुरंदर गोविं<br>दराव गायकवाड से<br>नाखासखेल सम<br>सेर बाहदर | मोर्तब<br>सुद |
|---|---|

श्रीम्हाळसाकांत.

## लेखांक २६४.

१६९६ कार्तिक वद्य ३०.

गंगा भागीरथी मातुश्री भवानी बाई गायकवाड वडिलांचे से॥.

अपत्य गोविंदराव गायकवाड सेनाखासखेल समशेर बाहदर. दंडवत विनंती उपरी राजश्री बाबूराव काशी याची वरात तुम्हावर सादर आहे. त्यास मा॥रनिले रुख्सत होऊन देशीं जातात. यांस वराते प्रे॥ ऐवज तूर्त देणें आणि पावलियाचा कबज घेणें. फिरोन बोभाट येऊं न देणें. रा॥ छ० २८ माहे रमजान.

| मोर्तब<br>सुद |
|---|

श्रीम्हाळसाकांत.

## लेखांक २६५.

१६९६ कार्तिक वद्य ३०.

राजश्री भगवंतराव गायकवाड पे॥ आंतापुर गोसावी यांसि.

छ. अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य गोविंदराव गायकवाड सेना खासखेल समशेर बाहदर रामराम सुहुर सन खमस सबैन मया अलफ बाबूराव काशी नि॥ राजश्री चिंतो विठ्ठल याची वरात तुम्हावर सादर आहे त्यास मशारनिले रुख्सत होऊन देशीं जातात. त्यास वराते प्रे॥ तूर्त ऐवज देणें.

फिरोन बोभाट येऊं न देणें. छ० २८ माहे रमजान.

| श्री राजाराम छत्रपती आखिल प्रौढप्रताप पुरंदर गोविंदराव गायकवाड सेनाखासखेल समसेर बाहदर | मोर्तब सुद. |
|---|---|

श्रीम्हाळसाकांत.

## लेखांक २६६.

१६९६ कार्तिक वद्य ३०.

राजश्री रतनजी पारसी परगणें धणदेवी गोसावी यांसिः—

छ. अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य गोविंदराव गायकवाड सेना खासखेल समसेर बाहदर रामराम. सुहूर सन खमस सबैन मया अलफ बाबूराव काशी नि। राजश्री चिंतो विठ्ठल यांची वरात तुम्हांवर सादर आहे. त्यास म॥रनिले रुस्कत होऊन देशीं जातात. यांस वरातें प्रो॥ ऐवज तूर्त देऊन पावलियाचा कबज घेणें. फिरोन बोभाट येऊं न देणें. छ० २८ माहे रमजान.

| श्री राजाराम छत्रपती अखिल प्रौढप्रतापपुरंदर गोविंदराव गायकवाड सेनाखासखेल समसेर बाहदर | मोर्तब सुद. |
|---|---|

श्रीम्हाळसाकांत

## लेखांक २६७.

१६९६ कार्तिक वद्य ३०.

राजश्री भगवंतराव गायकवाड.

छ. अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य गोविंदराव गायकवाड सेनाखासखेल समसेर बाहदर रामराम. सुहूर सन खमस सबैन मया अलफ राजश्री बाबूराव काशी नि। चिंतो विठ्ठल यांची वरात तुम्हावर सादर आहे. त्यासि मशारनिले रुस्कत होऊन देशीं जातात त्यासि वरातें प्रो॥ तूर्त ऐवज देणें. फिरोन बोभाट येऊं न देणें रा॥ छ० २८ माहे रमजान.

| श्री राजाराम छत्रपति अखिल प्रौढ प्रताप पुरंदर गोविंदराव गायकवाड सेना खासखेल समसेर बाहदर | मोर्तब सुद. |
|---|---|

श्रीम्हाळसाकांत.

## लेखांक २६८.

१६९६ कार्तिक वद्य ३०.

चिरंजीव राजश्री त्र्यंबकराव गायकवाड प्रो॥ बलवाड यांसिः—

गोविंदराव गायकवाड सेनाखासखेल समशेर बाहदर आशिर्वाद. सुहूर सन खमस सबैन मया अलफ बाबूराव काशी नि। राजश्री चिंतो विठ्ठल यांची वरात तुम्हांवर सादर आहे. त्यास म॥रनिले रुस्कत होऊन देशीं जातात यास वरातें प्रो॥ ऐवज तूर्त देऊन पावलियाचा कबज घेणें. फिरोन बोभाट येऊं न देणें. रा॥ छ० २८ माहे रमजान. बहुत काय लिहिणें ? हा आशिर्वाद.

| श्री राजाराम छत्रपती आखिल प्रौढ प्रताप पुरंदर गोविंदराव गायकवाड सेना खासखेल समसेर बाहदर | मोर्तब सुद. |
|---|---|

श्री.

## लेखांक २६९.

१६९६ पौष वद्य २.

तेरीज शिलेदार सु॥ खमस सबैन छ० १५ जिल्काद पर्यंत रुपये

| | | वसुल | | बाकी |
|---|---|---|---|---|
| निराजी त्र्यंबक | ५ | ७६८ | ५१८॥।·॥। | २४९ऽ=। |
| व्यंकाजी गिरमाजी | ५ | ८१४ | ४५६॥=॥ | ३५७।·॥ |
| येसाजी वागदरे | ५ | ९७२ | ४६४॥· | ५०७॥ |
| यमाजी कोकोटे | ७ | १०९४ | ६०२॥।=॥। | ४९१ऽ-। |
| राणोजी गाडे | ११ | १६८५ | ७७९॥=॥। | ९०५।-। |
| कान्होजी कदम | ३ | ५०९ | २०९॥=॥ | २९९।-॥ |
| भवानजी सुरवे | ३ | ३१४ | १६५ऽ=॥ | १४८॥।·॥ |
| खंडोजी कादरे | २ | ३५७ | २४४॥।- | ११२ऽ= |
| रंगराव | ५ | ७३० | २१५॥ | ५१४॥· |
| फिगोजी शिंदे | ४ | ५१९ | ३०१ऽ-॥ | २१७:॥=॥ |
| थोरात | ३ | ४८९ | ४२७॥।·। | ५१ऽ=॥। |
| घाटगा | १ | १७० | १७०।=॥। | ·।=॥। |
| विगवर | १ | १८५ | ८० | १०५ |
| रावोवा | १ | १४० | १३९॥- | ·।ॅ |
| बहिरजी | १ | १८७ | २१ऽ= | १६५॥।= |
| मोरो रघुनाथ | ३ | ४५४ | २६५ऽ=। | १५८॥।-॥। |
| केशवराव | १ | १७३ | ११७॥।= | ५५ऽ=। |
| कृष्णपुरी | २ | ५२५ | २८२।=॥। | २४२ |
| मनाजी जाधव | १ | १२० | ११५॥-॥ | ४।=॥ |
| संताजी राऊ सिंदे | १ | ११ | १०।=॥ | ·॥-॥ |
| साकरोजी महाडीक | २ | ४६ | ४०॥।ॅ | ५ऽ- |
| भीकाजीपंत | २ | ६ | ६ | ० |
| | | | | ४५०=।ॅ। |

---

श्रीम्हाळसाकांत.

## लेखांक २७०.

१६९६ मार्गशीर्ष शुद्ध १.

राजश्री भगवंतराव गायकवाड पे॥ ओतापूर.

छ. अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य गोविंदराव गायकवाड सेनाखासखेल समशेर बाहदर रामराम सु॥ खमस सबैन मया अलफ बदल देणें शिलेदार बाबूराव काशी यासी रुकसतीचे ऐवजीं रु १००० येक-हजार पे॥ मजकुरचे ऐवजीं देऊन कबज घेणें जाणिजे छ० २९ माहे रमजान.

| श्रीराजाराम छत्रपती अखिल प्रौढ प्रताप पुरंदर गोविंदराव गायकवाड सेनाखासखेल समशेर बाहदर | मोर्तब सुद |
|---|---|

---

श्रीम्हाळसाकांत.

## लेखांक २७१.

१६९६ मार्गशीर्ष शुद्ध १.

राजश्री भगवंतराव गायकवाड पे॥ गोसावी यासिः—

छ. अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य गोविंदराव गायकवाड सेनाखासखेल समशेर बाहदर रामराम सु॥ खमस सबैन मया अलफ बदल देणें शिलेदार बाबूराव काशी यासी रुकसतीचे ऐवजी रु ७०० सातशे प्र॥ मजकूरचे ऐवजी देऊन कबज घेणें. जाणिजे.

छ० २९ माहे रमजान.

| श्रीराजाराम छत्रपती अखिल प्रौढ प्रताप पुरंदर गोविंदराव गायकवाड सेनाखासखेल समशेर बाहदर | मोर्तब सुद |
|---|---|

---

श्रीम्हाळसाकांत.

## लेखांक २७२.

१६९६ मार्गशीर्ष शुद्ध १.

राजश्री भगवंतराव गायकवाड पे॥ अनावल गोसावी यांसिः—

छ. अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य गोविंदराव गायकवाड सेनाखासखेल समशेर बाहदर रामराम. सु॥ खमस सबैन मया अलफ बद्दल देणें शिलेदार बाबूराव काशी याची रुकसतीचे ऐवजीं रुपये १५० दीडसे पा॥ मा॥रचे ऐवजीं देऊन कबज घेणें. जाणिजे. छ० २९ माहे रमजान.

| श्री राजाराम छत्रपती अखिल प्रौढ प्रताप पुरंदर गोविंदराव गायकवाड सेनाखासखेल समसेर बाहदर | मोर्तब सुद |
|---|---|

श्रीम्हाळसाकांत.

## लेखांक २७३.

१६९६ मार्गशीर्ष शुद्ध १.

राजश्री भगवंतराव गायकवाड पे।। कोंढ गोसावी यांसि:—

छ. अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य गोविंदराव गायकवाड सेनाखासखेल समशेर बाहदर रामराम. सु।। खमस सबैन मया अलफ बदल देणें सिलेदार राजश्री बाबूराव काशी यासी रुकसतीचे ऐवजीं रु. १५० दीडशे पे।। मा।रीं ऐवजीं देऊन कबज घेणें.

जाणिजे. छ० २९ माहे रमजान.

| श्री राजाराम<br>छत्रपती अखिल पौ<br>ढ प्रताप पुरंदर गोविं<br>दराव गायकवाड से<br>ना खासखेल सम<br>सेर बाहदर | मोर्तब<br>सुद |
|---|---|

वार.

---

श्रीम्हाळसाकांत.

## लेखांक २७४.

१६९६ मार्गशीर्ष शुद्ध २.

राजश्री भगवंतराव गायकवाड आंतापुर

छ. अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य गोविंदराव गायकवाड सेनाखासखेल समशेर बाहदर रामराम. सु।। खमस सबैन मया अलफ राजश्री बाबूराव काशी याची वरात तुम्हांवरी सादर आहे. त्यास मुशारनिलेची रुकसती जाहली आहे. तर पत्रदर्शनीं देऊन कबज घेणें. जाणिजे. छ० ३० माहे रमजान.

| श्री राजाराम<br>छत्रपती अखिल पौ<br>ढ प्रताप पुरंदर गोविं<br>दराव गायकवाड से<br>नाखासखेल सम<br>सेर बाहदर | मोर्तब<br>सुद |
|---|---|

---

श्रीम्हाळसाकांत.

## लेखांक २७५.

१६९६ मार्गशीर्ष शुद्ध २.

राजश्री भगवंतराव गायकवाड पे।। कोंढ गोसावी यांसी—:

छ. अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य गोविंदराव गायकवाड सेनाखासखेल समशेर बाहदर. रामराम सु।. खमस सबैन मया अलफ. रा।। बाबूराव काशी याची वरात तुम्हांवरी सादर आहे. त्यास वरातेचा ऐवज पत्रदर्शनीं देणें. मुशारनिलेची रुकसती जाली आहे तरी ढील न करणें. देऊन कबज घेणें. जाणिजे. छ० ३० माहे रमजान.

| श्री राजाराम<br>छत्रपती अखिल पौ<br>ढ प्रताप पुरंदर गोविं<br>दराव गायकवाड से<br>नाखासखेल सम<br>सेर बाहदर | मोर्तब<br>सुद |
|---|---|

---

श्रीम्हाळसाकांत.

## लेखांक २७६.

१६९६ मार्गशीर्ष शुद्ध २.

राजश्री भगवंतराव गायकवाड पे॥ गोसावी यांसिः—

छ अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य गोविंदराव गायकवाड सेनाखासखेल समशेर बाहदर रामराम. सु॥ खमस सबैन मया अलफ रा. बाबूराव काशी याची वरात तुम्हावरी सादर आहे. त्यास याची रुसकती जाली आहे तरी पत्रदर्शनीं ऐवज देऊन कबज घेणें. जाणिजे. छ० ३० * माहे रमजान.

श्रीराजाराम
छत्रपती आखिल प्रौ
ढप्रताप पुरंदर गोविं
दराव गायकवाड से
नाखासखेल सम
सेर बाहदर

मोर्तब
सुद

---

श्रीशंकर.

## लेखांक २७७.

१६९६ माघ.

१
पै

ताळेबंद राजश्री बाबूराव काशी सिलेदार पतक दि॥ राजश्री गोविंदराव गायकवाड सेना-खासखेल समशेर-बाहदर इ॥ छ० १५ रजब अश्विनमास सु॥ अर्बा सबैन ता॥ छ० ३० जिल्काद पौशमास सु॥ खमस सबैन मया अलफ जमारुपये.

* मोडकांच्या जंत्रींत रमजान ३० नाहीं.

तां॥

७८३८८= सरकारपैकीं जमा

३६८३॥ पोत्यापैकीं गु॥ लखापा नाईक खटावकर

२८१४ किता

१८९ किता

६४८॥ किता

३२ जखमी ब॥

---

३६८३॥

४१५४॥= परभारे वराता व नख्त

१००० प्र॥ बालेश्वर वरात

५०० प्र॥ ढवळके वरात

९२७ ठाणे पादरे

८७७ गु॥ धोंडजी भिसे

५० गु॥ लखापा

---

९२७

३ गु॥ महीपतराव

२५ गु॥ भोबन भाई

२५ गु॥ मोरो येशवंत

२९३ गु॥ अंताजी नागेश

४३ नख्त

२५० उसनवार १

---

२९३

१०० वरातेवर स्वार गेले त्यास अहाजबानी स्वार

८१॥= गु॥ लखापा ने॥

१२० रुसकती समई गु॥ लखापा

---

४१५४॥=

---

७८३८८=

ता॥
७२६३॥ रुजुवात नरसीपंत
ता॥ अपा फडणीस
३५८० परभारे वराता
१००० वालेश्वर
५०० ढवळके
८७७ पादरे
१२०० किता रुवक
३ किता

३५८०
३६८३॥ पोत्यापैकीं
२८१४ किता
६४८॥ किता
१८९ किता १०
३२ जखमी

७२६३॥
५१४॥≈ रुजुवातेसिवाय

७८३८८≈
२५ थोबनभाई
२५ मोरो येसवंत
५० पादरेल ख॥
१०० वरात स्वार
२९३ अंताजी नागेश
८१॥≈ लखापा
१३८।-। कमावीस तुटीपैकी व कसर
८४६॥-। उचापत हाकावणी व जमा-
लीं गैर
३२॥ घोडी काढणावळ
८४॥≈। कर्ज अमदनपैकी जमा
३५३८॥-॥ कर्ज हासना जमा
७०२ वि॥ चिंतो विठल
२५५ उंटाबदल घेतले
४० चांदणीबदल
२०० गु॥ धोंडावा नाईक
२५ देणें रंगराव
१२ देणें रजपूत कापडाव॥
२०० नख्त लस्करातून अलिमाव
गु॥ भिमाजीपंत

४० वि॥ गवाजीपंत बावा
४१९८≈ किरकोळी नी॥ वार
१६२ गु॥ अवाजी नाईक कापडाव॥
५०० गु॥ दौलत बाबूराव
३०० बाजी विश्वनाथ उरोडेकर
५ सोनवर्णाव॥ वि॥ सद
रु. २०० वि॥ बाबूराव रामचंद्र व बापू
भट याचे कर्ज येमाजी को-
काटे याजकडे रु॥ १०५ होते.
तें वसूल करून घेतलें परभारें.
तैनातींत येमाजी मा॥र याचे
रु. २०० गु॥ रामाजीपंत नासीककर
घोडीव॥
रु. ३५० गु॥ बाबूराव रामचंद्र
घोडा रास १ बा॥
रु. ९ गु॥ रंगराव हावला फिरंगोजी
सिंदा
रु. ७ गु॥ बापूजी शंकर दि॥ दौलत
बाबूराव.

श्री.

लेखांक २७८.

१६९७ चैत्र शुद्ध ५.

श्री
मन्मल्हारि चर
णी तत्पर खंडोजी
सुत मालराव
होळकर.

दस्तक सरकार राजश्री तुकोजी शिंदे

त॥ कमाविसदारान व राहादारान व ठाणेदारान व जमीदारान व जकाते बाजे लोक महालानिहाय सु॥ खमस सबैन मया व अलफ. रा॥ गणेश सिवराम नि॥ राजश्री चिंतो विठ्ठल हे कसबें महेश्वरींहून देशीं जात आहेत. समागमें घोडीं रास पांच व माणसें सात असेत यांसीवाय बटीक एक अशीं जात असेत त्यांजला कोणेविशीं मुजाहीम न होतां आपलाली हद्दपार करून देत जाणें. जाणिजे छ० ४ सफर.

मोर्तब सुद

---

श्री.

## लेखांक २७९.

१६९७ चैत्र शुद्ध ६.

राजश्री त्रिंबक बाबूराव कमाविसदार सरकार बिज्यागड गोसावी यांसिः--

स्ने॥ अहिल्याबाई होळकर दंडवत सु॥ खमस सबैन मया व अलफ. रा॥ गणेश शिवराम निसबत राजश्री चिंतो विठ्ठल यांजकडील देशास जात आहेत. त्यास खरगोणास आल्यावर याजबराबर माणसें देऊन आपली हद्दपार करून देणें. असेरीस पावते करून देणें. जाणिजे छ० ७ ॱफर. बहुत काय लिहिणें ?

मोर्तब सुद

---

श्री.

## लेखांक २८०.

१६९७ कार्तिक शुद्ध १.

रोखा शके १६९७ मन्मथनाम संवत्छरे कार्तिक शु॥ १ ते दिवसी खत लिखिते धनकोनाम राजश्री चिंतोपंततात्या यासी रिणकोनाम मल्हार खंडेराव कस्तुरे आत्मकार्य-परत-संमंधे तुम्हापासोन घेतले कर्ज म॥ भिवजी ना॥ येवलेकर मु॥ रुपये १२०९१ अक्षरीं बारा हजार येक्याण्णव यासी व्याज दरमहा दर सदे रुपये १ येकोत्रा प्रमाणें देऊं हे खत लिहिलें सही वि॥ ३० चिंनसुट देऊं.

### साक्ष.

१ पत्रा-प्रमाणें साक्ष केसो महादेव सिवारे क॥ पुणतांबे

पत्रा-प्रमाणें साक्ष राघोपंत जनार्दन दाउदखानी क॥ पुणतांबे सरकार संगमनेर

१ साक्ष शुक्लंभट चित्राव

गणेश तुळजी दि॥ म॥रानिले

पत्र-प्रे॥ बाबा वैष्णव मांडवगणे त्र्यंब (क) कर

---

श्री.

## लेखांक २८१.

१६९७ कार्तिक शुद्ध १.

पार माहास्थल मौजे पाथरडी

दर्या वे॥ मोकदम मौजे हत्राळ सैद॒॰॰ प्र॥ संत्रगाव सु॥ सन ११८५ ॰॰॰ जामीनक॥ लिहून दिधला ऐसाजे ॰॰॰ मानत बो॥ मानको शामराज ॰॰॰ मल्हार कुळकर्णी मौजे साके॰॰॰ यांस आपण हजीर

कीं याचा व मौजे म॥रचे मोकदम व समस्त दाहीजन या उभयतांचा गाव नि॥ हिसेबाचा लढा आहे, यानिमित्य तुमचे थळास आले. त्यास तुम्ही आपले माय-थळ करून मौजे टेंभुरणीचा पार दिल्हा. तेथें जाऊन म॥रनिले जाऊन हिशेबाचा फडच्या करितील. न करतां हजीर न जाले तर हजीर करूं. न करूं सको तर म॥रनि-लेचे निसबर्तीचा जाव करूं. हा जामीन-क़रार लिहिला. सही.

बा॥ भवानी येशवंत कुळकर्णी मौजे म॥र — निशाणी नांगर

त॥ छ० २९ माहे साबान

---

श्री.

## लेखांक २८२.

१६९७ कार्तिक शुद्ध १.

श्रीमंत राजश्री तात्यासाहेब.

दर्या वे॥ देवजी पा॥ मे॥ मोजे काळेगांव प्रा॥ सेवगांव सु॥ सन ११८५ कारणें. जामीनकदबा लेहून दिधला ऐसाजे. बीजमानत घो। नागोजी येकसिंग मौजे साकेगांव प्रा॥ म॥र यांस आपण हजीर जामीन असो. आजी सबब कीं म॥रनि-लेकडे सरकारची बाकी आहे. सबब म॥रनिले हजीर राहून फडच्या करितील. फडच्या न करितां गैरहजीर जाहाले तर हजीर करूं. न करूं तर म॥रनिलेच्या नि॥ जाब करूं. हे जामीनकदबा लेहून दिल्हा. सही.

गाही — नि॥ नांगर

मकाजी पा॥ आंबवे मौजे चितळी. — वि॥ चिंतो नागेश जोसी कुळकर्णी मौजेम॥र.

गोमा महार बादल मौजे म॥र.

---

श्री.

## लेखांक २८३.

१६९७ कार्तिक शुद्ध १.

श्रीमंत राजश्री चिंतोपंत तात्यासाहेब.

दर्या वे॥ लछीराम परदेशी मु॥ मौजे साकेगांव प्रा॥ सेवगाव सु॥ सन ११८५ कारणें जामीनकदबा लेहून दिधला ऐसाजे. बीजमानत रो। रामजी गंगे मौजे म॥र यांसि आपण हजीर जामीन असो. आजी सबब कीं सरकारबाकी त्याजकडे आहे. त्याचा फडच्या करील. फडच्या न करिता गैरहजीर जाहाला तर हजीर करूं. हजीर न करूं तर याचे नि॥ जाब करूं. हे जामीनकदबा लेहून दिधला सही.

गाही — नि॥ नांगर.

साबाजी माळी माहा-वळ मौजे म॥र. — वि॥ चिंतो नागेश जोसी कुळकर्णी मौजे मजकूर.

धोंडी माहार. मौजे म॥र.

---

श्री.

## लेखांक २८४.

१६९७ कार्तिक शुद्ध ११.

राजमान्य राजश्री राजो लक्षुमण यासी माधवराव नारायण प्रधान नमस्कार सु॥ सीत सबैन मया व अलफ राजश्री बाबूराव कासी याणी हुजूर विदित केलें कीं आप-ल्यास जामिन देऊन राजो लक्षुमण याणी कर्ज घेतलें त्याजवर आपण गुजराथ-प्रांतीं गाइकवाडाकडे चाकरीस गेलों तेथें मशार-निल्हे आपल्या नगरास यऊन चाक-रीस आले त्या वर्षी श्रीमंत कैलासवासी रावसाहेब भोगलेयावर स्वारीस गेले ते समयीं गाइकवाडांनीं फौज कुमकेस श्रीमं-

ताकडे पाठविली त्या बरावर आपण कारकून करून दिल्हा होता त्याणीं राजश्री गोपाळन॥ तांबवेकर याजपासून तलबेचा निकाल करून घेऊन न पुसतां घरास गेला त्याजवर राजो लक्ष्मण वगैरे आपणाजवळ तलबेचा पैका मागों लागले त्यास त्या कारकुनास घेऊन येणें त्याजपासून निकाल करून देवितों असें सांगितलें त्याजवर त्या कारकुनाकडे कोण कोणी गेले ते ते काये समजलें हें कळलें नाहीं त्या उपरांत तो कारकून वारला त्यास आपण कर्जाचा तगादा करितो त्यामुळें त्या तलबेचा लढा सांगून कर्जाचा निकाल करीत नाहीं त्यास ताकीद जाली पाहिजे म्हणून त्याजवरून हें पत्र तुम्हास सादर केलें असें तरी तुम्ही चाकरी केली त्याचा फडशा त्या कारकुनापासून करून घ्यावा तो न घेतला त्याचा कझ्या बाबूराव कासी याजकडे काय या उपरी याचें गुजरातीचें कर्ज तुम्ही घेतलें आहे तें दस्ताप्रमाणें व्याजसुद्धां निकाल करून देणें येविषयीं फिरोन बोभाट येऊं न देणें जाणिजे छ० ११ रमजान

आज्ञा प्रमाण. ( लेखनसिमा )

---

श्री.

## लेखांक २८५.

१६९७ कार्तिक वद्य ४.

श्रीमंत रा॥ तात्यासाहेब

दर्याव॥ मोकदम मौजे जिवडगे प॥ सेवगांव सु॥ सन ११८५ कारणें साहेबाचे सेवेस जामीन-कदबा लेहून दिधला ऐसाजे. बीजमानत बे॥ बाबाजी मल्हार व माणकोजी शामराज कुळकर्णी मौजे साकेगांव यास आपण जमान असूं. आजि सबब कीं साहेबाच्या स्वारापासून म॥रनिले गैरहजीर जाले. याजनिमित्तें साहेबाच्या स्वारांनीं जामीनतलब केली. त्याजवरून म॥रनिलेस आपण हजीरजमन असूं. गैरहजीर जाले तर हजीर करूं. हजीर न करूं तर म॥रनिलेचे नि॥ जाब करूं. एक दिवस गैरहजीर जाले तर कार्यास येणार नाहीं. हा जामीनकदबा लि॥ सही.

नि॥ नांगर.

बे॥ माहादाजी माणकेश्वर कुलकर्णी मौजे म॥र.

छ० १७ माहे रमजान.

---

श्री.

## लेखांक २८६

१६९७ कार्तिक वद्य ४.

श्रीमंत राजश्री तात्यासाहेब.

दर्या बे॥ मकाजी पा॥ आहेर मौजे चोतळी प्रा॥णें सेवगांव. सु॥ सन ११८५ कारणें जामीनकदबा लेहून दिल्हा-ऐसाजे. बिजमानत बे॥ भिमाजी डांगे चौगुले मौजे साकेगांव प्रा॥ म॥र यांस आपण हजीरजामीन आहों. तर म॥रनिले हजीर राहून फडच्या करितील. फडच्या न करितां गैरहजीर जाहाले तर हजीर करूं. हजीर न करूं तर म॥रनिलेचा जाब करूं. हे जामीनकदबा लेहून दिधला. सही.

गाही नि॥ नांगर

देवजी पा॥ मौजे

काळेगांव

बा॥ चिंतो नागेश जोसी मौजे चीतळी गोमा माहार बादल मौजे म॥र.

---

श्री.

## लेखांक २८७.

रा॥ चिंतो वि

करितां माणसें

एक माणूस त्यांनीं आपलेजवळ ठेवून घेतला ते सासवडानजीक आणि एक माणसासमागमें निरोप सांगोन पाठविले कीं माचीवाल्यांनीं बंगालेवाल्यास समजाविलें कीं हा मूल जो आहे हा वडील घरचा टिक्याचा खावंद आहे श्रीमंतास पेशवाईचा संबंध नाहीं. त्यावरून येथें आपठण आलियावर आपटणानें म्हटलें कीं मूल तरी लहान दौलत चालवावयास योग्य श्रीमंत दादासाहेब ते आहेत. थोर कृतकर्मे...हजर आहेत ते दौलत करितील. बारभाईंनीं उत्तर केले कीं त्यांनीं नारायणरायास चांगलें न पाहिलें ते या मुलास व आम्हांस चांगलें काय पहातील याची पाठ आम्हीं घेतली याणीं मुलूक घेऊन असावें राज्याची गोष्ट तो घडणार नाहीं— त्यांसीं गुजराथेचा मुलूख देतों तेथें त्यांनीं असावें. किल्ला देणार नाहीं. किल्ला दिल्यानें खूळ करितील. थोरले श्रीमंताचा व इंग्रजाचा पूर्वीपासोन स्नेह तो एकीकडे ठेवून इंग्रजांनीं साष्टी वगैरे किल्ले घेतले हे नीत कीं काय ! तेव्हां आपटणानें उत्तर केलें कीं साष्टी वगैरे घेतली ही गोष्ट आम्हीं चुकलों तुमची माघारी तुम्हांस देतों. त्यासंबंधें जो खर्च लागला असेल तो तुम्हीं द्यावा. बारभाईंनीं कबूल केलें कीं साष्टीचा खर्च माघारा देतों साष्टी द्यावी व चंद्रावरचें राज्य आमचें भोसल्याचें आहे तें सोडावें तेथील राजा कैदेस घातला आहे तो सोडावा. श्रीमंताचा पक्ष करूं नये. ते व आम्हीं समजोन घेऊं हा उत्तम पक्ष. मसलतसंबंधें जो खर्च मागतां तो ही देऊं वखारीस जागा पुण्यांत मागतां ती देऊं याप्रमाणें कबूल जाहलें. त्याविशयींचा मजकूर बोलावयाकरितां दोन इंग्रज मुंबईस पाठविले आहेत तेथेंच निश्चय ठरणें तो ठरेल. निदान गुजराथ खेरीज किल्ले देऊं याप्रमाणें ठरोन मुंबईस इंग्रज पाठविले आहेत. आपटणाचें म्हणणें मुंबईवाले चुकले असले तरी चाकरीवरून दूर करूं याप्रमाणें येथील मजकूर आहे. आपटणाच्या भेटी व माचीवाल्याच्या दोन वेळा जाहल्या. आपटणाकडे निरोपी माधवराव जाधवराई केले आहेत ते निरोप सांगतात त्याचे ऐकोन येतात याप्रमाणें जाहलें आहे. श्रीमंताचे मतें आम्हीं या कुटांत आहों परंतु आम्हांस येथें कोणी पुसत नाहीं ज्या कालीं अनीनिसि अनीन लागेल त्या कालीं जितके आमच्यानें घेवून ठेववितील तितके घेऊन ठेवूं. आतांच निघोन यावें तरी श्रीमंताचा पक्ष इंग्रज सोडीत नाहीं ऐसा तरी निश्चय कोठें आहे ? तथापि यावें तरी तूर्तच मुलालेकरांस प्रतिबंध होणार येथें राजश्री सखाराम बापूचे मनांत श्रीमंत नसावे ऐसें नाहीं परंतु पुण्यांत कामाचे नाहींत येथें असल्यानें आपणांस दगा करितील. बाहेर मुलूख घेऊन असावें परंतु हरएक प्रकारें सलूख करून बखेडा तोडावा ऐसें मानस आहे. भगवंतराव प्रतिनिधीची उभारणी बापूंनींच केली. नाना फडणीसाचें लक्ष भवानरायाकडे सर्वात्मने. त्याचे कुमकेस फौज पाठवावयास नानांनीं योजिली होती परंतु बापूनें मना केली. या उभयतांचें अंतर्याम शुद्ध नाहीं. बाहेरंग एक आहे. माचीवाल्याचें म्हणणें कीं याप्रमाणें सलूख होत असला तर उत्तम नाहीं तरी आम्हीं युद्धास सिद्ध आहों. मसलतीचा खर्च व साष्टीचा खर्च देऊं म्हणतों व वखारीस जागा वगैरे आमचीं कामें पूर्ण करून देणार त्यास कबूल आहे. परंतु तुम्हीं

श्रीमंतास हातीं द्या म्हणाल तरी आम्हीं देणार नाहीं. गुजराथचे पार करून देऊं मग तुम्हीं व ते समजोन घेणें. श्रीमंतांनीं गुजराथेवर ऐकलें तरी उत्तम जाहलें. न ऐकलें तरी याप्रमाणें तुम्हीं आम्हांस देणें म्हणजे आम्हीं मुंबईवाल्यांस सांगोन श्रीमंतास गुजराथेवर समजावितों. मुंबईवाल्याचे बोढून धरिलें तरी मुंबईवाल्यास चाकरीवरून दूर करूं. मुंबईवाल्यांनीं ऐकिलें आणि श्रीमंतांनीं न ऐकिलें तरी गुजराथ पार करून देऊं वडील घरचा मूल म्हणतां तरी तीन पिढ्या नाना माधवराव व हा मूल तीन पिढ्या दौलत केली हे बाजीराव याचे पुत्र असतां मुलास दौलत द्यावी हें ठीक नाहीं दादासाहेब च योग्य आहेत.

---

श्री.

## लेखांक २८८.

१६९७.

श्रीमंत राजश्री तात्या साहेब

दर्या ब॥ भिकाजी डांगे चौगुले मौजे सांकेगांव प्र॥ सेवगांव सु॥ सन ११८५ कारणें जामीनकतबा लेहून दिधला ऐसा जे बिजमानत ब॥

नावजी डागे मौजे म॥र यांस आपण हजीर जामीन असो. आजी सबब कीं म॥रनिलेकडे सरकारची बाकी आहे. गैरहजीर राहून फडश्या करतील. फडच्या न कारितां गैरहजीर जाहले तर हजीर करून-हजीर न जाले तर म॥रनिलेच्या नि॥ जाब करून

नि॥ नागर

मकाजी पा॥ आहवे मौजे चितळी. | हा॥ चिंतो नागेश

देवाजी पा॥ मौजे काळेगांव. | जोशी कुळकर्णी मौजे मजकूर.



श्री.

## लेखांक २८९.

राजश्री जीवनाजी कोठवळे मु॥ सेहर ब्ऱ्हाणपूर यासि प्रति केशो गंगादास व जैराजबाई मु॥ मा॥र रामराम विनंती उपरी. रे॥ मोतीलाल देसावल यांकडे सरकारचीं ताकीदपत्रें श्रीमंताचीं हजीर. त्यास मोतीलालाकडील रुपया जो येईल त्याची चवथाई पुण्याची श्रीमंताची व सेहर ब्ऱ्हाणपूर सुभेदाराची चवथाई रु॥ येकूण रु॥ निमे सिवाय हजारीं तुम्हांस खाजगत रु १०० संभर देऊं. याप्रमाणें देऊं. यासी अनउत्तर न करूं. हें लिहून दिल्हें सही. बि॥ मकूदराज धनी दोघे हजूर लिहिलें सही.

---

श्री.

## लेखांक २९०.

१६९८।९९.

यादि हिशेब गैरमजरा मौजे साकेगांव प्रे॥ सेवगांव सु॥ सन ११७७ इ॥ आवलसाल ता॥ अखेर जमा. रु॥.

१०६४ बाबती सरदेशमुखीपैकीं.

२०० मुरडपट्टी श्रीमंत र॥ सखारामपंत बापू यांचे गांवाबाबद.

४९॥ कारकुनी बाबती सरदेशमुखी तिसाला तीस-गांवकरपैकीं.

१३॥ बेलदार चावडी गांवामधें.

२५ रामराय भैराल जंत्रीवाले करमलकर.

३२ बईल तोफखाना श्रीमंत रे॥ पंत प्रधान.

३०॥ राघोपंत व भ

११६॥ बाकी कच्चे जमेपैकीं.

९ बाजार बाबा.

१४० मोकासी सन ११७५ साल बा॥.

९६॥। गांवखर्च उचापत वगैरे.

---

१७७६॥।

५० कारकुनी घेतली रोखा रामचंद्र कासी पुणियांत.

---

१८२६॥।

---

श्रीपांडुरंग.

## लेखांक २९१.

चैत्र शुद्ध ७ शके १६९९.

राजश्री माहादजीबाबा सिंदे गोसावी यांसि

छ० सकल–गुणा–लंकरण–अखंडित–लक्ष्मी–अलंकृत–राजमान्य श्रे॥ त्र्यंबकराव महादेव आशिर्वाद विनंती येथील कुशल जाणोन स्वकिय लिहित जावें विशेष आपणाकडे आमचा कर्जाचा ऐवज येणें त्या पै॥ आपणा कडून देविले रुपये

२१००० रदकर्ज देणें चिंतो विठ्ठल

३०००० देणे सदाशिव केशव बा॥.

---

६१०००

एकसष्ठ हजार रु॥ पावते करुन कबज घ्यावें तेणें–प्रें॥ कर्जाचे ऐवजीं मजुरा पडतील छ ५ रबिलावल बहुत काय लिहिणें चैत्र शुध्ध ७ हेमलंबी संवत्छरे कृपा लोभ किजे हे विनंति.

---

श्री.

## लेखांक २९२.

१६९९ ज्येष्ठ शुद्ध १०.

राजश्री बाबूराव रामचंद्र का॥दार मौजे साकारे पे॥ माणिकपुंज गो॥ यासी

सु॥ समान सबैन मया व अलफ. तुम्हाकडे रसदेचा ऐवज येणें तो बा॥ देणें दिंमत चिंतो विठ्ठल याजकडून सिलेदारास आठवड्या पै॥ रुपये

१५०० साल मजकूरचें येणें ते

१५०० पेस्तर सालचे रसदेचे रुपये

---

३०००

एकूण तीन हजार रुपये देविले आहेत तरी पावते करून कबज घेणें. जाणिजे छ ८ जमादिलावल.

बार.

---

श्री.

## लेखांक २९३.

१६९९ ज्येष्ठ शुद्ध १५.

राजेश्री सिवराम रघुनाथ स्वामी गोसावी यांसिः—

विनंती उपरी. रत्ना फरास दिमत फरासखान याची जागा पेठ बुधवार शहर पुणें येथें रुंद हात १५ पंधरा व लांब हात ३० तीस याप्रे॥ होती. ती सरकारांत घेऊन माहादाजी बल्लाळ कारकून सिलेदार यास दिल्ही. याचे मुबदला छद्र फरास याची जागा लांब हात तीस व रुंद हात २४ चोवीस इमल्यासुधां गणेश पेठेंत सरकारांत जप्तीस आहे व गुमान गारदी याची जागा कुली रुंद हात १५ छद्र फरास याचे जागेचे पुढें आहे ती देखील फरासखा॥स यास देविली असे. तरी देणें.

जाणिजे छ १३ जमादिलावल सु॥ समान सबैन मया अलफ. बहुत काय लिहिणें ? हे विनंती.

---

श्री.

## लेखांक २९४.

१६९९ आश्विन शुद्ध ७.

राजश्रियाविराजित–राजमान्य—राजश्री विसाजी केशव स्वामी गोसावीयांसी

पे॥ माधवराव नारायण प्रधान नमस्कार विनंती उपरी येथील कुशल जाणोन स्वकीय लिहिणें विशेष सरसुभा प्रां। कोकण येथील फडणिसी र॥ गोविंद विठ्ठल यांजकडे होती ते दूर करून र॥ बलवंतराव माहादेव कोलटकर यांजकडे सांगितली होती ते हालीं दूर करून पेशजी प्रमाणें गोविंद विठ्ठल यास सांगोन वेतन पेशजी प्रमाणें

सालीना. रुपये

५०० खुद्द

१००० पालखी

१६५ पागे अ॥ ३ एकून

२२॥ तेल दिवटीस दरमहा ॰॰७॥ प्रमाणें.

सालीना वजनपक्के ॰८। दर ॰॰४ प्रमाणें.

---

१६८७॥

येकूण सोळासे साडेसत्यासी रुपये सालीना मोईन करार केली असे तरी मशार–निल्हे यांजपासुन फडणीसीचे काम काज घेऊन वेतन सालीना सरकारांतून सोळाशे साडेसत्यासी रुपये पावित जाणें जाणिजे छ ५ रमजान सु॥ समान सबैन मया व अलफ बहुत काय लिहिणें हे विनंती.

---

श्री.

## लेखांक २९५.

१६९९.

यादि चिंतो विठ्ठल यास सालमजकुरापासून जातीस तैनात देखील पालखी व शागीर्द पेशा वगैरे कुल पडलें पान सुध्धां सालिना सु॥ समान सबैन मया व अलफ

रुपये

३००००

यासी ऐवज मा॥रनिलेकडे गांव व जमीन व वतन व असाम्या चालतात त्याचे रु॥ व हाली लाऊन द्यावयाचे मिळोन. रु॥

११८७८। चालत आहे त्याची बेरीज रु॥

२३९८। गांवचा आकार व जमीन रु॥

१६२३। सरकारांतून ईनामगांव रु॥

१३१०॥। मौजे अहीरे ता॥ कर्यातमावळ दरोबस्त

३१२॥ मौजे रिहे ता॥ पोनमावळ येथलि मुकासा.

---

१६२३।

६०० मौजे आंबेसल ता॥ जुलवणी पे॥ मकडाई हा गांव भरतसिंग राजे यांनीं आपले तर्फेनें दिल्हा आहे त्याचा आकार सर- [illegible] रु हिसेबी

१७५ जमीनीचा आकार रु॥
  ८५ मौजे हिंगणी ता॥ कर्यातमावळ बागेस जमीन बिघे अजमासें
  ८१५
  ६० मौजे चांदसी पे॥ दिंडोरी पे॥ इनामजमीन चावर ·।· आकार सालावाद हिसेबीं खर्च पडतो त्याप्रमाणें
  ४० मौजे सुंदरवाडी प॥ अशेर पे॥ जमीनी व॥

---

१७५

२३०॥~ मौजे कासार आंबोली ता॥ मुठें खोरें येथील जिल्हे बाबा वगैरे पंतसचीव यांचे तर्फेनें आहे त्याचा आकार मा॥रनिलेचे वडिलास पंत मा॥रनिले यांनीं आश्रितपणा संमंधे धर्मादाव वर्षासन गांवगन्ना व जमीन त्याचा ऐवज यथास्थित न पावे याजकरितां त्या ऐवजीं मौजे मजकूरचा सदरहू अंमल सचीवांनीं दिल्हा आहे म्हणतात.

---

२७४८॥~

पे॥ वजा कासार आंबोली येथील जिल्हे बाबा वगैरे आकार सन अर्बा सबैनांत मा॥रनिलेस सालिना दाहा हजार पावावे असा करार जाहाला त्या बेरजेंत धरिले आहेत त्यास मा॥रनिलेचे वडिलास सचीवांनीं गांव दिल्हा तो हालीं तैनातेसिवाय चालवावा ऐसें केले सबब वजा रु॥
  ३३०॥~

बाकी २३९८

७८०० कानगोईचे वतन माहालनिहाय प्रांत खानदेश मा॥रनिलेचे तक्षीमेचा आकार अजमासे हे॥
  ११०००
  पे॥ वजा सिबंदी व कारकून रु॥
  ३२००
  बाकी रु॥

१६८० असाम्याचीं वेतनें रु॥
  ४०० शहर बऱ्हाणपूर येथील असामी केसो विठल यांचें नांवें.
  २५० ता॥ कर्यातमावळ येथील फडणिसी जनार्दन गोविंद यांचें नांवें.
  ३०० पे॥ सिंनर येथील फडणिसी अंताजी यशवंत यांचें नांवें.
  २५० प॥ वणी-दिंडोरी येथील फडणिसी आबाजी अनंत नि॥ मा॥रनिले याजकडे.
  ३०० शहर बऱ्हाणपूर येथील बाग माहालचे तहसीलदारीची असामी.

१८० रामचंद्र आईतोळे याचे पागेची फडणिसी भिकाजी मोरेश्वर नि॥ मारानिले याचें नांवें रोजमरा दुमाही सो ३० तीसप्रमाणें साहा रोजमऱ्याचा आकार.

---

१६८०

---

११८७८।
१८१२१॥ नेमून द्यावयाची बेरीज.

---

श्री.

## लेखांक २९६.

१७०० फाल्गुन वद्य १०.

यादा चिंतो विठ्ठल सु॥ समान सबैन मया व अलफ. तैनात सालिना रु. ३०००० पै॥ नाडगौडेपणाचे वतनाचे ऐवजीं वजा रु. ७८०० बाकी तैनात सालिना करार २२२०० रुपये.

यास ऐवज मा॥रनिलेकडे इनाम गांव व जमिनी व असाम्या चालतात. व सालम॥रापासून लाऊन द्यावया . मिळोन.

रुपये

५९४५॥। चालत आहे.
२३९८। गांव इनाम वगैरे व जमिनी मिळोन आकार दप्तर रुजू बेरीज — रु.
३५४७॥ असाम्या
१६८० कि॥ त॥ अलाहिदा याद.
१८६७॥ कि॥ सालम॥रापासून
१६८७॥ सरसुभा कोंकण येथील फडनिशी.
१८० रामचंद्र येतोळे याचे पागेची फडणिशी.

---

१८६७॥

---

३५४७॥

---

५९४५॥।
१६२५४। सालम॥रीं लाऊन द्यावयाचा करार
६००० हतलाख ऐवज अखेर साला आंत पावावा —— रुपये
१०२५४। गांव लाऊन द्यावयाचे

---

१६२५४।

---

२२२००

येकूण बावीस हजार दोनसे तैनात सालिना सदहूप्रमाणें असाम्या सात लिहिल्या आहेत. त्या पै॥ पेशजीपासून चालत होत्या त्या प्रें॥ चालवाव्या. न चालत त्याचा ऐवज वेतनांत बाकीस उतरून हुजरून पावेल येणे प्रें॥

सन अर्बा पासून छ २३ सफर सन राहिले वेतन द्यावे व तिसा सबैन फालत्या पै॥ दोन साले गुन मास.
वजा करून बाकी वेतन घ्यावे रुपये
१ एक साल सरकारांतून घ्यावें.
१ एक साल पै॥ ऐवज मुच्छदगिरीनें मेळवून घ्यावा.

---

२

होत नाहीं.

असल यादी दप्तरीं आहे त्याची नकल हे असे.

---

श्री.

## लेखांक २९७.

१७०१ ज्येष्ठ शुद्ध १५.

अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य राजश्री धोंडो महादेव गोसावी यांसिः—

सेवक माधवराव नारायण प्रधान नमस्कार सु॥ तिस्सा सबैन मया व अलफ. आनाजी माहादेव याची मुलें मनुष्यें त्रिंबकास आहेत त्यांस उंटें व घोडीं व तट्टें माणसें देऊन पुणियास राजश्री चिंतो विठ्ठल यांजकडे पोंहचावून देणें. जाणिजे छ १२ जमादिलोवल आज्ञा प्रमाण.

लेखन सिमा

---

श्री.

## लेखांक २९८.

१७०१ ज्येष्ट वद्य १३.

॥ श्री ॥
कऱ्हाडे भास्कर
चरणीं तत्पर
नारो कृष्ण
निरंतर

छ. मा॥ अनाम देशमुख व देशपांडे सरकार विजयागड यांसी नारायण सुभेदार प्रांत खानदेश सु॥ समानीन मया व अलफ सरकार-मजकूर येथील कानगोईचें वतन राजश्री चिंतो विठ्ठल यांचें आहे. त्याची जप्ती सरकारांतून पेशजी झाली होती ती हाली मोकळी करून हें पत्र तुम्हांस सादर केलें असें तरी तुम्ही कानगोईची जप्ती उठवणें म्हणोन छ ४ रबिलावल-तिसा-सबैनची सनद सुभास सादर झाला त्यावरून हें पत्र तुम्हांस सादर केलें असें तरी सरकार-मजकूर येथील कानगोईचे वतनाचा भोगवटा चालत आल्याप्रें॥ मशार-निलेकडे चालवणें जाणिजे छ २६ जमादिलावल मोर्तब सुद.

श्री
मोर्तब
सुद

बार.

---

श्री.

## लेखांक २९९.

१७०१ मार्गशीर्ष.

हिशेब भगवंतराव अनंत जवारकर

५० मुदल शक १६९७
  २५ भाद्रपद शुद्ध ५
  २५ आश्विन वद्य १२

---

५०
  सरासरी मिती आश्विन शुद्ध १
६ व्याज ता॥ भाद्रपद वद्य ३०
  रोख
  माहे १२ दरसदे ६००

---

५६
६॥। व्याज ता॥ शक ९९ भाद्रपद
  वद्य ३० माहे १२

---

६२॥।
७॥ व्याज ता॥ शके १७०० भाद्रपद
  वद्य ३० माहे १२

---

७०॥

९॥ व्याज त॥ शके १७०१ कार्तिक वद्य ५ माहे १३॥

——

८०

श्री.

## लेखांक ३००.

नकल

१७०२ आश्विन वद्य ५.

चिरंजीव राजश्री त्रिंबकराव यांसि चिंतो विठ्ठल आशिर्वाद उपरी आम्हीं खुशरजावंदीनें खरिदी केली त्यपैकीं तुम्हांस वतनें वगैरे दिल्हीं बितपसील.

१ कानगोचें वतन प्रां खानदेश सरकार पैकीं निमे खंडो गंभीरराव निमे आम्हीं तो आम्हीं आपले निमे तुम्हांस दिल्हें इनामे वगैरे सुध्धा

२ मौजे रेहें व मौजे लालवावली येथील भट कुळकर्ण पोनमावळची

२ पुण्यांतील वाडे वोंकारेश्वराजवळचे व बाग

——

५

एकूण पांच पैकीं एक कानगोचें वतन व दोन कुळकर्णें ज्योतिषवृत्ती दोन गावची व दोन वाडे तुम्हांस दिल्हे आहेत सुखरूप अनभवणें यास कोण्हासी संमध नाहीं कोण्ही भाऊबंद दिक्कत कदाश्चित् काल देश जाणून करतील त्यास आमची शफत असे तुम्हीं सरकार–लक्षानें वर्तणूक करून सुखरूप वंशपरंपरेनें अनभवणें मिती आश्विन वद्य ५ शके ७०२ शार्वरी संवत्छरे हें आशिर्वाद सरहू वतनास व घरास कोण्हा भावबंदास समंध नाहीं कोण्हाचा लढा यांत नाहीं हे आशिर्वाद.

श्री.

## लेखांक ३०१.

१७०५ ज्येष्ट वद्य.

चिरंजीव राजश्री त्रिंबकराव यासिः—

पार्वतीबाईचा आसीर्वाद उपरी. तुम्हाकडून पत्र येऊन वर्तमान कळत नाहीं तर असें नसावें येणारावरोबर पत्र पाठवीत जावें. सखाबाईस यावयावसी लिहिलें त्यास तेथें आल्यावर पारसनिसाचे वाड्यांत जावें लागतें त्यास तेथें जावयाची सोय नाहीं त्यास पुढें सोय पाहून यावयास येईल यास्तव यावयाची अडचण पडती. तुमच्या कामाकाजाविसी देवास विचारिलें त्याविसी गोप्रदान देवयाचें करार जालें त्यास रु॥ पाठवून देणें म्हणजे गाय घेऊन पाठवून देऊं. आम्हीं येथून पाठवित होतों परंतु ती आमची गाय घेत नाहीं तर आणीखी भवास विचारून काय लागेल ते रु॥ पाठवून देणें जमना इनें डबे करावयास दिल्हेत आरघ्या जाहला असेल पा॥ देणें. त्याची मेहनत काय होईल ती लेहून पाठवणें म्हणजे पाठवून देऊं कळावें हे आशीर्वाद.

श्री.

## लेखांक ३०२.

१७०५ ज्येष्ट वद्य १४.

विद्यार्थी सदाशिव भगवंत सां दंडवत विनंति त॥ जेष्ठ व॥ १४ रविवार पावेतों मु॥ सातारा येथें असों विशेष येथील वर्तमान पेशजी लिहिलेंच होतें त्याचें उत्तर आलें नाहीं तेथून ग्रहस्त आले त्याणीं मात्र पत्रांतील भाव खुणेचे सांगितल्यावरून कळले येथील वर्तमान तरी [illegible] काल होतां च दुसरे [illegible]

जाल्या त्याजवर राजश्री त्रिंबकराव आलि-यावर विचार होऊन मातुश्री सखाबाई यांस पुण्यास न्यावी हा आग्रह पडोन सखा-बाईनीं एक उपोषण केलें ते वेळे धोंडो गणेश व नारो भगवंत याणीं फडनिसाचे कानावर घालोन इत्यर्थ ठराविला कीं, श्रीमंत तात्या याणीं हळोंच हातीं धरून खोलींत घालावी ही ही बातमी कळलिया-वर तो विचार राहिला फडनिसांचा आग्रह वस्त्रें देण्याचा आहेच परंतु बाबूराव याणीं तें काम परवानगीचा उजूर करून उभयतांनीं हि पत्रें पाठविलीं आहेत तें परवानगी आठ दिवसांत आणून देणार राजश्री परशराम-पंतभाऊ यांस लिहिलें आहे लोणीस यांचे व्याही चिंतोपंत लिमये आहेत त्यांस पत्रें पाठविलीं आहेत तें भाऊंजवळ रदबदली करून पत्र घेणार याजकरितां आपण त्वरा करून त्यांचें कानावर घालावें कीं वाटणी होऊन फारीखत जाली असतां वळेंच घरांत शिरोन त्यांचे स्त्रीस अटक केली आहे याजकरितां दहाहजार रुपये नजर घेऊन सरकारांतून दत्तपुत्र घ्यावयाची पर-वानगी देऊन पदार्चीं वस्त्रें यावीं ह्याजप्रमाणें बोलोन वस्त्रास अडथळा पडे तें केलें पाहिजे आम्हीं घरास जाण्यास निरोप मागत होतों त्यास फडनिसाकडून अडथळा करून राहविलें आतां पळोन यावें या विचारांत आहों यावयास च्यारदिवस अधि-कउणें लागतील याजकरितां पत्र पावतांच वस्त्रास अडथळा पडे तें करावें न्दिरावर जामिनीची चिठी आपणास दिली याज-मुळें फडनिसास फारच विषाद आला आहे भेटीनंतर सविस्तर कळेल तात्यांचें पत्र आपल्यास शिवाजीचरावर आहे तें दस्ताऐवजीच आहे जिजीबाई एत असतां येऊं दिली नाहींत ऐसें आहे तें दाखऊन वस्त्रास अडथळा पडे तें करावें आम्ही हल्ली कारागृहातच आहों पुढें त्रिंबकरायास बा-ह्यात्कारें करावें पत्र मागील व हे वाचून फाडून टाकावें सविस्तर राजश्री गणपतराव वैद्य सांगतां कळेल त्यांस विचारावें हे विनंति.

---

श्री.

## लेखांक ३०२.

१७०५ आश्विन शुद्ध १५.

श्रीमंत राजश्री जेयरामपंत दादा स्वामीचे सेवेसीः—

आज्ञांकित येसाजी सिताराम मु॥ ना-सीक साष्टांग नमस्कार विज्ञापना. ता॥ छ २० जिलकादपर्यंत वर्तमान येथास्थित असे. यानंतरी चिंतोपंताचे वाडियांतील वस्तवाणी मोजदाद करोन व गावांत मठ-कर व केसो ठाकर व माई ब्राह्मणीन यांचें घरीं ठेविलें त्यापे॥ भिकाजी मोरेश्वर यांनीं नेलें काय बाकी राहिले त्याची चवकशी करून लेहून पे॥. उत्तर येईल त्याप्रे॥ वर्त-णूक कर्णे म्हणून आज्ञा त्यावरोन

चिंतोपंताचे वाडियांतील मोजदाद केली त्याची याद तपसीलवार व बस्ता येक वेगळा च होता. त्यांत पांगुर्णे लुगडें व पोशाक वस्तवाणी सोन्याचे दागिने व रुप्याचे व मोत्यें कंठा येक रुजु यादि [illegible] पाठविल्या वस्तवाणी भांडीं वगैरे यादिनीं चिंतोपंताचे च वाडियांत कोठडींत [illegible] आज्ञेप्रो त्याचे च जिमेस लाविलें. आज्ञा येईल त्याप्रो॥ वर्तणूक करूं.

[illegible]

धोंडाजी नाग [illegible] यांनें घरीं चिं-पंताची वस्तवाणी ठेवली [illegible]

पन्नास आहेत. रेघे मजकूर याचे घरींहून कागदपत्र वस्तवाणीची चवकशी करून मुचलका घेऊन च्यार तट्टे भाडियानें करोन पांच गार्दी व नाइकास पुण्यास रवाना करावे म्हणोन आज्ञा त्यास रेघे मजकूर यास आपले पत्राचे पूर्वीं पुण्याहून मुजरत जासूद च आला होता. आम्हास हि पूर्वीं स्वामींनीं पत्र लिा होतें कीं धोंडाजी नो॰ रेघे याजकडे चिंतोपंताचे मुदे पुसावयाचे आहेत तर नाईक मार यास पा देणें. आम्ही नित्य नाईकास तगादा करीत च होतो. नाईकाचा करार कीं विजयादशमी जाल्यानंतरी जावें पुण्याहून जासूद येथें तिसरे दिवशीं आला हें वर्तमान नाईकास कळल्य तरी आमचा निरोप घेऊन च्यार पांच दिवस गावांत च लपोन राहिले तेव्हां स्वामीचीं पत्रें येथें आलीं हें वर्तमान कळतां च नाईक पुण्यास आले मागें चिरंजीवास पळविले मुलें माणसें झाडोन वाडियातोन गेलीं. घरास कुलपें लाविलीं. आम्ही घरीं चवकी बसविली नाईकाचा भाऊ त्या च वाड्यांत विभक्त आहे. त्यास तगादा केला आहे. धोंडाबा नाइकाकडे वस्तवाणी व कागदपत्र खरे आहेत. बाबू गणेश याचे रुमालांत यादी निघाल्या त्या सेवेसी पाठविल्या आहेत. वतनी कागद आहेत त्यापो भिकाजी मोरेश्वर यांनीं धोंडाबा नाईकास पत्र लेहून मखमलाबादचे इनामाबद्दल महजर व सरकारचे पत्रे व महजर मिळोन ११ आकरा नाईकांनीं बाबू गणेश याजला देऊन पावती घेतली. वरकड वस्तवाणी कागदपत्र वस्तवाणीचे बस्त्यांत रेघेमजकूर यानें ठेविले त्यास तीन वार जाले थोडके दिवसाचा कारभार आहे. स्वामींनीं बाबू कोटवाले यास समक्ष पुसावें. रेघे याचे घरीं चवकी तसी च असो द्यावी किंवा उठवावी ! आज्ञा येईल प्रो वर्तणूक करूं.

कलम १.

गंगाधर मोरेश्वर यास तगादा करोन वरातिप्रे। ऐवज घेऊन फडच्यास पुण्यास पे॥ म्हणोन आज्ञा त्यास मारनिले धोंडोपंत का॥दार याजकडे चाकर आहेत. आम्ही आपले आज्ञेवरोन तगादा केला सुभेदारांनीं आठा दिवसाचा करार केला कीं आम्ही पत्रें पुण्यास स्वामीस लिा. हे रुपये व येस ठाकर याजबदल रुपये लखाकडे आहेत. तेथें लखानें तोड पाडिली तरी उत्तम. नाहीं- तरी आमचें पत्राचें उत्तर आलें म्हणजे गंगाधरपंतानें रुपये द्यावे असें जाल्यास तोड पाडूं. तरी स्वामींनीं सुभेदाराचें पत्राचें उत्तर पाठवून द्यावें. त्याप्रे॥ कर्तव्य करूं.

कलम १.

येस ठाकराकडे वरातीबद्दल फडशा करोन व्याजाचे फडशास पे॥ म्हणोन आज्ञा त्यास लखा जेव्हां आम्ही पुण्यास पाठविला ते येस ठाकर त्यानें आपले जिमेस करोन घेतला तो अद्याप घरास आला नाहीं. आपले पत्रावरोन येस ठाकर याचे चिरंजिवास तगादा आठ रोज रात्रं दिवस आणोन बसविला परंतु येक पैस्याचे दर्शन न जाले. पराकाष्टा जे करावयाची ती केली तेव्हां त्या मुलाजवळ जामीन घेऊन त्या मुलानें लखाकडे आपला चुलता शामजी ठाकर लखाकडे पा॥ आहे कीं तेथें लखानें रुपयाची तोड पाडिली तरी उत्तम नाहीं- तरी स्वामींनीं पत्र आपले धोंडोपंतास द्यावे ठाकराकडोन सरकारचा ऐवज यावयाचा आहे त्यास ठाकराची कुळें वाजबी असतील तीं कारकून वसूल करील त्यास दिमतन करावी. येथें कुळें हिमायती फार. ठाकरापासी कुळासिवाय एक कपर्दिक हि

निघ्यावयाचा नाहीं घरें मात्र आहेत. नित्य माध्यानीचें संकट जाणोन स्वामीस विनंती लि॥. मान्य करणार स्वामी समर्थ.

कलम १.

केसो ठाकर याजकडे वजनी जिन्नस होता किती व भिकाजी मोरेश्वर यांनीं नेला किती. बाकी जिनस वगैरे राहिल तो (त)पसील लि॥ म्हणोन आज्ञा त्याप्रे॥ चवकसी करोन केसो ठाकर वाणी याचे घरीं जिनस बाकी राहिला. व भिकाजी मोरेश्वर यांनीं नेला त्याची याद येकंदर पाठविली. जिनस त्याचे घरीं तसा च राहूं द्यावा किंवा चिंतोपंताचे वाडियांत नेऊन ठेवावा किंवा पुण्यास रवाना करावा ! नाहींतरी वाणी याचे च जिमेस करोन येवज निरखाप्रे॥ घ्यावा याची आज्ञा येईल त्याप्रे॥ वर्तणूक करूं. कलम १.

बापूभट मठकर

याजकडे भांडीं होतीं ते भिकाजी मोरेश्वर यांनीं नेलीं त्याची याद मा॥रनिलेचे घरीं आहे यादीची नकल घेऊन पाठवावी. भटजीस पुरसीस करावी त्यास भटजी तर मृत्य पावले त्याचे बंधु आहेत ते सप्तश्रृंगास अनुष्टानास गेले. घरीं बायिका व बापूभटजीचा चिरंजीव लहाण आहे तो कांहीं माहीत नाहीं. त्या मुलापासी जामीन घेऊन बापू भटाचा बंधु आणविला. तो आला म्हणजे आज्ञेप्रे॥ पुरसीस करितो. भटजीचे घरीं भांडीं ठेवलीं त्याची याद बापू गणेश कोटवाले यास विचारलें त्यांनीं उत्तर केलें. भांडीं आणिलीं परंतु याद नाहीं. येकंदर याद मात्र बापूचे रुमालांत होती ती सेवेसी पाठविली असे.

कलम १.

माई ब्राह्मणीन इचे घरीं पोथ्या वस्तवाणी भिकाजी मोरेश्वर यांनीं ठेविली ते आणिली बाकी कांहीं राहिली असेल त्याची चवकशी करोन लेहून पे॥ म्हणोन आज्ञा त्यास ब्राह्मणीनीचें घरीं बाळबद पोथ्या गाठोडें दोन होतीं तीं बापू गणेश यांनीं नेलीं पावती घेतली आणिखी चीजवस्त कांहीं माईचे घरीं नाहीं. कदबा लेहून घेतला कीं चिंतोपंताचा याखेरीज मुतलीचा तोडा आंगीं लागल्यास हजार रु॥ गुन्हेगारी देऊं म्हणोन लेहून घेतलें.

कलम १.

खंडोपंत देशपांडे यास व्याजाचे फड. च्यास पो॥ म्हणोन आज्ञा त्यास धाडीचा उपद्रव वृध जाला. चिरंजीव येक होता तो मृत्य पावला देशपांडे यास घोड्यावर बसावयास शक्त नाहीं श्रीमंत हरिपंत तात्यांनीं आज्ञा केली होती कीं खंडोपंतास व्याजाचा तगादा न करावा. त्याचे आज्ञेवरोन दोन महिने त्यास आम्ही तगादा केला नाहीं आपली आज्ञा प्र॥ परंतु त्यास आराम जालयावर पाठवून देतों. खताची मिती पाहोन हिसेब लेहून पाठविला तरी येथें फडच्या करोन घेऊं. तेथें च पाठवावें असी आज्ञा जालयास डोली भाड्यानें करोन आराम झालयावर पाठवून देतों. राजश्री धोंडोपंत सुभेदार यांनीं आम्हास सांगितले आणखी येक वेळ स्वामीस पत्र लिहून हिसेबाची याद आणिल्यास उत्तम. नाहींतरी जाईन. स्वामीस विनंती लिहिणें हें च कीं देशपांडे वृध फार तरी खताची मितीप्रे॥ याद लेहून पा॥. खत पे॥ म्हणजे फडच्या करोन घेतों. कलम १.

राणोजी देशमुख पिंपळजकर याजकडे येके चाळीस व रातीप्र॥ येवज घेतला. राणोजी पळोन गेला. त्याणे कागदोंमीं रुपये दिले. त्याजाची [illegible] नाहीं तरी स्वामींनी येणा व त्याजाना [illegible]

श्री.

## लेखांक ३०५.

नकल.

सिका.

ज्येष्ठ शु० ८ शके १७०८.

कवालेपत्र कोतवाली शहर पुणे विद्यमान घाशिराम सावलदास ता॥ ताराचंद व॥ धरमचंद जोहोरी व हरीकचंद व॥ हिराचंद वखारी व पाणाचंद व॥ भुकण व मूळचंद व॥ रायचंद जोहोरी व आसाराम व॥ भुदरजी शेट व॥ कसबे शहर-मजकूर सु॥ सीत समानीन मया व अलफ सन हजार ११९५ शके १७०८ पराभव नाम संवछरे दिल्हे कवालेपत्र ऐसे जे माणिकविजे जती गुरू हरकाविजे गछविजे अनसूर व॥ पेंठ वेताल याची जागा पेंठ-मजकूरीं घर कवलार एक मजला खण सुमार २ होते. ती देवालय पारसनाथाचें बांधावयास आगवड्या पिछवड्या सुध्धां इमल्यासमेत तुम्हांस विकत दिल्ही. त्याची किमत रुपये १५० दिडसे तुम्हांपासून घेऊन जागा स्वसंतोषें देऊन खरेदी पत्र करून दिल्हें. तें तुम्हीं चैत्रा आणून दाखवि[illegible]. त्याजवरून चैत्रांहून गणेश रंगनाथ कारकून व रुण्णाजी विन सुभानजी गवड्या चाकर नि॥ सरकार यास पाठवून जागयाची मोजणी वगैरे चौकसी करून कलमें करार करून दिल्हीं नि॥ वि॥

लांबी पुर्व पाश्चिम आगवड्यास पाश्चिमेस गल्लीचे हादेस भिंतीचे आसार सुध्धां पिछवड्यास पुर्वेस गल्लीचे हादेस घराचे भिंतीचे आसार सुधा गज १९॥ सुमार. याची चतुःसीमाः सेजार १ पुर्वेस मधी गल्ली, उत्तरेकडील सेजारी दामोदर कोठारी वगैरे याचे घरापासून दक्षिणेस रस्त्याकडे जात असे. रुंद पुर्व पाश्चिम गज सुमार २॥ अडीच पलीकडे बाळा वल्लद जयराम कुंभार याचे घर कवलार.

१ पाश्चिमेस मधीं गल्ली दक्षिण-उत्तर जात असे. रुंद पुर्व पाश्चिम गज ४॥ साडेच्यार. पलीकडे रुण्णाजी बहिरव थत्ते यांचे घर कवलार.

१ दक्षिणेस सुकलाल परदेसी रजपूत याचे घर कवलार.

१ उत्तरेस इछी गुजराथीण व दामोदर कोठारी व केशवजी व बनेश्वर ब्राह्मण गुजराथी याचें घर कवलारी.

—

४

रुंदी दक्षिण उत्तर गज सुमार ६८)॥ ऐन गर्भी गज

।)॥ चांदई दक्षिणेकडील ऐन रुंद गज ।॥३॥ पैकीं निम्मे सुकलाल परदेसी रजपूत याची गज सुमार ।)॥ बाकी तुमचे घरा-खालीं

॥ चांदई उत्तरेकडील खुद्द तुमचे जागा खालीं गज

——

६॥३।

घरास शेतखाना जागा नाहीं सा॥ दूसल बाद कलम १

घराचे पाणी मोरी बांधोन सिरस्ते-प्रो॥ रस्त्याचे मोरीस मेळावावें. कलम १.

पिछवड्यास पुर्वेस घराचे भिंतीस दर्वाजा गल्लींतून वागावयास पुर्वमुख असे. कलम १.

घराचा आगवडा पाश्चिमाभिमुख असे. कलम १.

एकूण लांबी साडे एकुणीस गज व रुंदी पावणेसात गज सवातिन [illegible] व कलमें

सौत येणेंप्रमाणें जागा तुम्हाकडे करार करून देऊन किंमतीच्या रुपयांवर सरकार सिरस्ता दरसद्दे रुपये १० प्रमाणें रुपये १५ पंधरा तुम्हांपासून घेऊन कबालेपत्र तुह्मांस भोगवटियास करून दिल्हे असे. तर सदर्हू जाग्यांत देवाल-याची इमारत बांधोन र्तीची स्थापना करून तुम्हीं व तुमचे पुत्र-त्रादी वंशपरंपरेनें पारसनाथाचा उत्छाव रीत जाणें. जाणिजे. छ ७ साबान. र्तब सुद. मोर्तब.

बार रुजू

---

श्रीशंकर.

## लेखांक २०६.

१७०८ कार्तिक वद्य १०.

खरीदीखत शके १७०८ पराभव नाम संवत्सरे माहे कार्तीक व॥ १० दशमी ते दिवसीं राजश्री विठ्ठल मोरेश्वर इ॥ गोपाळ नाईक उपनाम गोळे महाजन साकीन वेलंदूर त॥ गुहागर प्र॥ आंजणवेल सरकार सुभे दाभुळ हालीं व॥ क॥ पुणें यासी त्रिंबकराव चिंतामण जोसी राईरीकर साकीन उरवडे त॥ मुठेखोरें हाली व॥ क॥ पुणें सु॥ समानीन मया व अलफ. सन ११९६ कारणें आपण आपले स्वसंतोषें खरीदीखत लिहून दिल्हें ऐसेंजे. क॥ नासीक येथें श्रीक्षेत्र पंचवटींत घर आमचें श्रीरामचंद्रजीचे पश्चमेस आहे दक्षणेचे आंगे पीछावड्याचे दरवाज्यावर दुघई साक्री दुमजला खपरेल तख्तपोसीसुधां व पुढें उत्तरेस खुली जागा च्यार दिवाळीं घालून पुढील दरवाजा उत्तरसंस्थ लाविला आहे, त्यासुधां तुम्हांस फरोख्त दिल्हा असे. त्याची किंमत रु॥ शाहाजानीं पंचमेळ तमाम वजन पुरें आपण आपले पदरीं घेऊन घर व जागा तुम्हांस दिल्ही असे. त्याचे हमशाई पूर्वेस बाळ ठाकूर जटाळ, व पश्चमेस रस्ता, दक्षणेस गल्ली. श्रीरामचंद्रजीम जावयाची, उत्तरेस रस्ता. जाग्याची मोजणी त॥.

दक्षण उत्तर लांबी रुंदी पूर्व पश्चीम गज गज इमारती सिवाय इमारतीसिवाय दि-पाये दिवाल गज वाला गज सुमार सुमार

---

गज येकंदर मोजणी इमारतसुधां

येणेंप्रे॥ असे. घराचे दरवाजे आगवाडियाचा उत्तराभिमुख. पिछवाड्याचा दक्षणाभिमुख. त्याणें वागत जावें. घराचे पाणी आगवाड्याचे उत्तरेचे रस्त्यांत जातें तैसें जात जाईल. व पिछवाड्याचे पाणी दक्षणेकडे जातें तैसें जात जाईल. सदरहूप्रों॥ तुम्हांस हदमहदूद मिरास करून दिल्ही असे. सुखें तुमचे मनास येईल त्याप्रें॥ इमारत बांधोन वंशपरंपरा नांदत जावें. यासी कोणी आमचे वंशींचा अथवा पर कोणी मुजाईम होईल त्यास आम्ही वारूं. तुम्हासी समंध नाहीं. हे खरीदखत तुम्हांस लि॥ दिल्हें. सही

---

श्री.

## लेखांक २०७.

नकल.

१७१० ज्येष्ठ शुद्ध १०.

राजश्री दुलभशेट गोविंदजी मु॥ के॥ पुणें गोसावी यांसीः-

छदु फुरास याची बायको खानम तुम्हास हें बेदावेपत्र

ऐसें जेः-

आमचा भर्तार छट्टू फरास श्रीमंत नारायणराव साहेब यांच्या दंग्यांत सरकारचे गुनेगारींत आला; सबब मजला चाकणचे किल्ल्यांत मुलाचालासुध। कैदेंत ठविलें. भर्तार श्रीमंत दादासाहेबांबराबर होता, तिकडे मयत झाला. साडे तीन वर्षे मीं कैदेंत होते. त्यास सन समान सबैनांत तुम्हीं सरकारांत विनंती करून माझा खंड ठराविला रुपये ३०० तीनशें; आणि आदितवार पेठेंत आमचे कामाठी महल्यांत खपरेल अकरा खण सरकारांत जप्ती होते, त्यापैकीं साहा खण सरकारांतून मजला बक्षीस राहावयास दिल्हें. त्याची सरकारची चीटी घेतली. त्याजवर सरकार खर्च वगैरे खर्च पडला; तो मजपासी यावयास नाहीं. तेव्हां सदरहू सहा खण तुम्हांकडे गाहाण ठेविलें त्याचें गहाणपत्र पेठ मा॥रचे चावडीवर आमचा जातवाला दाऊदभाई याचे साक्षीनें लेहून देऊन तुम्हांकडून सरकारचे रु॥ देविले. व खर्चाचे रोख घेऊन दिल्हे. त्याजवर घरांत भाडेकरी घातला, आणि भाड्याचे दहावीस रुपये आले, ते तुम्हांस दिल्हे. पुढें तुमचे रुपये व्याजसुधां देऊन खण सोडवावे; त्यास, आपली नादारी, अन्न भक्षावयास नाहीं, आणि भाडेकरी कोणी राहीना. अशांत बाहादरखान गाडदी सरकार आज्ञा घेऊन जबरदस्तीनें येऊन घरांत राहिला भाडें पैसा येईना. त्याजवर माझीं परेंचालें पळीं. अन्नासाठीं खेडेगांवीं जाऊन राहिलें. त्याजवर तुम्हीं गहाणखताची हकीकत व पत्रें सरकारांत दाखऊन परवानगी घेऊन मोठ्या सख्तीनें बाहादरखानास घरांतून काढून जागा साहा आपले कबजेंत ठेविले; त्यास वरीस दीड वरीस जाहालें. हालीं केवळ नादार, अन्नवस्त्र नाहीं, म्हणोन फते-महमद वल्लद शेख महमद व फते-आली वल्लद मिर्जा मोमीन बेग दि॥ चाकर तोफखाना यांस घेऊन तुम्हांकडे आलें कीं सदरहू खण तुम्हांकडे आहेत ते तुम्हास बेदावा खत लेहून देतें आणि मजला साहा च्यार महिने अन्न पोटास यावें. त्यास तुम्हीं उतर केलें कीं, तुजला सोडविली, पदरचा पैका दिल्हा, त्यास दाहा वर्षे गुजरलीं, पैशास ठिकाण नाहीं, घर बाहादरखान यांणीं घेतले होते ते आम्हीं जबरदस्तीनें सोडविलें, त्यास व्याजसुधां पैका देऊन सोडवावें, निदान जें तुझ्या खातरेस येईल तें व्याज व मुद्दल देऊन आपला जागा घर चित्तास येईल त्यास विकणें, अगर्वा गहाण ठेवणें, आणि पैका देणें, आपले मोईचे घर नाहीं. म्हणोन बहुत प्रकारें सांगितलें. परंतु त्या घरास कोणी खरेदीदार होत नाहीं, आणि माझ्यानें गहाण ठेविल्यास कोणी ठेवीत नाहीं. मी आपले खुशी-रजावंदीनें तुम्हांस बेदावा लेहून दिल्हा आहे. तर आगवाडा पिछवाडा पूर्वेकडील रिकामा जागा व बांधलेला इमलासुधां साहाखण तुम्हांकडे गाहाण होतें तें तुम्हांस लेहून तुमच्या ऐवजांत दिल्हें. मागेंपुढें कोणी या घरा-विशईं वाद सांगावयाचा संबंध नाहीं. व तुमचे रुपये व्याजसुधां फिटले. तुम्हास बोलावयाचा संबंध राहिला नाहीं. मिती शके १७१० कीलकनाम संवत्सरे जेष्ट वा॥ ७ वार बुधवार सु॥ तिसा समानीन मया व अलफ. [illegible]

[illegible]

सदरहू निशाणी घोडा [illegible] खानम छट्टू फरास याने नागरीनें [illegible]

साक्ष

१ फते महमद वलद शेख महमद दि॥ तोफखाना असामी जेजालंदाज खानमचा जांवई यांनीं रुबरु साक्ष ल्याहावयास सांगितली कीं सदरहू घराचा वेदावा आपण मध्यस्ती करून केला असे. हस्ताक्षर लक्ष्मण फटकाळे वर लिहिलेप्रमाणें खानम यास पुसोन लिहिलें असे.

निशाणी शेख—अदम खानमचा पालक लेक याची पारसी असे.

साक्ष भत्य आलीवेग वलद मीरजा मोमीनबेग दि॥ तोफखाना. आपण मध्यस्ती करून वेदावा करून दिल्हा असे हस्ताक्षर सदाशिव वाईच नि॥ बोले मंगलवाडेकर.

निशाणी नांगर.

१ पत्राप्रों। साक्ष सखाराम धोंडाजी. उभयता धणी रुजू.

१ पत्राप्रों। मनोहर अनंत किरकसे. उभयतां धणी रुबरु.

१ पत्राप्रों। साक्ष नंदापा वाळेकर दोघे धनी रुबरु.

१ शादतराम मोतीचंद शाखधणी बोई हजूर.

साक्ष जोत्या नष्टे.

~~~~~~ दोघे.

धणी उरुबुरु.

---

श्री.

## लेखांक ३०८.

नकल.

१७११ आषाढ शुद्ध ६.

यादि दुलभशेट गोविंदजी यांणीं सरकारांत विनंति केली कीं रविवार पेठेंत श्रीगोपालकृष्णाचें ठाकुरद्वार केलें आहे, त्यालागतीं चांभाराची जागा च्यार छपरें आहेत त्यास तेथून काढून चांभाराची जागा ठाकुरद्वाराकडे यावी त्यास सरकारची आज्ञा कीं चांभारास राजी करून काढावें. त्या चांभाराचे छपराचे दक्षणेस छटू फरासाची जागा सरकारांत जफ्तीस आहे तो तान्हाजी येवला खिसमतगार याचे तसलमातीस दिल्ही आहे त्या जाग्यांत चांभार रहावयास राजी आहेत म्हणोन त्याजवरून छटू फरासाची जागा आहे तिचे मोबदला जागा सेटजीकडून दुसरेकडे घेऊन छटुची जागा पहावयाची आज्ञा. सु॥ तिसैन मया व अलफ.

छटू फरास याची जागा रविवार पेठेंतील सरकारांत जफ्तीस आहे.

३० लांबी पुर्व पश्चीम हात

२६ रुंदी दक्षण उत्तर हात

---

या जाग्यांत इमला कौलार

२५ लांबी खण ७ येक हात

९ रुंदी हात.

---

हाली किंमत रो॥ १००

फरास मजार याचे जाग्याचे मोबदला दुलभशेट याची जागा इमला कौलार दीढ मजला पेठ रविवार

२३ लांबी हात

१४ रुंदी हात

---

इमल्याची किंमत अजमासे रो॥ २५०

दुलभशेट गोविंदजी यांणीं रविवार पेठेंत ठाकुरद्वार केलें आहे तेथें शेजारीं चांभाराचीं छपरें आहे

तर त्यास जा

दक्षिणेस
~~~~~~

सरकारांत जप्तीस आहे ती मजला देवावी मी त्यास देईन. आणि त्याचे मोबदला माझी जागा पेठ मारीं आहे ती सरकारांत घ्यावी म्हणोन विनंती केली त्याजवरून शेटजीची जागा पेठ मारीं लांबी हात तेवीस रुंदी हात चौदा त्यांत इमला अजमासें अडीच शें रुपयाचा आहे ती सरकारांत घेऊन त्याचे मोबदला छट्टू फरास याची जागा चांभाराचे लगतीस दक्षणेस आहे ती सरकारांत जप्तीस आहे ती लांबी हात तीस व रुंदी हात सवीस त्यांत इमला अजमासे शंभर रुपयांचा आहे ती जागा दुलभशेट गोविंदजी यास देणें म्हणोन सदरहू अन्वयें राघो विश्वनाथ याचें नांवे पत्र देवावें देणें.

सनद लिहीणें.

छ ४ सवाल सन तिसैन आशाढ मास.

---

श्री.

## लेखांक ३०९.

नकल.

१७११ कार्तिक शुद्ध ७.

राजश्री राघो विश्वनाथ गोसावी यांसिः- सुमा तिसैन मया व अलफ. दुलभशेट गोविंदजी यांनीं पेठ रविवार शहर पुणे येथें श्री गोपालकृष्णाचा ठाकुरद्वारा केला आहे. तेथें शेजारीं चांभारांचीं छपरें आहेत. त्यास दुसरेकडे ठेवावे तरी त्यास जागा पाहिजे याजकरितां त्यांचे दक्षणेस शेजारीं छट्टू फरासाची जागा सरकारांत जप्तीस आहे ती मजला देवावी. मी त्यांस देऊन त्यांची जागा ठाकुरद्वाराकडे घेईन. सरकारचे जाग्याचे मोबादला माझी जागा पेठमारीं आहे ती सरकारांत घ्यावी म्हणोन विनंति केली त्याजवरून शेटजीची जागा पेठमारीं लांबी हात २३ व रुंदी हात १४ त्यांत इमला अजमासें अडीचशें रुपयांचा आहे. ती सरकारांत घेऊन मोबादला छट्टू फरासाची जागा चांभाराचे लगती दक्षणेस सरकारांत जप्तीस आहे ते लांबी हात ३० व रुंदी हात २६ त्यांत इमला अजमासें सो शंभराचा आहे ती जागा सेटी मजकूर यांस देणें छ ५ सफर वार कीर्दीस आहे.

---

श्रीसर्वेश्वर.

## लेखांक ३१०.

१७१४ जेष्ट शुद्ध १०.

पौ॥ जेष्ट शु॥ १३ त्रयोदशी शके १७१४ परिधावी संवत्सरे

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री त्र्यंबक रावजी स्वामीचे शेवेसीः—

सेवक मोरो त्र्यंबक गोडबोले साष्टांग नमस्कार विनंति विशेष. तिर्थरूप बाबांस वैशाख वद्य एकादशीस देवाज्ञा जाली. हें वर्तमान मजला ब्राह्मणवाडे येथें समजलें. उपरांत घरीं आलों. कळावें. ईश्वरसत्ता प्रमाण. त्यांचे सर्व प्रकारें [illegible] आपलें छत्र गेलें. असो. तुम्ही [illegible] कडील सर्व वर्तमान लिहीत जावें. राजश्री त्र्यंबकराव परचुरे यांस सा॥ नमस्कार सांगावे. र॥ मिती जेष्ट शुद्ध १० [illegible] बहूत काय लिहिणें ! लोभ कीजे. विनंति.

सेवेसी रामाजी केशव [illegible] नमस्कार विनंति लिहिली पाहिजे [illegible] पत्रीं संतोषवीत असावें. [illegible] जाजाला याम अंतर नसावें. [illegible] लिहावें ? कृपा लोभ करावा हे विनंति.

सेवेसी चिंतो रामचंद्र [illegible] नम॥ विनंति लिहिली पाहिजे [illegible]

अंतर नसावें. भेट होईल तो सुदिन. हे विनंति.

---

श्री.

## लेखांक ३११.

१७१४ श्रावण.

विनंती विशेष. राजश्री मोरोपंत भाऊ आम्ही मेजवानीस बोलाविले होते. आपली गोष्ट श्रीमंताजवळ निघाली ते सहजात येथें काहाडली होती. तदनंतर असें हि बोलले कीं राजश्री बालाजीपंत सावरकर याजवर हि कृपा बहुत करितात. आम्ही जनस्थानीं गेलों ते समई बालाजीपंत यास उद्योगाकरितां राहून घेतलें. राजश्री खंडेरावजी याचें बरें व्हावें म्हणोन उद्योग केला. त्याचें फल आतां असावें त्यावरून मीं बोललों कीं ते ममता करितात यांत बाळाजीपंताचें उर्जित करण्यास अगाध नाहीं. ते थोर. त्यांणीं सहज यांजकडे बरें दृष्टीनें अवलोकन केल्यास कूर्मबालकापरी यांचे कल्याण होईल. जें आपलें म्हणविलें त्याचे चालवावें हे थोराचें लक्षण. यास्तव बाळाजीपंत कुलीण. थोर शहाणपणाची जात. अनुभवजन्य आहे. आपली दौलत थोर, संग्रह मनुष्यांचा असावा. श्रीमंत नानासाहेबीं जो मनुष्य गुणी आढळला, स्वराज्य परराज्यांतील, तो संग्रहोन ठेविला. बाळाजीपंत बुध्धीमान आहेत. याचा संग्रह आपल्याजवळ ऐसें भाऊचें हि मानस. त्यांत जे समई म॥ रानिल्हेस हातीं धरून सांगितलें कीं आमचें कल्याणाविसीं आम्हांजवळ असावें. त्यास थोरांनीं ज्यास हातीं धरलें त्याचे अभिमानपुरस्कर चालवितील च ते च आपण कोणे समई कोणी येक वस्तु संग्रहीं काय गुण, हे सुज्ञ सुक्ष्म दृष्टीनें अवलोकितात. म॥ रानिल्हेस नेमणूक त्या समयानरूप खर्चाची चालती करून आपले पदरीं ठेविलें असतां याचा हि पायगुण आपल्यास अनभवलाच आहे.

---

श्रीसर्वेश्वर.

## लेखांक ३१२.

१७१४ श्रावण वद्य ३.

पैवस्ती श्रावण व॥ १२ शके १७१४ परिधावी.

राजश्री त्र्यंबकरावजी स्वामीचे शेवेसीः—

विनंति. राजश्री त्र्यंबकरावजीस पत्र आपलें लिहिल्यावरून पाठविलें आहे. ते कृपा करीतच आहेत. राजश्री बळवंतराव सावरकर यांस पत्रें आमचे लाखोट्यांत होतीं तीं पावती केलीं. त्यांनीं उत्तरें दिली आहेत. पावतील. आमचे येण्याचा योग केंधीं म्हणोन लिहिलें त्यास चातुर्मास जालियावर विचार करावयाचा आहे. तुम्हीं फार सावधपणें वर्तणें. व मर्जी संपादन युक्तीनें करून घ्यावें. दर्शनास जात च असाल. सारांश प्रमाणीकतेची आवड यजमानास फार आहे. आपण हि तसेंच आहां. कसें वर्तावें हें ल्याहावें म्हणोन लि॥. त्यावरून लि॥ आहे. विशेष ल्याहावें नलगे. निरंतर वरचेवर होईल तें कळवाल तेणें करून संतोष असे. बहुत काय लिहिणें ? तीर्थस्वरूप राजश्री बाजीपंत दादा काकिर्ड्यास स॥ नमस्कार आपण जाऊन सांगावें त्याकडे आठा चोहों रोजीं जात जावें. समागम योग्य आहे. लोभ करावा. हे विनंति.

सेवेसी रामाजी केशव पळनीटकर कृतानेक स॥ नमस्कार. विनंति. येथील क्षेम श्रावण वद्य ३ पर्यंत जाणोन स्वकीय कु-

शललेखन करीत असावें. विशेष. आपण दोन पत्रें रुपेनी पाठविलीं तीं पावोन कुशलार्थ कळला. आपले पत्राचे अर्थे राजश्री भाऊसी बोलोन उत्तरें पाठविलीं आहेत, त्याजवरून सर्व अर्थ ध्यानांत येईल. सर्वदा पत्र पाठवून सांभाळीत असावें. बहुत काय लिहिणें ? हे विनंति.

---

श्रीसर्वेश्वर.

### लेखांक ३१३.

१७१४ श्रावण वद्य ३.

पैवस्ती श्रावण वा॥ १३ शके १७१४ परिधावी संवत्सरे.

राजश्रियाविराजितराजमान्यराजश्री त्र्यंबकरावजी स्वामींचे सेवेसीः—

सेवक मोरो त्र्यंबक गोडबोले कृतानेक सा॥ नमस्कार विनंति. येथील कुशल ता॥ श्रावण वद्य ३ त्रितिया पर्यंत जाणोन स्वकीय कुशल लेखन करीत असिले पाहिजे. विशेष. आपण एकदोन पत्रें विस्तारें लिहिलीं तीं पावोन सविस्तर कुशलार्थ कळले. चिठी यजमानाकडे यावयाची ती बराबर गेली असेल कामास अडथळा पडला याजमुळें दुसरी दिली म्हणोन लि॥ त्यास चिठी आम्हांबराबर आली नाहीं. यजमानाजवळ प्रविष्ट जाली आहे. खासगीकडे शोध करावा. थांग न च लागला तर दुसरी चिठी आपण दिली असेल तिजमध्यें पहिली चिठीचा आशय आणिला असेलच. त्यापक्षीं चिंता नाहीं सरकारचे ऐवजाच्या मुदती—भरत आल्या म्हणोन योगांत आलों ऐसें विस्तारें लिहिलें त्यास जे वेळेस करार जाला ते समयीं गावचा वगैरे एकदम फडशा करावा ऐसा विचार करून च आपण कबूल केलें ऐसी गोष्ट जाली च आहे त्याजप्रमाणें पैरवी करून भरणा करावा वचनांत करारांत अंतर पडलें तर पुढें विशेष कृपा संपादून घ्यावयाची त्यास वांकडें पडेल याजकरितां रावजी करारसमयीं विचार करून जो नेम केला त्याजप्रमाणें पार पाडावें घर मोकळे करून घ्यावयाचें तें जें चित्तांत होतें तें च सुटलें तेणें करून बहुत संतोष जाला. यजमानास पत्र यावें म्हणोन लिहिलें त्यास करार आहे त्यांत कोठें गुंतले—यास कानावर पडलें म्हणजे ते क्षणीं च उलगडा पडतो. ऐसे कृपेचा प्रकार आपण लिहिला त्या पक्षीं उगेंच पत्र त्याहावें ऐसी रीत नव्हे, म्हणोन लिहिलें नाहीं. कळावें. बहुत काय लिहिणें ? कृपा लोभ करावा. हे विनंति.

---

श्री.

### लेखांक ३१४.

१७१४ आश्विन शुद्ध १.

राजश्रियाविराजितराजमान्यराजश्री त्रिंबकरावजी स्वामीचे शेवेसीः—

पो॥ बाळाजी रामचंद्र सावरकर कृतानेक सा॥ नमस्कार विज्ञापना. येथील कुशल ता॥ आश्विन शु॥ १ मु॥ जनस्थान जाणून स्वकीयार्थ लिहीत असले पाहिजे. कृपा करून पत्र पाठविलें तें सुसमयीं प्रविष्ट होऊन परमानंद जाला. परंतु स्वकीय प्रकृतीचा मजकूर कांहीं लिहिला च नाहीं व राजश्री खंडेराव दादाजीस [illegible] जाली म्हणोन येथें दाट [illegible] त्याचें हि कांहीं लि॥ नाहीं. [illegible] राजश्री भिकाजी मोरेश्वर यांची नवी मोकळी जाली म्हणोन येथें त्यांनीं [illegible] घातली आहे. हें हि कांहीं [illegible] येत नाहीं त्यास कृपा करून आम्हांस [illegible]

सर्व मा॥र लेखनीं कळविला पाहिजे. यानंतर राजश्री लक्ष्मणपंत लेले यांचा मा॥र लि॥ यास मा॥रनिलेस मी निघालियाचे पाठी-मागें ज्वर जाला त्याजमुळें त्यास कोणाची फुकट घोड्याची सोबत लागतांच आपला निरोप देखील न घेतां गंगापुरास आले. येथें आलियावर हि मला समजलें नाहीं. आतां समजलें. येथें येऊन हि बरें वाटत नाहीं. असो. परंतु आपला तर निरोप घ्या-वयाचा होता ! अशाच्यानें कामें जर होतीं तर नोकर पृथ्वीवर कोणीच न राहाते. राजश्री धोंडोबा नाईक रेघे यांस साडेचौशा-विशीं तगादा केला. ते समयीं बोलले कीं, देतों. त्यास वायदा केला. त्याजवर फिरोन बदलले कीं, रावजींचें पत्र कोठें आलें ? त्याजवरून शिपाई बसाविले. इतकियांत आपलें पत्र आलें कीं, सव्याज रुपये घ्यावे. हें त्यांस दाखविलें. तेव्हां प्रयत्नानें वाटेवर येऊन आजचा च वायदा केला आहे. हे रुा आज्ञे प्रों। सव्याज घेतों. परंतु पुढील रुपयाविशीं तंटा पडेलसें दिसतें. तगादा सख्त करीतच आहों. हे रुपये वसूल साडे-च्यारशें जालियावर दिंडोरकर देशमुखास तगादा करितो; कळावें. धोत्रजोडे बेता प्रों तयार करविले आहेत. पीतांबराचा माग्या गांवास आमचे वोळखीचा गेला आहे. एका दोहों दिवशीं आलियावर तो हि उद्योग होईल. मध कोणी प्रमाणीकसा जासुद येऊं लागला म्हणजे जरूर पाठवितों. रा मोरोपंत भाऊ दस-रियास यावेसें केलें होतें, परंतु येथें ऐकिलें कीं, रा दादाजीस वस्त्रें सरदारीचीं जालीं. त्याजवरून दीपवाळी करून निघावें ऐसें केलें आहे. मी हि शेवेसीं समागमें येतों. आतां पुणियांत येण्यास भरंवसा एक आपले पायाचा वाटतो. तेणेंकरून वारंवार दर्शनापेक्षा होते. भेट होय तो सुदिन आहे. रा। भाऊजी रा। दादाजीस व आपल्यास पत्र लि॥ आहे. याचे त्याजकडील मी हि त्यांस पत्र लि॥ आहे. त्या सुद्धां उत्तरें घेऊन पा॥. त्यांचे उत्तर आणवावें म्हणोन रा। भाऊंनीं आपालियास लिहावयास सांगितलें आहे. शेवेसी श्रुत होय. दयावृद्धि करीत च आहेत. तसी निरंतर करावी. हे विज्ञाप्ति. रा॥ विनायकपंतास नमस्कार प्र॥ करावे.

---

श्री.

## लेखांक ३१५.

१७१४ मार्गशीर्ष.

पैवस्ती मार्गशीर्ष वद्य ११ शके १७१४ परिधावी संवत्सरें.

श्रीमंत राजश्री रावजी स्वामीचे शेवेसीः-

सेवक आबाजी भास्कर ठकार कृता-नेक सा० नमस्कार विज्ञापना. ल्याहावेया जे आपले थोरले कामाविशीं माहदजी रा-नवडे याचे कानावर घातलें आहे कीं पाटिल बाबाकडून करून घेणें त्यास त्यांनीं मान्य केलें आहेतेम्हणतात कीं त्यांची आमची भेट जाली म्हणजे बंदोबस्त करून देऊं त्यास आपण पंचमीस मुळखेडास यावें म्हणजे ते तिकडे येणार बेत केला आहे तर आपण अगत्य यावें कार्य करावया जोगे आहेत मी श्री कोल्हापुराहून आल्यापासून शरी-रास समाधान नव्हते बायकोस व आम्हांस उभयतांस समाधान नव्हतें. आताशीं समा-धान वाटत आहे. चिरंजीव बाळास त्याचे मागें लाविलें आहे. त्यांनीं मान्य केलें आहे पंचमीचा करार केला आहे. आपण याव-याची चिटी त्यांचे नांवें द्यावी. मोघम द्यावी कीं आम्हीं येतों. कळावें बहुत क [illegible] रुपालोभ अ [illegible] हे

आवंदा आडचण फार आहे. रुपयाची मात्र तजवीज करितों. माघ अखेरपर्यंत रु॥ १०० शंभर देतों. कळावें. हे विनंति.

---

हु

## लेखांक ३१६.

१७१७ चैत्र वद्य १२.

रणमस्तखान व दावेदार-खान टोके खुशवख्त बाशद.

छ. तहवर व जलादत दस्तगाहा सु॥ खमस तीसैन मया व अलफ. राजश्री त्रिंबकराव चिंतामण यांचे कर्ज तुम्हाकडे येणें त्याचा फडशा वाजवीचे रीतीनें करून देत नाहीं म्हणोन हुजूर विदित जालें. त्याजवरून हें पत्र सादर केलें असे तरी म॥रनिलेचे कर्जाचा फडशा वाजवी खता प्रें॥ करून देणें.

जाणिजे छ २५ रमजान. जादा काय लिहिणें ?

| श्री<br>राजा शाहु नर<br>पति हर्ष निधान<br>माधव राउ नारा-<br>यण प्रधान. | लेखन<br>सीमा |
|---|---|

---

श्री.

## लेखांक ३१७.

१७१९ फाल्गुन वद्य ६.

छ ७ सवाल चैत्र मास सुहूर-सन समान तिसैन मया व अलफ.

साहेबाचे सेवेसी पुरवणी ता॥ छ १९ रोजीं सेना-धुरंधुर यांनीं समारंभ दिवाण-खाण्यांत करून सर्व मुछद्दी मंडळी व मानकर वगैरे यांसी बोलाऊन राजश्री भवानी माळो व त्याची मंडळी बळवंतराव भवानी सुध्धां श्रीधर लक्ष्मण रामचंद्र माधव कृष्णराव माधव अनंदराव वैद्य व नेमतराव कायत शिंयाक डील व केशवराव व्यंकटेश होळकारा-कडील वकील व नरशिंगराव अनंत नबाबा-कडील बुन्हानशाचे चिरंजीव असामी दोन गुजर मंडळी व्याही जावई व भासे वगैरे मिळोन पाऊणशें इसम यांसी वस्त्रें शेला पागुटीं योग्यायोग्य पाहून वगाणपूर ज्याहनाबाद येणेप्रे॥ दोन सनगें सर्वांस देऊन राजश्री परसोजी भोसले यासी शेला पागुटें पैठणी अबासी दिल्हे व मुधोजी भोसले यांसी कुंचडेंटोपडें झगा दिल्हा बादलीपोशाख दिल्हा राजश्री सेनासाहेब सुभे यांसी बसंती वर्खी कच्या रंगाचे सेला-पागुटें दिल्हें नंतर अत्तरदान पानदान गुलाब होऊन सेनासाहेब सुभे यांनीं आपल्या कडून वर्खी कच्या रंगाचा पोशाख दिल्हा सर्वांस निरोप दिल्हा साहेबाचे सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

---

श्री. लेखांक १.

## लेखांक ३१८.

१७१९ माघ वद्य ३०.

पे॥ छ ५ रमजान सुहूर सन समान तिसैन मया व अलफ मु॥ पुणें.

श्रीमंत महाराज राजश्री [illegible] साहेबाचे सेवेसी

विनंती सेवक आज्ञाधारक [illegible] नीवाजी [illegible] [illegible] ता॥ [illegible] विज्ञापना [illegible] ता छ २८ [illegible] [illegible]

नवाब बंदगानअलींचें वर्तमान ता॥ छ २३ माहे शाबान रोज सेनवारीं तिसरे प्रहरास डाक रवाणा केली ते सेवेसी प्रविस्ट जाहली असेल. छमजकुरीं मिस्तर छोटे कीरीक-पात्रीक फिरंगी वकील यांचें येथें वर्तमान आलें कीं बंदराकडे इंगरेज फिरंगी व फरासीस फिरंगी याची लडाई जाहली. इंगरेज फिरंगी यांनीं फरासीस फिरंगियाचे सात ज्हाज पडव करून आणले म्हणून वर्तमान आलें. सबब त्यांनीं खुसी केली. त्याजवरून नवाबांनीं इकरामत-द्वला भाऊसिंगचा उपरि यास हुकूम केला कीं नवे तोफा तकतावर च्यार चडविल्या आहेत त्या तोफाचे अकरा बार फिरंगियाचे खुसीचे करवणें. आणखी नवे तोफाचा पला पाहणें, म्हणून हुकूम केला. मग भाऊसिंगचा उपरी व इकरामतद्वला यांनीं जाऊन नव तोफाचे अकरा बार खुसीचे केले. नवे तोफाचा पला पाईला, ते अर्ज जाहली. खिलबत्तीतील लहान च्यार तोफा तेरा जजाला तयार करावयास जी-नसीमधें पाठविले. ते तयार करून बाडन पेठेस पाठवणें म्हणून हुकूम जाहला. सं-ध्याकाळीं मसरनमुळूक बरामद जाहले. भाऊसिंगचा उपरी व इकरामतद्वला मामुली इसम याचा सलाम जाहला. गोस्टमात अवघे-यासि जाहली. इकरामतद्वला यानें नवे तोफाचा पला पाहून आले ते सांगि-तलें. येक प्राहरास बारखास जाहले. इकडे नवाब च्यार घटका रात्रीस पच-माहलांत बरामद जाहले. सैद उमरखां व मीरदेतार-अलीखां व मामुली इसम याचा सलाम जाहला. गोस्टमात अवघेयासी जाहली. रंजेपुरजेवाले व दोघ आदळे याचं गायण होतें तें ऐकत बसले. ते येक प्रहर पांच घटकास बारखास जाहले. रात्रीस खैर सला. ता॥ छ २४ माहे शाबान रोज रविवारीं नवाब साहा घटकास जागले मसरनमुळूक जागले. मग नवाब दोन प्रा-हरास पच-माहलांत बरामद जाहले. कलण हज्याम व सेख उमरखां व मीरदेतारअली-खां व मामुली इसम याचा सलाम जाहला. गोस्टमात अवघेयासी जाहली. मग नवा-बानें हज्यामत घेतली. दोन प्राहर तिसरी-मधे बरखास जाहले. मग इकडे मसरन-मुळूक येक प्राहर साहा घटकास बंगलेमधें बरामद जाहले. मीर अमजरांद्वला सम-सेरजंग रघोत्तमराव रेणुराव व मामुली इसम याचा सलाम जाहला. मग मसरनमुळूक रघोत्तमराव रेणूराव रोसेनराय यासी गोस्ट-मात जाहली. यांनीं कागदपत्र दाखविले ते पाईले. मग मीर अमजरांद्वला समसेरजंग यासी गोस्टमात जाहली. मग मसरनमु-ळूक अडीचा प्राहरास पालकीमधें स्वार होऊन चवकांतील आपली हवेलीमधें गेले तेथें बसले. मसरनमुळूक रघोत्तमराव रेणूराव रोसेनराय यासी एकांत गोस्टमात जाहली. कागदपत्र दाखविले ते पाईले मग तीस इसम अरब याची मिसल पाईली. मग तेथून तीन प्राहरास निघाले ते आ-पले हावेलीस दाखल जाहले. ते अर्ज जाहली. रे॥ नरसिंगराव अमील मसेमुद-व्हास गेला त्याची अर्ज जाहली. मग नागपुरास भोसले याजकडे नवाबाकडील येक सुर्तुस्वार व रे॥ माधवराव वकील भोसले याचा याजकडील येक सुर्तस्वार ऐसे दोघ सुर्तुस्वार नवाबाकडील कागद-पत्र व माधवराव वकील याजकडील पत्र घेऊन नागपुरास गेले त्याची अर्ज जाहली. येलजपुराहून इसमालखां याजकडील पत्र घेऊन जासूदजोडी आली ते अर्ज जाहली. आणखी नागपुराहून

घेऊन रे॥ ५ १

याजकडे आला त्याची अर्ज जाहली. रात्रीस येक घटकास मसरनमुल्क बंगलेमधे बरामद जाहले. मीर अलम व मुस्तकीमजंग व रघोत्तमराव व मामुली इसम याचा सलाम जाहला. मग एकलतद्वला धाकले खममहून एक त्याची मुलाजमात जाहली. नजर गुजरली. मग मसरनमुल्क मीर-आलम व मुस्तकीमजंग रघोत्तमराव व एकलतद्वला यासी एकांत गोस्टमात जाहली. मग एकलतद्वला यानें खममेचें पत्र दाखविलें तें पाहिलें. व मग मीरअलम यानें चिनापटणचे कागदपत्र दाखविले ते पाहिले. मग रघोत्तमराव यानें पुणेचे डाकेचे पत्र आलें होतें तें दाखविलें तें पाहिलें. मग धारूराकडील डाक आली ते गुजरली ते पाहिले. येक प्रहरास बरखास जाहले. रात्रीस नवाबाचे दरबारची खैरसला. ता छ २५ माहे शाबान रोज सोमवारीं नवाब साहा घटकास जागले. मग मसरनमुल्क जागले. व मग मसरनमुल्क येक प्रहरास बंगलेमधें बरामद जाहले. मीर आलम व मुस्तकीमजंग रघोत्तमराव रेणूराव व मामुली ईसम याचा सलाम जाहला. मग मसरनमुल्क मीर आलम मुस्तकीमजंग रघोत्तमराव यासी येकांत गोस्टमात जाहली. यांनीं कागदपत्र दाखविले ते पाहिले. मग येलजपुराहून इसमालखां याचें पत्र आलें होतें तें गुजरलें तें पाहिलें. मग चवचे-यासी गोस्टमात जाहली. तीन प्रहरास बरखास जाहले. ते अर्ज जाहली. नवाबाचे दरबारची खैरसला. चिनापटणाहून मिस्तर डसमीन साहेब फिरंगी व आणखी येक फिरंगी एसी दोघे फिरंगी आले. त्याचा अर्ज जाहली. संध्याकाळीं मसरनमुल्क बंगलेमधें बरामद जाहले. मुनीरनमुल्क व रोसिनराय व मामुली इसम याचा सलाम जाहला. गोस्टमात रोशेनराय व मुनीरनमुल्क यासी जाहली. यांनीं पत्र दाखविलें तें पाहिलें. येक प्रहरास बरखास जाहले. रात्रीस नवाबाचे दरबारची खैरसला. ता छ २६ माहे शाबान रोज मंगळवारीं. नवाब साहा घटकास जागले. मग मसरनमुल्क जागले. मग मसरनमुल्क सात घटकास जाऊन नानकराम याचे हवेलीमधें बसले. तेथें रघोत्तमराव व मुनीरनमुल्क व मामुली इसम यास बोलाऊन घेतलें. याचा सलाम जाहला. गोस्टमात अवघेयासि जाहली. मग नवाब जनाने— याचे बंदोबस्तीनें मसरनमुल्क याचे चवकांतील हवेलीमधें आले तेथें बसले. नाच कंचन्याचा होता. गुलाल पाहिला. मग तेथून नवाब दोन प्रहरास निघाले ते जनानेयाचे बंदोबस्तीनें आपले हवेलीस दाखल जाहले. मग मसरनमुल्क व तमाम अमीर उमराव दिवानखानेमधें येऊन बसले. तेथें मसरनमुल्क रघोत्तमराव व मीर अ[illegible]जतद्वला यासी गोस्टमात जाहली. गुलाल पाहिला. मग मसरनमुल्क दोन प्रहर [illegible] घटिकास निघाले ते आपले हवेलीस दाखल जाहले ते अर्ज जाहली. [illegible] संध्याकाळीं मसरनमुल्क बंगलेमधें बरामद जाहले. रघोत्तमराव रोसिनराय व मामुली इसम याचा सलाम जाहला. मग मसरनमुल्क रघोत्तमराव रोसिनराय यासी गोस्टमात जाहली. यांनीं कागदपत्र दाखविलें ते पाहिले. येक प्रहरास बरखास जाहले. मग नवाब च्यार घटकास [illegible] बरामद जाहले. मग [illegible] मामुली याचा सलाम जाहला. [illegible] व [illegible] बसले. [illegible] बरखास जाहले

रात्रीस खैरसला. ता छ २७ माहे शावान रोज बुधवारीं नवाब साहा घटकास जागले. मग मसरनमुल्क जागले. मग नवाब येक प्राहर तिसरीमधें खावागामधें बरामद जाहले. मसरनमुल्क मीर एकजतदवला व मामुली इसम यास बोलावून घेतले. याचा सलाम जाहला. मग नवाबासी मसरनमुल्क यासी गोस्टमात जाहली. येक प्राहर साहा घटकास बरखास जाहले. नासरमुल्क याचा नातू लहान मूल निवरतल्याची अर्ज जाहली. मग मसरनमुल्क बंगलेमधें बसले. रखोत्तमराव रेणूराव रोसेनराय यास बोलावून घेतले. याचा सलाम जाहला. गोस्टमात यासी जाहली. यांनीं कागदपत्र दाखविले ते पाहिले. तीन प्राहरास बरखास जाहले. गोदड-आबडाबादेहून येक तोफ आली ते जीनसीमधें दाखल जाहली ते अर्ज जाहली. संध्याकाळीं मसरनमुल्क बरामद जाहले. मुनीरनमुल्क व अज्यावणमुल्क व मामुली-याचा सलाम जाहला. गोस्टमात अवघेयासि जाहली. दिल्हीचें पत्र अकबारीचें आलें होतें तें पाहिलें. मग मुसारईमु फिरंगियास खमम तालुका दिल्हे. साहा घटकास बरखास जाहले. मग नवाब च्यार घटकास पच-माहलांत बरामद जाहले. शाहगरित-पेशा याचा सलाम जाहला. शैध अदले याचें गायेण ऐकत बसले. ते येक प्राहर तिसरीमधें बरखास जाहले. रात्रीस खैरसला. ता छ २८ माहे शावान रोज गुरुवारीं नवाब साहा घटकास जागले. मग मसरन-मुल्क जागले. नवाबाचे दरबारची खैर-सला. मसरनमुल्क याचे दरबारास जाव जाहला. दरबारची खैरसला. महमदहुसेन अलीखां भोपाळवाला आला होता. जमा-दारयास पन्नास स्वारानिसी चाकर ठेविले. येक मोगल यास पंचवीस स्वारानिसी चाकर ठेविले. रखोत्तमराव काटकर वगैरे तीन ईसम यास दीडसेहे स्वारानिसी चाकर ठेविले. आरब पन्नास पुण्याकडून आले त्यास चाकर ठेविले. आणखी आले ते लोक ठेवितात. कळावें. धारुराकडे कांहीं जमीयेत पाठविणार म्हणून बोलतात. कळावें. जाहलें वर्तमान सेवेसी लिहिलें आहे. आणखी जें होई तें सेवेसी लिहीण. कळावें. सेवेसी सुत होय हे विज्ञापना.

---

श्रीपांडुरंग. लेखांक २.

## लेखांक ३१९.

१७२० फाल्गुन शुद्ध १.

पो॥ छ २५ शावान सुहूर सन तिसा तिसैन मया व अलफ

श्रीमंत राजश्री रावसाहेब साहेबाचे सेवेसी.

आज्ञाधारक तुकाजी लकोबा व बाला सावत कृतानेक दंडवत विज्ञापना ता॥ छ माहे रमजानपर्यंतों साहेबाचे कृपाव-लोकनेंकरून मु॥ नागपूर येथें सेवकाचा वर्तमान येथास्थित असो. यानंतर राजश्री सईना साहेब सुभा याजकडील वर्तमान छ ४ रोजी पावेतों साहेबाचे सेवेसी लि-हिला च आहे. यानंतर छ ५ रोजीं नाग-पूरापासून चवा कोसावर कापसी म्हणून गांव आहे तेथें श्नान देवपूजा करून भोजेन करून बाडालगत च विचोबा होता तेथें आपण व कृष्णराव माधव श्रीधर लक्ष्मन ऐसें बोलले प्रहर दिवस होतां आपल्या-कडील अप्पाजी रघुनाथ आले-यावर त्यासी दोन घटका बोलून त्यास रवान-कीचे विडे दिले व बरोबर स्वार देववा-विसी नेमणूक जाली. नंतर च्यार घटका

दिवस राहतां सईनासाहेबसुभा व परसोजी भोसले याचे कुटुंब नागपूरास रवान केलें. यावर आपण व कारभारी बसून साहा घटका बोलणें जालें. नंतर च्यार घटका रात्रीस दरबार बरकास जाला. कारभारी डेऱ्यास गेले. छ ६ रोजीं कुच जालें आपण स्नान देवपूजा करून भोजन करून दीड प्रहर दिवस येतां कुच जालें. आठा कोसावर माथनी मोहोन म्हणून गांव आहे. प्रगाना नजरधन, प्रांत रामटेक. साहेंकाळीं मुकामास आले. गांव गुज्यावा गुजर याजकडे आहे. पुन्याकडून डाकची पत्रें आलीं होतीं. मग च्यार घटका रात्रीस कारभारी बोलावून आपण व उभयेता कारभारी बसून डाकचीं पत्रें वाचून पाहिलीं. नंतर साहा घटका खलबत जालें. सवा पाहार रात्रीस नागपुराहून भवानी काळू मागें राहिले होते ते आले. नंतर दोन घटका बोलून सवा दो पाहारा रात्रीस दरबार बरकास जाला. छ ७ रोजीं मु॥ जाला. गुज्यावा गुजर यांनीं मेजमानी केली. सेनासाहेब व सईना-धुरंधर व परसोजी भोसले वगैरे दोनसे लोक जेवले. व उंट व घोड्यास दाना दिल्हा. च्यार घटका दिवस येतां स्नान देवपूजा करून, प्रहर दिवस येतां आपण व भवानी काळो व उभयता कारभारी बसून विठ्ठल बल्लाळ सुभेदार व रघुनाथ गोपाळ-घाटगे यांस पत्र लेहून सांडणीस्वार रवाना केले. दो पाहारा दरबार बरकास जाला. नंतर भोजन करून निद्रा केली. साहेंकाळीं निजून उठले. नंतर कचेरीच्या डेऱ्यात बसून सेग सुभाना सिलेदार याचा घोडा करडा बोर बदन चांगला होता तो आणून सरकारांत पागेस लाविला. च्यार घटका रात्रीस भवानी काळोबा येऊन बोलत बसले. साहा घटका रात्रीस कारभारी आले—यावर आपण व कारभारी बसून येक प्रहर बोलणें जालें. नंतर भवानी काळो याच्या जावयास देमार च वाखा होता म्हणून निरोप घेऊन पावणे दो पाहारा रात्रीस कुच करून नागपुरास गेले. आपण व कारभारी बसून दोन घटका खलबत जालें. दो पाहारा रात्रीस (खजिन्याचे उंट च्यार) दरबार बरकास जाला. छ ८ रोजीं मुकाम च होता. प्रातःकाळीं स्नान देवपूजा करूण प्रहर दिवस येतां कलकत्त्याचा फिरंगी करनाराईस साहेब याजकडोन मुजरद जोडी पत्र घेऊन आले—यावर आपण व कारभारी बसून तीं पत्रें वाचून पाहिलीं. नंतर च्यार घटका खलबत जालें. दीड प्रहर दिवस येतां दरबार बरकास जाला दो पाहारा भोजन करून स्वारी तयार करून, आपण व सईना-धुरंधर व परसोजी भोसले वगैरे मानकरी व उभयेता कारभारी येसे जाऊन सवदागराचे उंट सुमारीं १२७ आले होते ते खरेदी केले. त्यानें नजर दोन [illegible] केल्या. नंतर सेना-धुरंधर याजबरोबर [illegible] नाच्या डेऱ्याचे उंट सुमारीं १५ आणले त्या बानाची परीक्षा पाहिली. दोन बाण सोडले. दोन बाण गेले येका कोसावर [illegible]. नंतर दोन घटका बोलून साहा घटका दिवस राहतां स्वारी डेऱ्यास आली. [illegible] निद्रा केली. दोन घटका रात्रीस निजून उठले. नंतर [illegible] दोन घटका [illegible] गीच्या डेऱ्यास गेले. [illegible] कारभारी आले—यावर आपण व उभयता कारभारी व आनंदराव [illegible] कारकून बाळाजीपंत व [illegible] बसून च्यार घटका बोलणें [illegible] यावर [illegible] पुण्याहून [illegible] यास [illegible]

व महमुदी येक व किनखाबाचे ठान अर्ध येकून साडेतीन सनगें दिल्हियावर च्यार घटका बोलून, पावणें दो पाहारा रात्रीस दरबार बारकास जाला. छ ९ रोजीं श्नान देवपुजा करूण, प्रहर दिवस येतां भोजेण करून, दीड प्रहर दिवस येतां कुच केलें. पुढें येका कोसावर येऊन जगननाथाचे यत्रेस लोक जातात, त्याचे घरचे कोण्ही घालवावयास आले होते, त्यास निरोप दिल्हा. मग आपण व सेना-धुरंधर यैसे येका अंबारींत बसून चालले तों पुन्या-कडुन डाकचीं पत्रें आलीं. नंतर तीं पत्रें वाचीत मुकामापावेतों आले. दाहा कोस कसबा भंडारें होतें. मुकाम जाला. तेथें गढी आहे. कमाविसदारानें मेजमानी केली. च्यार घटका रात्रीस कारभारी बोलावून तीं पत्रें वाचलीं. तों गांववाले येऊन बोभाट सांगितला कीं, आम्हास वाघानें बहुत उपद्रव केला आहे, मानसें मारितो. यांनीं हि बातमीवर जासूद पाठविले. मग आपण व कारभारी बसून येथून आठा कोसावर मोजलाखी म्हणून गांव आहे. प्रांत चांदगढीचा मुकाम नेमिला मग प्रहर रात्रीस दरबार जाला. छ १० रोजीं प्रेथकालीं च आपण व उभयेता कारभारी व बाला-जीपंत काळेकर यैसे बसून च्यार घटका दिवस येईतोंपरियंत बोलनें जालें. यावर श्नान देवपूजा करूण बेसले. लशेकरचे कुच जालें. आन आपण व सईना-धुरंधर व उभयता कारभारी यैसे बैसले. वाघाच्या बातमीवर बडे राजे व सिवा वाला हाजारी गेले होते. ते दो पाहारा बातमी आली कीं वाघ कोठें नजरेस येत नाहीं. मग दो पाहारा आपण व कारभारी मिळोन किल्ला पाहावयास गेले. जागजागीं पडक आहे. त्याची डागडुजी करावयास सांगि-तली. सवा दो पाहारा घोड्यावर स्वार होऊन साहेंकालीं मुकामास आले. नंतर श्नान करून भिकाजी गोपाळ व उभयेता कारभारियास फराळास पाठविलें. नंतर आपण फराळ करून निद्रा केली. छ ११ रोजीं कुच करून सात कोसावर चांदगढी तेथें मुकाम नेमला होता. व भिकाजी गोपाळ याची रवानकी वराडांत होत होती. विडे देण्हार होते. परंतु वय-धुरुत होता. भोजेण करूण कुच केलें. तों साहा घटका दिवस राहता मुकामास आले. वाडास येतां च मातक्यान स्वारी तयार करूण आपण व सईनाधुरंधर व तातोश्री यैसे एका कोसावर शिवनगांवचा तलाव चांगला मोठा आहे तो पाहावयास गेले नंतर पाहून साहेंकालीं श्वारी वाडास आली. च्यार घटका रात्रपरियंत दरबार जाला. पाचा घटका रात्रीस कारभारी आले-यावर भिकाजी गोपाळ यास बोलावून येक प्रहर-परयंत वराडप्रांतीचा हिशेब पाहिला. नंतर तेथून साहा कोसावर कवडु पाटील याचा वाद आहे तेथें मुकाम नेमला. दो पाहारा रात्रीस दरबार बारकास जाला. छ १२ रोजीं स्नान देवपूजा करूण श्वारी तयार करून मातक्यान सिवनगांवचा तलाव पाहून साहा घटका दिवस येता स्वारी वाडास आली. नंतर पावणे दोन पाहारा स्नान करूण, भोजन करूण, बैसले, तों पुन्याकडील डाकचीं पत्रें व विठ्ठल बल्लाळ सुभेदार याजकडील पत्र आलीं तीं वाचलीं नाहींत तसीं च ठेविलीं. मग मातोश्रीकडे जाऊन, येक घटका बोलून, भिकाजी गो-पाळ यास व दारकोजी गायेकवाड यास विडे सईना-धुरंधर यांनीं दिले. दो पाहारा कुच केलें. भिकाजी गोपाळबराबर च होता. पाच घटका

दाखल जालें. प्रांत प्रतावगड. साहेकालीं कारभारी बोलावून, आपण व कारभारी यैसे बसून, दो पाहारां पुन्याकडोन डाकचीं पत्रें आलीं होतीं तीं वाचून पाहिलीं नंतर भिकाजी गोपाळ यास बोलावून वराडप्रांतीचा हिशेब पाच घटका पाहून, छ १३ रोजीं बिडे देववावयाचें ठरलें. मग आपण कारभारी व सईनाधुरंधर यैसे बसून दोन घटका बोलनें जालें. नंतर तेथून साहा कोसावर देरगांव आहे, प्रांत प्रतावगड, तेथें मुकाम नेमला. च्यार घटका रात्रीस दरबार बरकास जाला. छ १३ रोजीं प्रथकालीं कारभारी बोलावून, आपण व कारभारी बसून, भिकाजी गोपाळ यास बिडे दिल्हें व दारकोजी गायेकवाड यांस बिडे देऊन खंडोपंत आणंदराव वैद्य याचा कारकून याजबराबर पुन्याकडे रवाना केला. नंतर दो पाहारा स्नान देवपूजा करून भोजेन करून कूच जालें. साहा घटका दिवस राहता मुकामास आले-यावर वाडांत च होते. दोन घटका रात्रीस कारभारी बोलाऊन, भवानी दादू हि होता, मारनिले याचें च बोलणें दीड प्रहरपर्यंत होत होतें. पावणे दो पाहारा रात्रीस दरबार बरकास जाला. छ १४ रोजीं प्राथकालीं च पुन्याकडोन डाकचीं पत्रें आलीं. नंतर कारभारी बोलाऊन, आपण व सईना धुरंधर व उभयता कारभारी बोलाऊन, पत्रें वाचून दाखविलीं. नंतर बाहेर आलेयावर आपण व बाळाजीपंत कालेकर व व्यंकोजी भोसले नि॥ पीलखाना यैसे बसून, प्रतापगडचा कमावीसदार यास बोलावून रागें भरले कीं, रानांत झाडी फार आहे, तुझ्यानें लावनी प्रगान्याची होत नाहीं त्यास बाळाजीपंत कालेकर यास सांगितलें कीं मारनिले याचा झाडा पाहून कमावीस दुसऱ्यास द्यावी. हें च बोलनें दीड प्रहर दिवस येई तोंपर्यंत होत होतें. मग स्नान देवपूजा करूण, भोजेन करूण, निद्रा केली. साहेकालीं निजून उठले. नंतर आपण व सईनाधुरंधर यैसे बसून भवानी दादू यास बोलाऊन सांगितलें, तुम्ही आपली जोडी जगननाथास रवाना करावी, कारण कीं पुढें जाऊन सरंजाम करावा. याजप्रमाणें बोलून, कृष्णराव माधव यास बोलाऊन, पत्रें लेहून मारनिले याची जोडी रवाणा केली व पुन्याकडे दारकोजी कोरका रवाना केला आहे. पत्रें व जासूदजोडी रवाणा केली. नंतर साहा घटका रात्रीस दरबार बरकास जाला. छ १५ रोजीं च्यार घटका रात्र राहतां मईना-साहिब-सुभा यास ज्वर आला. दरबार जाला नाहीं. छ १६ रोजीं ज्वर होता. दो पाहारा पुन्याकडोन डाकचीं पत्रें आलीं. कारभारी बोलाऊन वाडांत च पत्रें वाचून पाहिलीं. सईनाधुरंधर यांनीं आपल्या तोफा साहा व येत्रा पुढें चींचगडास लाविल्या. मग दरबार जाला नाहीं. प्रहर रात्रीस सईनासाहिब यांनीं फराल केला. छ १७ रोजीं च्यार घटका दिवस राहतां बालापुराहून सलाबतखान याजकडोन मोडनीस्वार पत्रें घेऊन आला. मग कारभारी बोलाऊन पत्रें वाचून पाहिलीं. पत्रीं वर्तमाण कीं पेंढारियांनीं बहुत उपद्रव केला आहे. मग दोन घटका बोलून कारभारी आपले डेऱ्यास आले. प्रहर रात्रीस सईनासाहिब यांनीं ओंगानरचे + + + + केलें. छ १८ रोजीं दोन घटका दिवस [illegible] कारभारी बोलाऊन, आपण व उभयता कारभारी बसून, छ ९ रोजीं [illegible] कडोन जोडी पत्रें घेऊन आले [illegible] पत्रांचीं उत्तरें लेहून व [illegible] बाळाजीपंत [illegible] आहेत [illegible]

पत्रें लेहून, दोघ हुजरे व जासूद जोडी रवाणा केली. दीडप्रहर दिवस येतां दरबार बरकास जाला. भोजेण करूण निद्रा केली. च्यार घटका दिवस राहतां कारभारी बोलाऊन, आपण व सईनाधुरंधर व उभयेता कारभारी व पांडुरंग गनएश व येकोजी भोसले येसे बसून भवानी दादू याचे कटकचे काग(द) वगैरे ताकीदी च्यार घटका दिवसापासोन प्रहर रात्रपर्यंत कागद लेहून दिल्हें. नंतर दरबार बरकास जाला. छ १९ रोजीं च्यार घटका दिवस आल्यानंतर श्नान करून कारभारी हि होते. ब्राह्मणास दक्षना रु॥ वीस व येक गाई दिल्ही. व आनखी दोघ ब्राह्मण होते त्यास पांच पांच रुपये दक्षना दिल्ही. नंतर दीड प्रहर दिवस आल्यानंतर आपण व उभयता कारभारी व पांडुरंग गनएस यैसे बसून न्यापालचा राजा देरसिंग कासीपलीकडे च्यारसें कोस आहे त्यास पत्रें लेहून टेकचंद मिरधा याची जोडी रवाना केली. व हैद्राबादेस नबाबास पत्रें लेहून थईली करून साडनीस्वाराची जोडी रवाणा केली. नंतर कलकत्याच्या फिरंगियास पत्रें लेहून जासूदजोडी रवाणा केली. यावर सवा दो पाहारा भोजेन करूण निद्रा केली. तों दोन घटका दिवस राहतां श्वारी तयार करूण, कारभारीसुधां गावाबाहेर कलकीची झाडी फार आहे तेथें जाऊन, सालकरतां बास तोडविले. नंतर नदींत दोन घटका बसून घटका रात्रीस स्वारी डेऱ्यास आली. यावर कारभारी बोलाऊन बाडांत च मातोश्री व आपण व सईनाधुरंधर व उभयता कारभारी यैसे बसून मातोश्री व सईनाधुरंधर याचा मुकाम, नवा कोसावर चापगडचा मुकाम, नेमला. नंतर च्यार घटका रात्रीस दरबार बरकास जाला. छ २० रोजीं दीड प्रहर दिवस येतां कूच जालें. बराबर बावा उपाध्ये व श्रीमन शास्त्री व नारायन बावा चवफुले वगैरे शावकारमंडली येकोबा नाईक पिंदडी व मुन्हार नाईक गडकरी व गंगाजी नाईक गडकरी व दरगदार बलवंतराव भवानी व चिटणिसाकडील शामराव चीटणीस व फडानिसाकडील कारकूण व खासगीकडील सितारामपंत व मुनसीकडील कारकूण याजप्रमाणें बंदोबस्त करूण दिल्हा. व बराबर पतक रघुनाथराव मुढे व पाटोळे दोघे मिलोन स्वार पाचसे व चवकी पाहाऱ्यास येक कुंपणी गारद्याची दिल्ही वगैरे सईनाधुरंधर याच्या घरपागा वगैरे लोक मिळोन दोन हजार व हाती पंधरा व बानाच्या केऱ्याचे उट पंधरा व येत्राबराबर पाच हजार आहे. दीड प्रहर दिवस आल्यावर कुच जालें. सईनासाहेब गोटाबाहेर घालवून डेऱ्यास आले. यावर भवानी दादू यास बोलावून वस्त्र शेला पागुटें पेठणी व मलमलीचा झगा व पायजमा येकूण साडेतीन सनगे दिल्हीं व घोडी येक दिल्ही. नंतर सदासिव राजाराम यास सेला पागुटें पेठणी दिल्हें, व घोडी येक दिल्ही, व हाती येक कटकांत देवविला, आन त्याचें काम त्यास सांगितलें, नंतर विडे देऊन बियागिरी केली. यावर यात्रेंत त्याना घालून देरगावर आले. च्यार घटका दिवस होता. तेथें नदी आहे. आपण व कारभारी बसून तेथून माघारी. च्यार कोस कवडू पाटील याचा बाद आहे तेथील मुकाम नेमून दरबार बरकास जाला. छ २१ रोजीं प्राथकालीं श्नान देवपूजा करूण भोजेन जालें. सवा प्रहर दिवस येतां नागपूराकडोन डाकचीं पत्रें आलीं. यावर कारभारी बोलाऊन पत्रें वाचून पाहिलीं. दीड प्रह

प्रहर दिवस राहतां मुकाममजकूरीं दाखल जाले. यावर दोन घटका डेऱ्यास बसून, कारभारी बोलावून, आपण व परसोजी भोसले व उभयता कारभारी वगैरे मानकरी येसे तबवावर जाऊन, तोफा दोन बोलाऊन, तळ्यांत गोळे दाहा टाकले. नंतर सांहेंकाळीं श्वारी डेऱ्यास आली. यावर आपण व उभयता कारभारी व परसोजी भोसले यैसे बसून, दोन घटका बोलून, मुकामाचा गाव पांच कोस चांदगढी नेमून, दरबार बरकास जाला. छ २२ च्यार घटका दिवस आल्यानंतर श्नान देवपूजा करूण, भोजेन करूण, पावने दो पाहारा कुच जालें. तों साहा घटका दिवस राहतां मुकाममजकूरीं दाखल जाले. नंतर दोन घटका डेऱ्यास बसून, श्वारी तयार करूण, आपण व उभयेता कारभारी वगैरे मानकरी यैसे तेथून येका कोसावर सिवनगांवचा तलाव आहे तेथें गेले. नंतर तेथें जाऊन दोन घटका तलाव पाहून दोन घटका रात्रीस श्वारी डेऱ्यास आली. यावर आपण व उभयता कारभारी व पांडुरंग गनएश व बापू हाळ्या व बाळाजीपंत काळेकर यांच्या मारफतीनें कमावीसदार आहेत त्यांस प्रगादार कांण्ही भेटावयास आले नाहींत, याजकरीतां म॥रानिले याजवर बहुत रागे भरले होते. मग आपण व कारभारी बसून तेथून साहा कोसावर कसवा पालुदरे याजपलीकडे दो कोसावर तई म्हणून गांव आहे तेथें मुकाम नेमून दरबार बरकास जाला. छ २३ रोजीं प्रथकालीं आपण व परसोजी भोसले यैसे बसून, कारभारी बोलावून, वकरदासिंग सिकाकूर राजदरबारीं यास पत्रें लेहून साडनीस्वार रवाणा केला. नंतर श्नान देवपूजा करूण, भोजेन करुन, दीड प्रहर दिवस येतां कुच जालें. आन आपण चांदगढीचा किला पहावयास गेले. किलेदारांनीं हि बैठक केली होती. तेथें दोन घटका बसून विडे घेऊन कुच केलें. च्यार घटका दिवस राहतां मुकाम मजकुरीं दाखल जाले. नंतर तेथें नदींत आपण व कारभारी बसून च्यार घटका दिवसापासोन च्यार घटका रात्रपरयंत गवई याचें गायेन जालें. नंतर आपण व कारभारी बसून तेथून आठा कोसावर क॥ देवनीचा मुकाम नेमून डेऱ्यास आले. दरबार बरकास जाला. छ २४ रोजीं गावची रयेत फिरयाद आली होती. त्याजवरुहोन मर्जी दिक्ष होती. प्रहर दिवस आल्यानंतर श्नान देवपूजा करूण, भोजेन करून, दीड प्रहर दिवस येतां कुच जालें, तों तीन घटका दिवस राहता मु॥ मजकुरीं दाखल जाले. बालाजीपंत काळेकर याजकडे कमावीस आहे त्यानें डेरे किल्यांत दिल्हे. मग मारानिले याजवर रागे भरले कीं, आवघे लशेकर व घोडी बाहेर राहिलीं आन आम्हीं किल्यांत राहिलों. म्हणोन च्यार घटका रागे भरोन, कारभारी बोलावून, आपण व उभयेता कारभारी बसून, येक प्रहर बोलनें जालें. नंतर दरबार बरकास जाला. छ २५ रोजीं प्रथकालीं कारभारी बोलाऊन मातोश्रीस व मईनाधुरंधर यांस पत्रें लेहून डाक रवाणा केली. नंतर दीड प्रहर दिवस येता श्नान देवपूजा करून सिवा वाला हाजारी यास सांगितलें कीं, तुम्हीं शेहराबाहेर जाऊन जागा पाहून यावें, बाहेर च जाऊन राहूं. मग भोजेन करूण कचेरीस बसले तो मारानिले जागा पाहून आले. यावर त्यास सांगितलें कीं डेरे बाहेर यावेत, मग कारभारी बोलाऊन, आपण व उभयेता कारभारी व पांडुरंग गनएश यैसे नदींत जाऊन,

डोंगयावर बसून प्रहर दिवसापासून दोन घटका रात्रपरयंत खेलत होते मग श्वारी गोटास आली. छ २६ रोजीं च्यार घटका दिवस येतां पुन्याकडोन डाकचीं पत्रें आलीं. नंतर कारभारी बोलाऊन, आरण व उभ येता कारभारी बसून, पत्रें वाचून पाहिलीं. नंतर च्यार घटका खलबत जालें. साहा घटका दिवस आल्यानंतर श्वान देवपूजा करूण, सिवरात्र होती, दों पाहारा श्वारी तयार करूण, आवथ्या देवाचीं दरशेन घेऊन, साहेकालीं श्वारी डेन्यास आली. नंतर श्वान करूण, फराल करूण, निद्रा केली. छ २७ रोजीं प्रथकालीं बालापुराहून सलावतखान याचीं पत्रें आलीं. मग कारभारी बोलावून पत्रें वाचून पाहिलीं. व तेथें नदीया गांव आहे, नदींत मांडव घातला आहे, तेथें च सईपाक करविला होता. प्रहर दिवस येता नदींत जाऊन, श्वान देवपूजा करूण, ज्वर येत होता त्याचें दान केलें. तांवडा बैल येक ब्राह्मणास दिल्हा. त्यास पांच रुा दक्षना दिल्हीं. व येका ब्राह्मणास तावा व येकास पवल व येकास खारवा व मसुरु दिल्हा. पांच ब्राह्मणास पांच रुा दक्षना दिल्ही. नंतर पावने दों पाहारा म्हमद आली व म्हमद मोहोशेम वराडचा कमावीसदार या दोघास रवाणा केले. कारण कीं कलकत्याच्या फिरंगी याजकडील वकिल रतनपूरास येऊन दाखल जाला. याजकरितां या दोघांस पुढें रवाणा केले. मग सवा दों पाहारा भोजेन करूण निद्रा केली. साहा घटका दिवस राहता कारभारी बोलाऊन, आपण व कारभारी वगैरे माणकरी येसे नदींत डोंगयावर बसून, दारूचें तोटे खेळत होते. मग दों घटका रात्रीस बाहेर येऊन नदींत बैसले. नंतर परसोजी भोसले वगैरे माणकरी दाहा वीस येकीकडे व लिंग्यावा गुजर व कृष्णाजी मोहीता वगैरे लोक येकीकडे होऊन, दारूचे तोटे वाटून घेऊन, साहा घटका खेळत होते. मग प्रहर रात्रीस श्वारी डेन्यास आली. छ २८ रोजीं प्रथकालीं कारभारी बोलावून, विठल बल्लाळ सुभेदार याजकडोन डाकचीं पत्रें आलीं होतीं तीं वाचून पाहिलीं. पत्रीं वर्तमान कीं, रा वगाजीपंत भातवेटीचे चवण्या-गडावर होते ते सुटून खालीं येसावा पानतठाणें याजपासीं आला आहे, व तेथील कमावीसदार आहे त्याच्या याच्या भेटी जाल्या. म्हणोन पत्रें आलीं. साहेबास कळावें. प्रहर दिवस येतां रामराव गुजर याजकडे भिवपूर आहे तेथें ते गेले आहेत. त्यांनीं परसोजी भोसले--यास मेजमानी केली म्हणोन मारनिले लोक सुमारीं से दीडसें घेऊन भोजेन करावयास गेले. तेथें जाऊन भोजेन करूण यास वस्त्र परसोजी भोसले व गुज्यावा गुजर व कृष्णाजी मोहिता यास सेला पागोटीं दिल्हीं. प्रहर दिवस येतां नदींत जाऊन श्वान भोजेन करूण निद्रा केली. साहा घटका दिवस राहता नदींत तोफा बोलाऊन, कारभारी व आपण बसून, पुढें पासोडीचे निशान लाऊन, साहेंकाल परयंत गोळ्या मारीत होते व कांहीं वराडपाड्या व पासरपाड्या बोलाऊन मालोमामलतीचा कारभार हि जाला. नंतर साहेंकालीं श्वारी डेन्यास आली व परसोजी भोसले भिवपुरास गेले होते ते हि आले. मग आपण व कारभारी बसून च्यार घटका रात्रपरयंत बोलनें जालें. नंतर दरबार बरकास जाला. छ २९ रोजीं.

---

श्री.

## लेखांक ३२०.

१७१९ फाल्गुन वद्य १२.

पो छ ७ सवाल सु॥ समान तिसैन मया व अलफ.

साहेबाचे सेवेसी आज्ञाधारक मल्हारजी वरदे कृतानेक विज्ञापना ऐसीजे येथील क्षेम ता। छ २५ माहे रमजान प्रों मु॥ लष्कर जागा शिंदी प्रगणे पळसगाव साहेबाचे कृपावलोकनें करून आज्ञा–धारकाचें वर्तमान यथास्थित असे यानंतर ता। छ १९ रमजानीं साहेबाचे सेवेसी विज्ञापना लिहिलीच आहे त्यानंतर ता। छ २० रोजीं सप्तमीस चंद्रपुराहून कुच करून मजल दर मजलीनें वद्य १३ बुधवारीं नागपुरास जावें त्यास राजश्री सेनाधुरंधर यांनीं प्रां चंद्रपूर येथील बंदोवस्त करून वद्य १० सोमवारीं हिंगणघाटास मागाहून येऊन दाखल व्हावें येणें न जालें म्हणोन मु॥–मारीं मुकाम केला आहे वरकड कारखाने आले आहेत मागाहून सडे एणार त्यांची मार्गप्रतिक्षा करीत आहेत नेमल्या मुकामा प्रों जाणें झालें नाहीं उपरांतीक ठरेल त्या प्रों सेवेसी विज्ञापना लिहितों ता। छ २२ रोजीं राजश्री दवलतराव शिंदे याजकडून पत्रें आलीं तीं त्यांचा वकील नेमतराव कायत यानें आणून गुजरलीं तीं उभयता कारभारी व आपण बसून वाचलीं नंतर हिंगणघाटच्या मुकामास आले तेव्हां वाघाची वातनी आली शिवसिंग हजारी भगवंतराव सालतकर कृष्णाजी मुगुटराव व बुरानशाचे चिरंजीव ऐसे पुढें पाठविले कीं तुम्हीं जाऊन वाघाची वातनी मनास आणून वाघरा–लाऊन आम्हांस सांगून पाठवावें त्यानंतर त्यांनीं जाऊन बंदोवस्त करून सांगून पाठविलें कीं वावोलीच्या रानात वाघीण आहे तेथून निघाले उभयता श्री व ठकूबाई व त्यांचीं सून व कन्या बन्याबाई व आपण वाघरा लाविल्या होत्या तेथें येऊन आत हत्ती व सांडणी घालून वाघीण भडकाविली वाघरांत जाऊन पडली पडतांच वरते वासे टाकून वळकट पची केली जीत धरून गोटास आणिली उभयता कारभारी व भवानी माळो व आनंदराव वैद्य होते यांसी दाखविली नंतर पुण्याची डाक आली ते वाचून पाहिली ता। छ २४ रोजीं हैदराबादे–कडून नवाबाकडील सांडनी–स्वार यांची जोडी पत्रें घेऊन आली तीं उभयतां कारभारी व आपण बसून वाचिलीं यांनीं आपलीं पत्रें व रामचंद्र दादो यांच्या पुत्राचीं पत्रें आपल्या सांडनीस्वार याजसमागमें मशारनिलेकडे रवाना केलीं आळसपुरास पाठविलीं राजश्री गुंडो शंकर नागपुराहून एऊन भेटला एक मोहर नजर केली दुसरे दिवशीं वाघ एक मारला साहेबाचे सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

---

श्रीपांडुरंग.

## लेखांक ३२१.

१७२० आषाढ वद्य १२.

पे॥ छ २४ शवाल

सुहूर सन तिसा तिसैन मया व अलफ.

श्रीमंत राजश्री रावसाहेब साहेबाचे सेवेसी.

आज्ञाधारक तुकोजी लक्षोबा व वाळा सावत कृतानेक दंडवत विज्ञापना ता। छ २९ मोहरमपावेतों साहेबाचे कृपावलोकन करून मु॥ नागपूर येथें शेवकाचा वर्तमाण यथास्थीत;असे. यानंतर,राजश्री सेनासाहेब सुभा याजकडील वतमान छ ४ राज-

पावेतों साहेबाचे सेवेसी लिहिले च आहे. यानंतर छ ५ रोजीं नागपुरापासोन च्यव-कोसावर कापसी म्हणून गांव आहे तेथें मु॥ होता तिसरे प्रहरीं—आपण व कृष्णराव व माधव व श्रीधर लक्षुमण ऐसे बोलत बसले होते. साहा घटका दिवस राहाता आपल्याकडील वकील गढे मडम्याकडे जावययाकरितां राजश्री आपाजी रघुनाथ यास रवानकीचे विडे दिले. व बराबर स्वार पंचवीस देववायाची नेमणूक जाली. नंतर सायंकाळीं सईनासाहेब व परसोजी भोसले याचे कुटुंब नागपुरास रवाना केले. साहेबास कळावें. मग आपण व कारभारी बसून तेथून आठा कोसावर माथनी मोहान प्रगाना नजरइन प्रांत रामटेकचा मुकाम नेमला. साहेबास कळावें. छ ६ रोजीं कुच करोन मुकाममजकुरीं दाखल जाले. सायंकाळीं पुण्याकडोन डाकचीं पत्रें आलीं नंतर कारभारी बोलाऊन पत्रें वाचून साहा घटका खलबत जालें. साहेबास कळावें. छ ७ रोजीं मु॥ जाला. गुज्याबा गुजर याजकडे गांव आहे, त्यांनीं मेजमानी केली. तिसरे प्रहरीं विठल बल्लाळ सुभेदार व रघुनाथराव घाटगे यांस पत्रें लेहून सांडणी-स्वार रवाना केले. साहेबास कळावें. साहेकाळीं येसुभाई सिलेदार याचा घोडा बोर बहुत चांगला होता तो आणून सरकारांत लाविला. साहा घटका रात्रीस कारभारी आले. यावर आपण व भवानी कृष्ण व उभयता कारभारी ऐसे बसून च्यार घटका बोलनें जालें. यावर भवानी कृष्ण याचा जावयास फार सख्त आहे म्हणून ते निरोप घेऊन घरास आले. साहेबास कळावें. छ ८ रोजीं मु॥ च होता च्यार घटका दिवस येता कटकाहून फिरं-गियाची पत्रें व किष्णमराज याजकडील पत्रें आलीं होतीं. मग कारभारी बोलाऊन पत्रें वाचून च्यार घटका खलबत जालें. दोप्रहरीं स्वारि तयार करून आपण व सईनाधुरंधर व परसोजी भोंसले व उभयेता कारभारी ऐसे जाऊन सवदागराचे उंट सुमारीं १७२ आले होते ते जाऊन खरीद केले. पु रुो २५००० याचे वीस हजार त्यांत बटा कापला दर सेकडा रुो पंधरा. याप्रमाणें बटा वजा करून सवदा-गरास वीस रुो खर्चास दिले. आन रुपयाचा वाईदा आठा महिन्याचा केला. साहेबास कळावें. चंवऱ्यागडावर राजश्री बगाजीपंत भातवने व राघोपंत चीटणीस होते. त्यास राघोपंतास किलेदारानें सोडून दिले. याचें व याचें बोलनें लागलें. येसोबा याजपासीं आहे. साहेबास कळावें. पांचा घटका रात्रीस कारभारी आले. यावर कचेरीच्या डेऱ्यांत आपण व कारभारी आनंदराव वैद्य याचे कारकून पुण्याकडोन खंडोपंत आला होता, त्यास निरोपाचीं वस्त्रें मेला पागुटें पैठणी व मंदीली येक व किनखावाचे ठाण अर्ध येकूण साडे तीन सनगें दिल्हीं नंतर आपण व कारभारी बसून तेथून दाहा कोसावर का॥भडार म्हणून गांव आहे तेथील मु॥ नेमून दर-बार बरकास जाला. छ ९ रोजीं प्रहर दिवस येतां कुच जालें. पुढें एका कोसा-वर आले तों पुन्याकडोन डाकचीं पत्रें आलीं. यावर आपण व सईनाधुरंधर ऐसे एका अंबारींत बसून पत्रें वाचीत मुकामा-पावेतों आले. गढी आहे. कमाविसदारानें मेजमानी दाणा वगैरे सरंजाम दिल्हा. च्यार घटका रात्रीस कारभारी बोलाऊन आपण व कारभारी बसून तेथून साता कोसावर मौजे कहनी [illegible] मु॥ नेमून दरबार

प्रहरीं आपण व उभयता बंधु व परसोजी भोसले व उभयेता कारभारी ऐसे स्वारी तयार करून किला पाहावया गेले तों जागजागीं पडला आहे. किला पाहून कमावीसदारास डागडुजी करावयास सांगितली. यावर स्वार जाले– तों दोन घटका दिवस राहाता मु॥ मजकुरीं दाखल जाले. यावर च्यार घटका रात्रीस कारभारी बोलाऊन आपण व सईनाधुरंधर व उभयेता कारभारी ऐसे बसून तेथून साता कोसावर चांदगढीचा मु॥ नेमून दरबार बरकास जाला. साहेबास कळावें. छ ११ रोजीं भिकाजी गोपाळ यास विडे देऊन वराड प्रांतांत रवाणा करीत होते. पंरतु दीड प्रहर दिवस आलियावर कुच जाले. तो साहा घटका दिवस राहता मु॥ मजकुरीं दाखल जालियावर पांच घटका रात्रीस कारभारी कृष्णराव यादव व श्रीधर लक्ष्मण आले यावर आपण व उभयता कारभारी व बाळाजीपंत कालेकर ऐसे बसून भिकाजी गोपाळ यास बोलाऊन एक प्रहरपरयंत वराडप्रांतीचा हिसेब पाहिला. नंतर तेथून चवा कोसावर कवडु पा॥ याचा वाद होता. तेथील मु॥ नेमून दरबार बरकास जाला. छ १२ रोजीं दो पाहारा पुण्याकडोन व विठल बलाळ सुभेदार याजकडून डाकचीं पत्रें आलीं तीं वाचलीं नाहींत. तशीं च ठेविलीं. नंतर मातोश्रीकडे जाऊन दोन घटका बोलून कुच जालें. च्यार घटका दिवस राहता मुकामास आले. यावर साहेकाळीं कारभारी बोलाऊन आपण व सईनाधुरंधर व उभयेता कारभारी ऐसे बसून दो पाहारां डाकचीं पत्रें आलीं होतीं तीं वाचून पाहिलीं. यावर भिकाजी गोपाळ यास बोलाऊन पांच घटका रात्रपरयंत वराडप्रांतीचा हिशेब पाहून छ १३ रोजीं विडे देववयाचें ठरलें. मग आपण व कारभारी बसून तेथून पांचा कोसावर देरगांव आहे. प्रांत प्रातावगडचा मु॥ नेमून दरबार बरकास जाला. छ १३ रोजीं प्राथकाळीं कारभारी बोलाऊन आपण व कारभारी बसून दोन घटका बोलून भिकाजी गोपाळ यास विडे देऊन वराडप्रांतांत रवाणा केला. साहेबास कळावें. व दारकोजी शिसमतगार यास विडे देऊन आनंदराव वैद्य याजकडील कारकून खंडोपंत पुण्याकडोन कामाकाजाकरितां आला होता. त्याजबरोबर रवाणा केला. दो पाहारा कुच जाले. साहा घटका दिवस राहाता मु॥ आले. यावर च्यार घटका रात्रीस कारभारी बोलाऊन वाड्यामधें बोलाऊन मोहुर्त पाहात होते. मग दरबार बरकास जाला. छ १४ रोजीं प्राथकाळीं च पुण्याकडोन डाकचीं पत्रें आलियावर कारभारी बोलाऊन पत्रें वाचून पाहिलीं. यावर प्रांत वगडचा कमावीसदार यास बोलाऊन रागें भरले कीं रानांत झाडी फार आहे. प्रगान्याची लावणी जाली नाहीं. हें काय ? मग बाळाजीपंत यांस सांगितलें कीं मारनिले याचा झाडा पाहून कमावीस दुसऱ्यास द्यावी, ऐसें ठरलें. साहेबास कळावें. साहा घटका दिवस राहतां भवानी दादु यास बोलाऊन सांगितलें कीं, तुम्ही आपली जोडी पुढें जगनाथावर रवाणा करावी. कारण कीं सरंजाम करवावा. मग कृष्णराव माधव यास बलाऊन पत्रें लेहून मारनिलेयाची जोडी रवाणा केली नंतर छ १३ रोजीं दारकोजी गायकवाड रवाना केला पत्रें कागदपत्र राहिले होते तें लेहून जासुद जोडी रवाना केली. साहेबास कळावें. छ १६ रोजीं च्यार घटका रात्र राहाता सईनासाहेब यांस ज्वर आला मग दरबार जाला

नाहीं. छ १६ रोजीं ज्वर होता. दो पाहारा पुण्याकडोन डाकचीं पत्रें आलीं. मग कारभारी बोलाऊन वाडांत च पत्रें वाचून पाहिलीं. नंतर सईनाधुरंधर यांनीं आपल्या तोफा साहा व येत्रा पुढें चिंचवडास लाविलें. साहेबास कळावें. छ १७ रोजीं च्यार घटका दिवस राहतां बालापुराहून सलावतखान याचीं पत्रें आलीं मग कारभारी बोलाऊन पत्रें वाचलीं. पत्रीं वर्तमान कीं, पेंढारियांनीं बहुत उपद्रव केला आहे. मग कारभारी आपले डेऱ्यास गेले. प्रहररात्रीस सईनासाहेब यांनीं अंगावर चोरपानी घेतलें. छ १८ रोजीं दोन घटका दिवस येतां कारभारी बोलाऊन वाडांत च आपण व उभयता कारभारी ऐसे बसून छ ८ रोजीं माथनी माहौज्याच्या मुकामीं कृष्णराज याचीं पत्रें आलीं होती त्याचीं उत्तरें लेहून व यंकाजी सखदेव यांस पत्रें लेहून व बालाजीपंत कोण्हेरे यांस पत्रें लेहून दोघे हुजरे व जासूद जोडी रवाणा केली. छ १९ रोजीं स्नान केलें. कारभारी हि होते. ब्राह्मणास येक गाई व वीस रुो दिल्ही व आणखी हि दोघे ब्राह्मण होते त्यांस पांच पांच रुो दक्षणा दिल्ही मग दीड प्रहर दिवस आल्यानंतर आपण व उभयता कारभारी व पांडुरंग ऐसे बसून ज्यापाळचा राजा दरेसिंग कासीपलीकडे दोनसें कोस आहे त्यास पत्रें लेहून एक चंदमिरधायाची जोडी रवाना केली. व हेशनदेसन बाबास पत्र लेहून भयली करून सांडणीस्वार याची जोडी रवाणा केली. नंतर कलकत्याच्या फिरंगियास पत्रें लेहून जासूदजोडी रवाना केली. नंतर अडचा प्राहारा दरबार बरकास जाला. साहेबास कळावें. साहेकाळीं दो घटका रात्रीस कारभारी बोलाऊन आपण व सईनाधुरंधर व उभयता कारभारी ऐसे बसून मातोश्री भिमाबाई व सई यांनीं कुच करून नव कोसावर चिंचगड आहे तेथील मुकाम नेमला. व सईनासाहेब यांनीं

ऐका कोसावर माघारीं जाऊन राहावें ऐसा ठराव होऊन च्यार घटका रात्रीस दरबार बरकास जाला. साहेबास कळावें. छ २० रोजीं दीड प्रहर दिवस आल्यानंतर मातोश्री व सईनाधुरंधर याचें कुच जालें. बराबर बाबा उपाध्ये श्रीमनशास्त्री व नारायन बाबा चवकुळे व येत्रा पांच हजार वगैरे सावकार मंडळी येकोबा नाईक पीदडी व मुल्हार नाईक गडकरी व गंगाजी नाईक गडकरी व दरग दार बळवंतराव भवानी व चिटणिसाकडील शामराव व फडनिसाकडील कारकून व खासगीकडील सितारामपंत व मुनसीकडील कारकून वगैरे लोक रघुनाथराव मुटे पाटोळे ऐसे दोघा मिळोन लोक पांचसे व चवकी पाहाऱ्यास कुंपणी गाऱ्याची एक व सईनाधुरंधर याच्या घरपागा व सिलेदार दोन हजार व हाती अंबारीचे व मुलें मिळोन पंधरा व बानाच्या कैच्याचे उंट सुमारीं १६ याजप्रमाणें सरंजाम देऊन बंदोबस्त केला. साहेबास कळावें. दीड प्रहर दिवस येतां कुच जालें. सईनासाहेब गोटाबाहेर जाऊन मातोश्री व सईनाधुरंधर यांस घालऊन माघारीं डेऱ्यास आले. नंतर भवानी दादु कटकचा सावकार यांस बोलाऊन सांगितलें कीं कांहीं श्वारीखर्चास मदत करावी. मग त्याजला कबूल केलें नंतर त्यास वस्त्र सेला पागुटें पैठणी व मलमलीचा झगा एक व पायजामा एकूण साडेतीन सनगे दिल्ही. व घोडी सरंजामसुधां एक दिल्ही. नंतर सदाशिव राजाराम यांस शेला पागुटें पैठणी व घोडी एक व कटका तयाचे हातीं आहेत त्याजपैकीं हात

एक देविला. आन त्याचें काम त्यास सांगितलें. नंतर विडे देऊन त्याची रवाणकी केली. साहेबास कळावें. मग सईनासाहेब यांनीं कुच करून मुकामास आले. दोन घटका रात्रींस कारभारी बोलाऊन माघारीं पांच कोस कवडु पा। याचा बाद होता तेथील मु॥ नेमून दरबार बरकास जाला. साहेबास कळावें. छ २१ रोजीं सवा प्रहर दिवस येतां नागपुराकडोन डाकचीं पत्रें आलीं. नंतर कारभारी बोलाऊन पत्रें वाचून कुच जालें. तों साहा घटका दिवस राहाता मु॥ मजकुरीं दाखल जाले. यावर तलाव पाहून डेऱ्यास आले. यावर दोन घटका रात्रीस आपण व कारभारी बसून तेथून पांच कोस चादगढीचा मु॥ नेमून दरबार बरकास जाला. साहेबास कळावें. छ २२ रोजीं दो पाहारा कुच जालें. साहा घटका दिवस राहतां मु॥स आले. नंतर दोन घटका रात्रीस आपण व उभयता कारभारी व पांडुरंग व बापू हाळद्या ऐसे बसून बाळाजीपंत काळेकर याच्या मारफतीनें कमावीसदार आहेत. कमावीसदार कोण्ही भेटावयास आला नाहीं. याजकरितां मारनिले याजवर बहुत रागें भरले होते. मग आपण व कारभारी बसून तेथून साहा कोसावर क॥ पालुदरपलीकडे दो कोसावर नई म्हणून गांव आहे तेथील मु॥ नेमून दरबार बरकास जाला. साहेबास कळावें. छ २३ रोजीं प्रथमकाळीं आपण व परसोजी भोसले ऐसे बसून कारभारी बोलाऊन आपण व कारभारी बसून बाकरदसिंग सिकाकुर राजबदरी यास पत्रें लेहून सांडणीस्वार रवाना केला. दीड प्रहर दिवस येता गढी पाहून कूच जालें. तों च्यार घटका दिवस राहाता मुकाममजकुरीं दाखल जालें. नंतर च्यार घटका रात्रीस आपण व कारभारी बसून तेथून आठा कोसावर क॥ पवानीचा मु॥ नेमून दरबार बरकास जाला. छ २४ रोजीं दीड प्रहर दिवस आलियावर कूच जालें तों च्यार घटका दिवस राहता मुकाम मजकुरीं दाखल जाले. राजश्री विठल बलाळ सुभेदार व बेनीसिंग व सखाराम आवधुत या त्रिवर्गांचा एक विचार होऊन राजश्री रघुनाथराव बुंधेले यांनीं आपल्याकडील कोण्ही वकील याच्या लस्करांत पाठवून यांचें व त्याचें बोलणें होऊन बेनीसिंगास तिकडे घेऊन गेले. मारनिले याच्या व त्याच्या भेटी वगैरे बोलणें होऊन बेनीसिंग कटगीच्या मुकामीं आला. मग बेनीसिंग व सखाराम अवधूत ऐसे विठल ×× सुभेदार याजपासीं येऊन सईनासाहिब यास पत्रें लेहून पाठविलीं. साहेबास कळावें. चांदगढीचा मु॥ बाईसाहेब यांचीं पत्रें आलीं जे. छ २० रोजीं स्वार होऊन गेले तों मजल दरमजल बाजारीच्या मुकामीं दाखल जाले. एका दो दिवसा रतनपुरास जातील. साहेबास कळावें. बाळाजीपंत काळेकर यानें डेरे किल्यांत दिल्हे होते. आणि अवघे लशेकर बाहेर होते. याजकरितां मारनिले याजवर दोन घटका रागें भरले होते कीं अवघें लशेकर बाहेर राहिले आन आम्ही किल्यांत राहिलों हें काय म्हणून बोलत होते. छ २५ रोजीं प्रथकाळीं कारभारी बोलाऊन मातोश्रीस पत्रें लेहून डाक रवाणा केली. दीड प्रहर दिवस येता सिवा बाळा हाजारी यास बोलाऊन सांगितलें कीं बाहेर जाऊन डेरे देववायास जागा पाहून यावें. तिसरे प्रहरीं डेरे बाहेर दिल्हे. साहेबास कळावें. छ २६ रोजीं च्यार घटका दिवस येतां पुण्याकडील डाकचीं पत्रें आलीं. नंतर कारभारी बोला-

ऊन पत्रें वाचून पाहिलीं नंतर च्यार घटका खलबत जालें. सिवरात्र होती. देवदर्शनास गेले. साहेबास कळावें. छ २७ रोजीं बाळापुराहून सलाबतखान याचीं पत्रें आलीं नंतर पत्रें वाचून कारभारी बोलाऊन आपण व उभयता कारभारी बसून पत्रें वाचून पाहिलीं. नंतर म्हमद आली व महम मोहोशेम वैरागडचा किलेदार या दोघांस विडे देऊन रवाना केले. कारण कीं कलकत्याच्या फिरंगियाचा वकील नागपूरास येत आहे. तो रतनपुरास येऊन दाखल जाले. म्हणोन या दोघांस पुढें रवाना केले. साहेबास कळावें. व मग त्याचें तांबडे दान दिल्हें, छ २८ रोजीं विठल बलाळ सुभेदार याजकडोन पत्र आलीं तीं वाचून पाहिलीं. पत्रीं वर्तमान कीं बगाजीपंत भातवाल्याचे गडावर होता तो त्यांनीं सोडून दिल्हा. येसोबा पानतवाने याच्या व किलेदाराच्या भेटी जाल्या साहेबास कळावें. तेथून सईनासाहेब सुभा यांनीं रामटेकच्या पानाचे बैल दर १५ रवाना केले आहेत. साहेबास कळावें. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना. जोडी रवाना छ २९ माहे रमजान.

---

श्री.

## लेखांक ३२२.

१७२१ वैशाख वद्य १३

यादि हिशेब जोहार जेठा वाणी याजकडे कर्ज्यैयांचे येणें. रु॥

८०० मुदल रकम शके १७१० फाल्गुन शुं॥ ५.

२०८=॥। व्याज त॥ शके १७११ वैशाख व॥ १३ मु॥ ८। माहे २॥। येकूण कचे २२०० दर सदेप्रे॥ रु॥ २२ वजा बारोत्रा १॥।-। बाकी रु॥.

---

८२०८=॥।

१०० किता मुदल रकम शके १७११ वैशाख व॥ १३.

---

९२०८=॥।

९२८- व्याज नउसे वीस रु॥ पावणे तीन आण्याचे त॥ शके १७१२ वैशाख व॥ १३ मु॥ माहे १२.

---

१००४२८÷ दर सदे रु॥ १ प्रे॥ १००।≈ वजा बारोत्रा सूट ८।- बाकी.

---

१०१२८=॥।

२५८॥ मोहतर्फा खर्च पट्टी वगैरे रु॥

---

१०३७।-॥।

पैकीं वसूल शके १७११ चे सालचे भाडें

घराब॥ वसूल ११६॥=॥ रु॥

बाकी शके १७१२ वैशाख व॥ १३ रु॥

व्याज ता॥ शके १७१३ वैशाख व॥ १३ मु॥ माहे बारा कचे ११०५८।~ दर सद्दे १ प्रें॥ ११०।~॥ वजा बारोत्रा

९८~।

बाकी रु॥

१०२१॥।~॥

१३॥~ खर्च पट्टी

१०३५॥~॥

पै॥ वसूल घराचे भाड्याच॥ ९३८~॥ रु॥

बाकी शके १७१३ वैशाख व॥ १३ रु॥

९४२।~

व्याज ता॥ शके१७१४ वै॥ १०३॥~॥ व॥ १३मुदत माहे १२ ये॥ कचे ११३०८॥ दर सद्देप्रें॥ ११३८~। रु॥ वजा सूट बारोत्रा रु॥९।~॥

बाकी रु॥

१०४६८॥।

२१। खर्चपट्टी

१०६७।॥

पे॥ वसूल १०२॥।॥ रु॥

बाकी शके १७१४ वैशाख व॥ १३ रु.

९६४॥८।

व्याज ता॥ शके १७१५ १०६८~। वैशाख व॥ १३ मु॥ माहे १२ ये॥ कचे ११५७७८~ दर सद्दे प्रें॥ ११५॥।। वजा बारोत्रा सूट ९॥~

बाकी ... ... रु॥

१०७०॥।~॥

१३। मोहतर्फा खर्च

१०८४८~॥

पैकीं वसूल भाड्या व॥ १९५॥ रु॥

बाकी शके १७१५ वैशाख व॥१३

८८८॥~॥ रु॥

व्याज ता॥ शके १७१६ ९७॥~॥ वैशाख व॥ १३ मुदत माहे १२ ये॥ कचे १०६६४॥~ दर सद्दे १ प्रें॥ १०६॥~वजा बारोत्रा ८॥।~।

बाकी रु॥

९८६॥।

खर्चपट्टी वगैरे १३॥

१००८८।

पैकीं वसूल घराचे भाड्याबद्दल रु॥ २०९

बाकी शके १७१६ वैशाख व॥ १३

रु. ७९१८।

५॥ शके १७१६ व्याज ता॥ शके १७१७ वैशाख व॥ १३ ८७

मु॥ माहे १२ ये॥ कचे ९४९२८~ दर सद्दे रु॥ १ प्रे॥ ९४॥।~॥ वजा बारोत्रा सूट ७॥~॥ रु॥

बाकी रु॥

८७८८।

खर्चपट्टी वगैरे १३८

८९१८।

२ पैकीं वसूल २०९ रु॥

बाकी शके १७१७ वैशाख व॥ १३ रु॥
६८२८≋।

व्याज शके १७१८ वैशाख व १३
७५८॥।

मु॥ माहे, बारा ये॥ कर्चे ८१८६।≋
दर सद्दे प्रे॥ रु ८१॥।~॥ वजा
बारोत्रा ६॥।÷
बाकी रुपये
७५७।

खर्च पटी. १२॥≋॥

७६९॥।≋
पैकीं वसूल २०९ रु॥
बाकी शके १७१८ वैशाख व॥ १३
रु॥ ५६०॥।≋॥
६१॥≈।
व्याज ता॥ शके १७१९ वैशाख व॥ १३
मु॥ माहे बारा ये॥ कर्चे ६७३१॥=
रु॥ हा सद्देचे रु॥ प्रे॥, ६७÷
वजा बारोत्रा सूट ५॥~॥
बाकी रु॥

६२२॥~॥
खर्च पटी. १२॥=

६३५॥।।
पैकीं वसूल १८१।. रु॥
बाकी शके १७१९ वैशाख व॥ १३
रु॥ ४५४८॥
व्याज ता॥ शके १७२० वैशाख ४९॥≈
व॥ १३
मु॥ माहे १२ ये॥ कर्चे ५४४८॥÷
दर सद्दे रु॥ १ प्रे॥ ५४।≋॥ रु॥
वजा बारोत्रा सूट ४॥।॥ रु
बाकी रुपये ४९॥≈ रु॥

५०३॥।≈॥
खर्च पटी. १२।

५१६८≋॥
पैकीं वसूल १९२॥।~॥
बाकी वैशाख व॥ १३ शके १७२०
रु॥ ३२३।=
व्याज ता॥ शके १७२१ वैशाख ३५॥~॥
व॥ १३
मु॥ माहे १२ यो कर्चे रु॥ ३८७६
दर सद्दे रु॥ १ प्रे॥ ३८॥।~ रु॥
वजा बारोत्रा सूट ३८≋। रु॥
बाकी रु॥

३५॥~॥ रु॥
३५८॥।≋॥
खर्च पटी वगैरे १०॥

३६९।≋॥
पैकीं वसूल रु॥ १९९
बाकी शके १७२१ वैशाख
व॥ १३ रु॥

१७०।≋॥

श्री.

## लेखांक ३२३.

१७२१.

श्रीमंत दादासाहेब यांची सेवा चिंता विठ्ठल यांणीं एकाग्र ... फडणिसी व दिवाणगिरी करून लढाया मारिल्या.

पस्ती (स) वर्ष बेरोजगार किल्लेकोट वेड्या बंदखाने विष घेऊन बायकामुलें निवर्तलीं घरेंदारें सर्वस्वीं लुटलीं गेलीं. कसाला थोर गुदरला. लोकांचे कर्ज देणें बहुत आहे. सबब मारनिलेचे शेवेवर श्रमिंत महाराज राजश्री बाबासाहेब मेहरवान होऊन अक्षई बक्षीस चिंतो विठ्ठल यांचे पुत्र रा। त्रिंबकराव चिंतामण यास मौजे बोज व मौजे जिन्हाले व बेलगाव व पिंपळोद व गोवे कृष्णातीर पांच गांव इनाम दिल्हे असेत त्याच्या सनदा व पत्रें.

---

श्री.

१७२१.

## लेखांक ३२४.

गांव वगैरेः—

१ मौजे साकेगांव पा। सेवगांव.
१ मौजे चापडगांव पा। सेवगांव.
१ मौजे विसापूर पा। खटाव.
१ मौजे नहपतगांव पा। कोसगांव.
१ मौजे अंबेसल व लोचनगांव.
१ शहर बऱ्हाणपुरीं.
१ अमिनी
१ तहवेलदारी

—

२

१ मौजे भादें पा। सुलतानपुर.
१ मौजे चोपाळें पा। नंदुरबार.
१ मुकासा मौजे कलमाड बु॥ ता। तामसवाडी पा। बाहाळ
१ मौजे दारणासांगवी पा। नासीक येथें मुकासाविशीं.
गोविंदराव विष्णुकडे
१ नंदुरबार.
१ सुलतानपूर.
१ नवापूर.
१ भामेर.
१ थालनेर.
१ सोनगीर.
१ नेरें.

---

श्री.

## लेखांक ३२५.

१७२१ कार्तिक शुद्ध २.

पे॥ छ ८ जमादिलाखर मया तैन व अलफ.

भूपलक्ष्म्याशोभित मित्रजनकार्य-करणे निरंतर-सुप्रसन्न-चित्त राजमान्य राजश्री रावजी स्वामीचे शेवेसीः—

मित्रवर्गांतरगत प्रियतम मित्र बलवंतराव सोनदेव देवस्थळी कृतानेक सां। नमस्कार विनंती येथील क्षेम ता। कार्तिक शु॥ २ द्वितीयेपावेतों मुक्काम जानवले येथे सुखरूप असो. विशेष. चिरंजीव राजश्री राघोपंत दादा तेथें गेलेपासून त्याचीं पत्रें दोन च्यार आलीं परंतु आपलें पत्र न आलें. तेणेंकरून चित्त साकांक्षित आहे. तरी असें न करावें. निरंतर येणाराबरोबर स्वकीय स्वामिगौरवादि आनंदलेखनेंकरून आनंदवीत असावें. हें परंपरागत स्नेहास व आपले चातुर्यादि गुणास उचित असे यानंतर चिरंजीव तेथें आहेत त्याजवर कृपा तीर्थस्वरूप कैलासवासी तात्या आमचे पितृव्यावर कनिष्ट बंधूप्रमाणें करीत होते तदनुरूप असावी. आपण तो करीतच असतील. जो गुण ज्याजमध्यें असतो तो गुण सहजामध्यें उपदेशावाचून घडतो. याविपर्यी श्लोक. संत्यज्य दोषं गुण एव दृष्टीविधेयतामित्य-फलं वचो मे॥ विहाय नीरं सकलोपि हंसः पयः प्रगृण्हा त्युपदेशतः किं॥ सारांश, आपली कृपा चिरंजीवावर असावी आणि आपलें प

...सिरंजिवाचे मनोदयासारखी उभयताची कार्यें श्रीमंत यजमान स्वामीपासून व्हावीं हा हेतु आहे. सुज्ञामती विशेष काय लिहावें ? माघमासीं भेटीस येतों. कळावें. बहुत काय लिहिणें ? कृपा लोभाची वृद्धी निरंतर करावी. हे विनंती. नारळ शाहाळेंव पोफळें पाठविलीं आहेत घेऊन पावालें. याचें उत्तर रवाना करावें. हे विनंति.

---

श्री.

## लेखांक ३२६.

१७२१ कार्तिक व॥.

अर्जदास्त श्रीमंत महाराज साहेबास विनंती.

सेक आमद हाजीर श्रीमंत नि॥ ताफखाना. साहेबीं अर्ज लिहिली कीं पूर्वी नाडवाले जुमाशा फकीर महाराज नाना भाऊ साहेबाचे आमलापासून होते. फकीरबावानें कुवरनकीटी तिची कन्या हाजीफा तिजला बाई बाई म्हणून छदु फरास यांनीं बसावयाचा ठिकाणा केला. पुढें येक दिवसीं त्या बाईची आवरु घेतली. बदकर्म केलें. याची चर्चा जाली तेव्हां दहावीस लोक मिळाले. फकीरबावास म्हणूं लागले कीं तुम्ही फकीर थोराचे पेदे असतांनीं हें तुमचेंजवळ कर्म वर्तलें हें काय ? तेव्हां फकीरबावा बोलले कीं ऐसे कर्म तुम्हीं करूं नये. तेव्हां छदुराम यानें उत्तर केलें कीं तुम्हांस या गोष्टीचे कांहीं बोलावयाचें काम नाहीं. तेव्हां गरीब फकीर उगें राहिले, तेव्हां या मुंढची व छदुरामची दोस्ती दाहावरशें चालली. श्रीमंत महाराज नारायणराव साहेबाचे गरदीचे वेळेस पळून गेले. छदूवर हि गरदी जाली. आतां श्रीमंतानीं तिची तिजला जागा काईम ठेविली आहे. पुढें तिनें फंद केला आहे कीं फकीराची जागा घ्यावी. नाडेवाले फकीरबावा यांची पूर्वीपासून कबरी व मसीदा जागा आहे त्यांत इणें फकीराचे जागेवर धर्मार्थ बावणें ठेविलीं होतीं तीं उलटून फकीराची जागा घ्यावयास उभी राहिली आहे. म्हणते कीं माझे नवऱ्याची दोशस्तीन होती ती माझीच जागा याबर महाराजास अर्ज आहे कीं, इचे नवऱ्यानें दाहा मिळींनी केल्या त्या मिळून लटकें कुफराणें करून फकीरबावाची जागा घ्यावयास उभ्या राहिल्या तर देवें कीं काय ? महाराजास इचे अर्ज आपण धर्मा आहांत यांतले अर्थ ध्यानास आणावे मग ज्या मार्गे लावले त्या मार्गे चालूं. या गोष्टीचा साक्ष पुरऊन देऊं. न देऊं तर सरकारचा गुनेगार.

---

श्री.

## लेखांक ३२७.

१७२१ कार्तिक व॥ १४.

जबानी खेमचंद व॥ नारायणदास दाळवाले परदेशी पेठ गणेश शहर पुणें सु॥ मया तैन व अलफ. लेहून दिल्ही जबानी ऐसजे पेठ मजकुरीं आम्हीं जागा खरेदी केली. त्यांत आम्ही नांदत आहों. हाली ती जागा छदुभाई फरास याची बायको आपली ऐसें बोलोन सरकारांत विनंती करून आम्हास सरकारातून ढलाईताकडून घराबाहेर काढून दिल्हें. त्यास ही जागा रत्नोजी फरास नी॥ सरकार याची त्याजपासून खुशरजावंदीनें आम्हीं घेतली ते समयीं जाग्याविशीं रत्नोजी फरास याचे नावें सरकारचें पत्र आहे. ते पाहोन अडीचशें रुपये देऊन खरेदपत्र करून घेतलें तें पेठकरी यास दाखवून चावडी पेठ मजकू-

रीची येथें नेऊन पत्र चावडीचे पत्र करून घेतलें ते समयीं चौकशी पेठ चावडी येथून करून आमचे पत्र करून दिल्हें व कोतवालचावडीस खरेदीपत्र व चावडीचे पत्र दाखाविलें त्याजवरून त्यांनींही चौकशी करून मोजणी करून पत्र करून सीरस्ता-प्रे॥ कबज पत्राचे रुपये व कारकुनी घेऊन भोगवटी यास पत्रें करून दिल्हे आहेत तीं बाजिन्नस स्वामीनीं पाहोन माझी जागा घर नांदतें माझें देवावें येविशीं आज्ञा जाहली पाहिजे रत्नोजी जवळ जागा खरेदी करून घेतली तो ही येथें आहे चौकशी येविशीं जाहली पाहिजे सरकारांतून रत्नोजीस खोटा असें करून यावें म्हणजे स्वामी आज्ञा करतील त्यास मान्य आहे सदरहू लि॥ प्रे॥ खरें करून देईन हें लिहून दिल्हे. सई मी॥ कार्तिक शु॥ १४ बी॥ जनार्दन धोंडदेव कारकून दिम्मत मल्हार बाजी हुजूर गार्दी सरकार.

---

श्री.

## लेखांक ३२८.

सिका . असल व॥ नकल.

आज्ञा पत्र राजश्री पंतप्रधान ता॥ मोकदम मौजे वागन ता॥ करेपठार प्रा॥ पुणें सु॥ इहीदे मयातैन व अलफ. मौजे मजकूर येथील मोकासा चिंतो विठल याजकडे सर लस्कर याजकडून इनाम चालत होता त्याची जफ्ती पेशजी सरकारांतून जाहली आहे. ते हाली मोकली करून चिंतो विठल मृत्यु पावले त्याचे पुत्र राजश्री त्रिंबकराव चिंतामण याजवर मौजे मजकूरचा मोकासा ईनाम मशारनिलेकडे पेशजीप्रमाणें चालवावयाची आज्ञा.

---

श्री.

## लेखांक ३२९.

१७२२.

विनंति उपरि. श्रमिंतास चिठी लिहिली आहे ते पाहून दाखवून मजला काय आज्ञा करितात ते नंतर कळविणें. खासगत श्रीमंताचे माहाल आहेत तेथें गैरवाजवी लोकांची खेडीं व असाम्या जप्त आहेत त्या सोडल्यास किती संकट पडते आणि अन्न खावयास नाहीं येथें चित्तास येईल तें म्हणावें तेव्हां बाकी कोणती काय बोलावें? बोलावें तरी अबरू गमवावी यास्तव अगोदर मजला निरोप होय असें करणें हे विनंति.

---

श्री.

## लेखांक ३३०.

१७२२.

मौजे ढोकरी परगणे अकोले हा गांव चिंतो विठल यांसि इनाम दरोबस्त कवीजंग यांणीं पेशजी दिल्हा आहे. त्या गांवीं अंबराई लाऊन वगैरे कारकीर्द केली आहे. तेथील अमल चिंतो विठल यांचे पुत्र रा॥ त्रिंबकराव चिंतामण याजकडे सुदामतप्रो॥ देत जाणें म्हणोन पेशजी मुकदम व जमीदार यांस ताकीद केली असतां अमल यथास्थित चालत नाहीं म्हणोन हुजूर विदित जालें. त्याजवरून हें आज्ञापत्र सादर केलें असे तरी मौजे मा॥रचे मुकदम व जमीदार व कवीजंग वगैरे कोणी दिकत करील त्यास निक्षुन ताकीद करून अमल बसऊन देणें मौजे मा॥रची बेबाद रा॥ त्रिंबकराव चिंतामण याजकडे सुरळीत चाले तें करणें पुन्हा बोभाट येऊं न देणें म्हणोन पत्र किल्ले नगर येथील मामलेदार

नि॥ सिंदे याचे नांवें येक. मौजे हुकेरी पे॥ अकोलें हा गांव चिंतो विठल यासी इनाम, दरोबस्त पेशजी कवीजंग यांणीं दिल्हा आहे त्या गांवीं अंबराई लाऊन वगैरे कारकीर्द केली आहे तेथील अमल चिंतो विठल यांचे पुत्र रे॥ त्रिंबकराव चिंतामण याजकडे देत जाणें म्हणोन पेशजी आज्ञा केली असतां माारनिलेकडे अमल सुरळीत चालत नाहीं म्हणोन विदित जालें त्याजवरोन हे आज्ञापत्र सादर केलें असे तरी मौजे मजकूरचा अमल सुदामतप्रे॥ सुरळीत रे॥ त्रिंबकराव चिंतामण याजकडे देणें. पुन्हां बोभाट येऊं न देणें ह्मणोन पत्र किलेनगर येथील मामलेदार नि॥ सिंदे यांचे नावें १ मौजे ढोकरी पो अकोले हा गांव चिंतो विठल यासी ईनाम १ दरोबस्त पेशजी कवीजंग यांणीं दिल्हा आहे त्या गांवी आंबराई लाऊन वगैरे कीर्द केली आहे तेथील अंमल चिंतो विठल याचे पुत्र रो त्रिंबकराव चिंतामण याजकडे देत जाणे म्हणोन पेशजी आज्ञा केली असतां मााारनिलेकडे अमल सुरळित चालत नाहीं म्हणोन विदीत जाले त्याजवरून हे आज्ञापत्र सादर केलें असे. तरी मौजे माारचा अलूम सुदामतप्रो सुरळीत त्रिंबकराव चिंतामण याजकडे देणें. पुन्हा बोभाट येऊं न देणें म्हणोन मुलायास पत्र सदरहू अन्वये जमीदार मौजे माारचे यास पत्र १ कवीजंग सवाने मोगल खालावीजंग बाहादर याचें नांवे १मौजे माार तुमचे तिर्थरूपांनीं चिंतो विठल यास दरोबस्त गाव ईनाम दिल्हा आहे तेथील अंमल चिंतो विठल याचे पुत्र रो त्रिंबकराव चिंतामण याजकडे चालवणें येविसी का॥दार व मोकदम व जमीदार यांस तुम्हीं आपलीं पत्रें देऊन निक्षूण ताकीद करून मौजे माार दरोबस्त माारनिलेकडे सुरळीत चालवणें. बोभाट फिरोन येऊं न देणें पत्र १

मौजे माार चिंतो विठल यासी ईनाम दरोबस्त पेशजी कवीजंग यांणीं दिल्हा आहे तेथें आंबराई वगैरे कीर्द केली आहे. तेथील अमल चिंतो विठल याचे पुत्र रो त्रिंबकराव चिंतामण याजकडे चालवावयाविसी आज्ञा मुकदम वगैरे यास करून हें पत्र तुम्हास लिो असे. तरी किलेनगर येथील तुम्ही आपले कमावीसदारास निक्षूण ताकीद करून मौजे माारचा अंमल दरोबस्त इनाम त्रिंबकराव चिंतामण याजकडे सुरळीत चालवणें. फिरोन बोभाट येऊं न देणें. म्हणोन अलीज्या बाहादर सिंदे यांस

५ ——

श्री.

## लेखांक ३३१.

१७२२.

राजश्री रावजी खासगिवाले गोसावी यांसि

छ. अखंडित–लक्ष्मी–अलंकृत राजमान्य श्रो माधवराव न॥ देशमुख प॥ नेवासे दंडवत विनंति उपरी येथील कुशल ता॥ छ २१ रजब पावेतों मुक्काम पुणें येथें यथास्थित असो विशेष राजश्री त्रिंबकराव चिंतामण यांनीं सरकारचीं पत्रें तुमचे नांवे आणलीं आहेत त्याप्रमाणें मशारनिल्हेचे कामा–काजाचा बंदोबस्त करून घ्यावा पुन्हा बोभाट न यावा बहुत काय लिहिणें लोभ करावा हे विनंति.

श्री.

## लेखांक ३३२.

१७२२.

साहेबाचे शेवेसी. कुसाजी पानसोडे पेठ शुक्रवार पुणें अर्ज विज्ञापना कीं सखाराम गणेश आंबडेकर निा लछीराम बखतनाल यांणें पेठ बुधवारचे दुकान घर दरोबस्त भिवभट शार्दूल याज पाशीं गाहाण ठेऊन ऐवज घेतला. त्यास भिवभटजीस ऐवजाची गरज लागली सबब भटजी व सखाराम गणेश आम्हापाशीं येऊन पेशजीचे भटजी-पाशील गाहाणखत व भटजीचे नांवें दुसरा कागद करून दोन्ही कागद आम्हांपाशीं ठेऊन माझा ऐवज नेला त्यास हालीं घ-टाई करून माझा ऐवज मजला देत नाहींत ना घर गाहाण ठेविल्याप्रों माझे स्वाधीन करीत नाहीं. घराच्या भाड्याचा ऐवज येतो तो देखील दुसरीकडे नेतात. मी गरीब माणूस. म्या लोकाचा ऐवज घेऊन याजला दिल्हा. त्याचे व्याजें देतां मी बु-डालों. इा शके १७१८ चे चैत्र शुा १ ताा शके १७२१ श्रावणमास त्यास मज-वर स्वाम कृपाळू होऊन सखाराम गणेश आंबडेकर यास घटाई करितो आणि शिंदे होळकर याची हिमायेत दाखवितो. त्यास शिंदे यांचे लष्करांत ये विषयीं फड पडला तेथें माकुल होऊन आतां आंग-बाकंचे माझ्या ऐवजाचा निकाल करून देत नाहीं ना गाहाण हि स्वाधीन करीत नाहीं. त्यास देवेंषण्र धनी समर्थ आहेत हे विज्ञापना.

---

श्रीगजानन.

## लेखांक ३३३.

१७२२.

यादी

नाशिक पैकीं वाडे वगैरे

१ पंचवटीचा वाडा

१ पाा दिंडोरी येथील

१ परगणें हरष येथील वेलगांवचे कुळकर्ण

१ आंबराई उन्हाळ्याची

१ आंबराई उन्हाळ्याची

१ पाटिलकी चहेडीची

१ मोकासा मौज दुगांव

१ आंबडीचे इनाम.

---

पुण्या पैकीं, वाडे वगैरे

१ पागेचा वाडा व गाडीखाना

१ पुला वरील वाडा.

---

२

रामाजी जनार्दन कारकून त्याजपासून हिशोब वगैरे पुसावयाचे सबब त्याची घरें वगैरे आहेत त्यास मारानिले गैरहजर जाले त्यास त्यांची घरें वगैरे आहेत तेथें अंमल आमचा असावा.

---

श्री.

## लेखांक ३३४.

१७२२.

यादि खा राजश्री त्रिंबकराव चिता-यण सु॥ इहीदे मया तेन व अलफ. इनाम-गांव व वतनाची मोकलीक करून घेतली बद्दल खर्च. को

४००० वे॥संपन राजश्री अपासीध अग्नीहोत्री.

४००० ऐन यावयाचे ते दिल्हे.

० शिवाय वर्षासन मौजे अहिरे येथें करार करून देण्याचा करार ठरला आहे. दरसाल रुपये. २००

---

४०००

२००० वे॥ राजश्री बाळशास्त्री बावा यास.

१५०० राजश्री चिंतो वामन.

७०० राजश्री भाऊ सरंजामी दाखले पाहावयासंबंधीवगैरे खासा वगैरे कारकून मिळोन.

१५०० नि॥ चिटणिस.

१००० खासा.

५०० तरेखसमंधी व लिहीण्यासमंधी.

---

१५००

१३०० नि॥ मजमदार खासा व कारकून.

२०००नि॥ फडणीस खासा व कारकून.

३००० अंतस्त वि॥ अग्नीहोत्री.

१५० नि॥ दप्तरदार पत्रें बार करावयासमंधी.

५०० शागीर्द पेशा नि॥श्रीमंत स्वामी.

---

श्री.

लेखांक ३२५.

१७२२ वैशाख शुद्ध ५.

ती॥ राजश्री रावजी स्वामी वडिलांचे सेवेसीः—

अपत्य गोपाल धोंडाजी शिरसा नमस्कार विनंति विज्ञापना. येथील कुशल ता वैशाख शुा ५ पो वडिलांचे आशिर्वादें सुखरूप असो. विशेष. वडिलांकडून बहुत दिवस जाहले पत्र येऊन वर्तमान कळत नाहीं. असो. रा वेंकाजी जयराम याजकडे गर्जीच्या संताचे वगैरे काम सांगितलें त्यास फार उत्तम केलें हालीं श्रीमंताचे स्वारी बरोबर रा० भिकाजीपंत आप्पा व माधोराव आले यांणीं आक्षेप केला आहे त्यास रा माधवराव भय्या राजे बाहाद्दर यांचें पत्र आन्या धुमाळ याचे नांवें आल्यास बंदोबस्त होईल. दुसरें आपण आम्हांस लिहिलें कीं आमचे हातची बाकी सर कानगोई संबंधी बागलाण प्रांतीची वसूल करून घ्यावी म्हणून लिा त्यांस पदच्युत जाहल्यास कोणी उभे राहूं देत नाहीं. आपण वडील आहांत सर्व आपल्या ध्यानांत आहे परंतु बंदोबस्त राखावा. भिकाजी मोरेश्वर यार्चीं बोलणीं बहुत जाहलीं. भेटीनंतर सविस्तर निवेदन होईल. पत्रीं विस्तारें कोठवर लिहूं ? समक्ष भेटीस लवकरच येतो. कळावें बहुत काय लिहिणें ? लोभ करावा हे विज्ञापना.

---

श्रीम्हाळसाकांत.

लेखांक ३२६.

१७२२ ज्येष्ट शुद्ध २.

राजश्री त्रिंबकराव चिंतामण गोसावी यांसी

छ अखंडित-लक्ष्मी-अलंकृत-राजमान्य श्री यशवंतराव होळकर दंडवत विनंती उपरी येथिल कुशल जाणोन स्वकिय लिहित जावें विशेष

आले त्यांनीं तुम्हा कडील स्नेह घरोब्याचे रितीस जमण्याचे प्रकार सांगितले. त्यावरून बहुत संतोष जाहाला चिरंजीव राजश्री खंडेराव तेथें आहेत त्याजवर श्रीमंतांनीं लोभ करून सर्व प्रकारें संरक्षण केलें पुढेंही बंदोवस्त करुन देऊन सरकारचाकरी घडे तें करणार तेच आहेत तुम्हीं प्रसंगीं आहा विनंती करून दरबारांत दौलतीचा बंदोवस्त सत्वर होऊन सरकारचाकरी घडे तें करावें सविस्तरें मानिले बोलतील रा॥ छ १५ मोहरम सु॥ इहिद्दे मया तैन व अलफ बहुत काय लिहिणें हे विनंति.

॥ श्री ॥
म्हाळसाकांत चरणी तत्पर
मल्हारजीसुत खंडेरावहोळकर.

श्री
मोर्तब
सुद

---

श्री.

## लेखांक ३३७.

१७२२ आषाढ वद्य ३.

मयराळजी बीन सिवापा वाणी होणराव कोठवळे नि॥ श्रीमंत मातुश्री आनंदीबाई साहेब याचे तीर्थस्वरूप सिवापाकडे कर्ज लक्ष्मण भट दिवेकर याचें येणें रुपये बारारों, त्याचे खत भास्कर माहादेव काणीटकर याचें नांवाचे शके १६९४ चे सालीं करून घेतलें. त्यास ऐवज याचे घर कसबे पुणें पेठ रविवारांत पुरातन नांदतें कवलारी. त्याची हमशाई. उत्तरेस दामोदरदास कोठारी. व दक्षनेस भिवजी कोठवळे. पश्चिमेस रस्ता. व पूर्वेस + + + + मुदत येका वर्शाची व्याज दरमहा दर शेकडा एकोत्राप्रों अन्वयें खत लिहून घेतलें यावर मुदतीवर व्याजसुधा रुपयाचा फडच्या करून यावा आन आपलें घर सोडवून घ्यावें तों आह्मी तिर्थरूपसुधां श्रीमंतसाहेबाचे स्वारीसमागमें पुणियांतून गेलों पाठीमागें गर्दी जाली. वस्तभाव लुटली गेली. मुल लेकर गरीबतारीत येऊन परागदा जाहलीं. ते अवांतर जागीं जाऊन राहिली. श्रीमंत बाईसाहेबाची स्वारी धारेकडून सुरतेस आली. आवया तवया भोगिला तो अकस्मात तिर्थरूप सिवापा निवर्तले उपरातीक कालेकरून साहेब पुणियास आले. ते समयीं सेवक हि चाकरीस धणियाच्या पायापासीं आला. दिवेकर याजपासीं जाऊन त्यास मतलें कीं ई॥पासून घराचें भाडें काय वसूल जाहलें तें आह्मांस समजावणें ऐसें बोलणें दोन तीन महिने केलें परंतु ते कांहीं आम्हांस समजाविना. मग कृष्णाजी परड हुजरे नि॥ सरकार याचे वि॥ साहेबास अर्ज केला तो धणियांनीं मनास आणून दिवेकर यास हुजूर बोलाऊन सांगितल कीं याचा हिसोब ई॥पासून घराचें भाडें काय वसूल जालें हें सरकारांत समजावणें त्याजवरून दिवेकर यांणीं आपला हिसोब आणून सरकारांत समजाविला. त्याची चवकसी करता घराचें भाड्याचे रुपये ४१०८ च्यार हजार एकसे आठ शके १७२० चे सालापावेतों वसूल जाहलें. त्याजपैकीं घराकडे खर्च रुो ३२५॥- तिनसे पंचवीस नऊ आणे जाहले बाकी ३७८२॥≈ तीन हजार सातसे बयासी रुो सात आणे निकालस पावती घरापैकीं दिवेकरास जाहली. येसें साहेबाचें ध्यानास येतांच होणराव याचे घरांतील भाडेकरी महंमद हुसेन ताजभाई व विश्राम इसमायल यहुरियास सरकारांत बोलाऊण आ

णून ताकीद केली कीं दिवेकर यास भाडें न देणें. तवा बहुरी यानें अर्ज केला कीं दिवेकर यांणीं आम्हापासून भाडेचिठी सिवराम नारायण आठवले या घराची यास लिहून देविली आहे. साहेबांनीं त्यास सांगावें त्याजवरून आठवले यास हुजूर बोलाऊन सांगितलें कीं बहुरियास या घराचे भाड्यावद्दल तगादा तुम्ही आमचा परवाणीविगर न करणें–आयसें सांगून दिवेकर आठवले यांस सांगितले कीं तुम्ही सरकारांत येऊन चवघे सावकार मिळून याची पंचाईत करणें त्यास पाच सहा महिने पंचावीत सरकारांत होत होती. आयसें असतां साहेवाणीं आपलेसमक्ष चवघे सावकार व दिवेकर व आठवले यास विचारलें कीं मुदल रुपये वारासें सावकाराचें कुळाकडे येणें–कुळाकडून पावती तीन हजार सातस व्यायेसी रुो सात आणे वसूल सावकारास पावला असता सावकार कुळाचें घर सोडीत नाहीं त्यास तुम्ही पंचावीत मतें सांगावें. तव चवघांनीं साहिवास समजाविलें कीं कुळाकडे सावकाराचा कांहीं दावा राहिला नाहीं. कुळाचें घर व खत व बहुरियाची भाडेचिटी आयेसी सावकारांणीं यावी. आयेसें चवघांणीं साहिवास समजाविलें तें समई दिवेकर व आठवले यांस सांगितलें कीं चवघांचें मतें आयसें ठरले. तुम्ही या घराचें खत व भाडेचिठी बहुरियाची बहुरियास देणें तें समई बहूरी याजकडे घराचें भाडें आटकाविलें होतें तें बहुरियास आठवले यांणीं सांगितलें कीं तुम्ही मयराळ बीन सिवापा होणराव यास घराचें भाडें सरकारांतून तुम्हांस ताकीद देऊन आटकाविलें त्या दिवसापासून मारानिलेस देणें तुम्हाकडे आमचा कांहीं ताबा राहिला नाहीं. तुमची भाडेचिठी या घरावद्दल आम्हाजवळ आहे ती आम्ही तुम्हांस देऊं. आयेसें सरकारांत साहेबाचे हुजूर दिवेकर व आठवले यांणीं प्रमाण करून गेले कीं मयराळ होणराव याच्या तिर्थरूपाचें नांवचें होतें त्याचे त्यास देतों व बहुरियाची भाडेचिठी बहुरियास देतों. येणेंप्रमाणें मयराळ बीन सिवापा वाणी होणराव याचा व दिवेकर याचा फडच्या करून घेऊन याचें घर याचें हवाला केलें. पुढें कांहीं दावा या घरावर दिवेकर याचे कर्जाचा व सरकारचे नजरेचा राहिला नाहीं. मयराळ बीन सिवापा यांणीं आपलें घर स्वसंतोसें अनभवावें. भाडेचिठी गयेविले पडली. सवव आठवले यांणीं बहुरियास फारखती लिहून दिली. मिती आशाड व॥ ३ शके १७२२ रुद्रनाम संवत्सरे हस्ताक्षेर भिकाजी सिवराम आठवले.

---

श्री.

## लेखांक ३३८.

१७२२ श्रावण वद्य २.

अखंडितलक्ष्मीअलंकृतराजमान्य राजश्री त्रिंबकराव चिंतामण गोसावी यांसि:—

सेवक अमृतराव रघुनाथ नमस्कार सु॥ इहिदे मया तैन व अलफ. तुम्हीं पत्र पाठविलें तें प्रविष्ट जाहालें. निष्ठेचा मजकूर लिहिला तो विदित जाहाला. ऐशास तुम्हीं पहिल्यापासून पदरचेच आहां. तेथें चिरंजीव राजश्री बाबासाहेब याजवळ लागू होऊन राहाणें. राजश्री विठ्ठल बल्लाळ यांसहि एका दोहों रोजीं तेथें पाठविलें

जाईल. जाणिजे. छ १४ रबिलावल. बहुत काय लिहिणें ?

श्री
लेखन

श्री.

## लेखांक ३३९.

१७२२ मार्गशीर्ष शुद्ध ८.

राजश्री कासीराव होळकर गोसावी यांसि

छ सकलगुणालंकरणअखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य स्ने॥ बाजीराव रघुनाथ प्रधान आशिर्वाद उपरी येथील कुशल जाणून स्वाकिय कुशल लिहित जाणें विशेष प्रांत खानदेश येथील कानगोईचें वतन खंडो गंभीरराव व चिंतो विठल यांचे त्याची जंपती पेशजी सरकारांत जाहाली आहे त्यास चिंतो विठ्ठल आपले तीर्थरूप मृत्यु पावले ऐशास सदरहू वतनाची जफ्ती मोकळी करून वतन आपल्याकडे चालविलें पाहिजे ह्मणोन चिंतो विठल यांचे पुत्र राजश्री त्रिंबकराव चिंतामण यांणीं हुजूर विनंती केली त्याजवरून प्रांतमजकुराचे कानगोईचे वतन पों चिंतो विठ्ठल यांचे हिश्शाची जफ्ती हाली मोकळी करून चिंतो विठ्ठल मृत्यु पावले त्यांचे पुत्र त्रिंबकराव चिंतामण याजवर रुपाळू होऊन प्रांत मा॥ येथील कानगोईचे वतन यांचे यांजकड चालवण्याची आज्ञा करून हें पत्र तुह्मास लिहिलें असे तरी तुम्हांकडे प्रांत-मजकुर-पैकीं माहाल आहेत तेथील कमावीसदारांस व जमिनदारांस ताकीद करून लिहिल्याअन्वयें वतन व हकरुसूम इनाम व मानपान कानूकायेदसुध्धा चिंतो विठ्ठल याजकडे पेशजी सुदामत चालत आल्या-प्रों त्रिंबकराव चिंतामण यांजकडे चालवणें व कानगोईचे वतनाचा शिरस्ता कागद-पत्राचा पूर्वीं मोंगलाई अमलांतील असेल त्याप्रमाणें कागदपत्र मारनिल्हेचें दफ्तरीं पेशजी सनदेप्रमाणें देवीत जाणें जाणिजे छ ६ रजब सु॥ इहिदे मया तैन व अलफ बहुत काय लिहिणें हे आशिर्वाद.

श्री.

## लेखांक ३४०.

१७२२ मार्गशीर्ष वद्य ४.

राजश्री बखत-रामभाई आगरवाले गोसावी यांसि

छअखंडित-लक्ष्मी-अलंकृत-राजमान्य श्रे॥ गोपाळराव त्र्यंबक राजेबहादर आशिर्वाद उपरि येथील कुशल जाणोन स्वकिय कुशल लिहित गेलें पाहिजे विशेष बहुत दिवस जाले उम्हा कडुन पत्र येउन वर्तमान कळत नाहीं त्यास असें न करावें ता हमेशा पत्र पाठऊन स्व-कुशल-वर्तमान कळवित जावें तुमची बडती ऐकोन बहुत संतोष आहे ऐशास राजश्री त्रिंबकराव चिंतामण सर-कानगोइचें वतन प्रांतमजकुरीं आहे त्यास राजश्री सुभेदार यांजकडून सुभा आपलेकडे आहे हें जाणोन सर-कानगो याचें वतना बंदोबस्त माहाला-निहाय बितपसिल

१ सरकार बिजागडचे खरगोण वगैरे
एा महाल.
एा कलमें ३२
१ पो आडावद.

१ पो सुलतानपुर.
१ नंदुरबार.
१ पो उत्राण.
१ पो गाळणें.
१ पो थालनेर.
१ पो आंबेपोतडे
१ दुमालेगांव फुट जागिर तुमचे यजमानाचे सरकारांत आहेत.
ते कलमें.

|| श्री ||
उमाकां
त चरणी तत्पर
|| गोपाळराव त्रींब
क राजेबाहदर
पीरंतर.

एकूण सात महाल सरकार बिज्यागड खरगोण बत्तीशी महाल तेहतीस व फुट जागिरीचें गांव सिवाय सदरहू येथील हकरुसूम दर सद्दे रु॥ १ व गाव-गन्ना सालिना दर गावीं रुपया १ जकात भुसार व किराणा व कापड सुध्धा व मोहतर्फा व शेव-संबजी वगैरे व परगणे सुलतान-पूर येथील हवालदारी-बाब येणें-प्रों आहे ये विशई यांजकडून तुम्हा-कडे कारकून येतील ते तुम्हांस वर्तमान वतनाचें निवेदन करतील त्याप्रों बंदोबस्त करुन देवावायाचे वत्नाचें कामकाज सुरळीत चालऊन हक्करुसूम पावित जावे रा॥ छ १७ रजब बहुत काय लेहिणें हा आशिर्वाद.

मोर्तब
सुद.

---

श्री.

## लेखांक ३४१.

१७२२ पौष.

राजश्रीं त्र्यंबक रावजी गोसावी यांसिः— स्नो विठलराव होळकर दंडवत. विनंति. उपरि तुम्हीं हरीपंतांचे नांवें चिठी पाठविली कीं अकरा गोण्य। गोविंदा बराट याच्या हवाला करणें. न केल्यास कामास पडणार नाहीं म्हणून लिहिलें त्यास गोण्यास आज तीन रोज जाले तेव्हाच अशी निक्षून चिठी पाठविली असती तर गोण्या माघारा दिल्हे असत्या. तुम्हां खेरीज दुसरा विच्यार नाहीं. परंतु काल सगळा वीळ वाट पाहिली. कोणीच न आलें तेव्हां लोकांच्या गवगव्यामुळें गोण्या फोडून वाटून दिल्हे. तुम्हांस कळावें. आतां जैसें तुम्हांस कळेल तैसी रावसाहेबांस विनंति करून सांगावें. पूर्वी आम्हांस असेंच कळलें असतें तर गोण्या न फोडतों. दुसरें मुलास देवी निघाल्या आहेत. तर कनाता दोन जरूर पाठवणें. बहुत काय लिहिणें ?*हे विनंति.

---

श्री.

## लेखांक ३४२.

१७२२ पौष वद्य ४.

अजू स्वारी राजश्री बळवंतराव नागनाथ सुभेदार ता॥ पद्दा ता॥ मोकदम मौजे निऱ्हाळे ता॥ देपूर पो संगमनेर सुमा ईहिदे मया तेन व अलफ. मौजे मजकूर येथील कुलकर्ण चिंतो विठल याचे आहे त्याची जप्ती पेशजीं सरकारांतून होऊन तालुके मजकुराकडे सांगितली आहे. हालीं मोकळीं करून चिंतो विठल मृत्यु पावले त्याचे पुत्र राजश्री त्रिंबकराव चिंतामण याजकडे मौजे मजकूरचे कुळकर्ण पेशजी प्रों मारनिलेकडे चालवावयाची हुजुरून छ २६ जमादिलाखरची सनद सादर जाहाली त्याजवरून हे चिठी सादर केली

*येथन अक्षर विठोजी होळकर यांचें खुद

असे तरी मौजे मजकूरचे कुळकर्ण मारनिले अनुभवितील. कुळकर्णाचे गुमस्तगिरीचे कामावर बापूजी शामराज यांस मारनिलेनीं पाठविले आहेत. कुळकर्णाचे कामकाज करितील. जाणिजे. छ १८ सावान. मोर्तब सुद

मोर्तब
सुद

---

श्री.

## लेखांक ३४३.

१७२२ पौष वद्य ४.

राजश्री अंताजी हरी ठाणे निन्हाळे स्वामी गोसावी यांसिः—

सेवक बळवंतराव नागनाथ नमस्कार सुमा ईहिदे मया तेन व अलफ. मौजे निन्हाळें ता। देपूर पो संगमनेर येथील कुळकर्ण चिंतो विठल याचे आहे त्याची जप्ती पेशजी सरकारांतून होऊन तालुकेपत्याकडे सांगितली आहे. हालीं मोकळी करून चिंतो विठल मृत्यु पावले त्यांचे पुत्र राजश्री त्रिंबकराव चिंतामण याजकडे मौजे मजकूरचे कुळकर्ण पेशजीप्रों मारनिलेकडे चालवावयाची हुजरून सनद छ २६ जमादिलाखरची सादर जाहाली त्याजवरून तुम्हांस लिहिलें असे तरी मौजे मजकूरचे कुळकर्ण मारनिले अनुभवितील तुम्हीं दखलगिरी न करणें. मारनिले यांनीं बापुजी शामराज यांस कुळकर्णाचे गुमस्तगिरीचे काम सांगोन पाठविले आहेत याचे हातें कुळकर्णाचे कामकाज घेणें. रवाना छ. १८ सावान. बहुत काय लिहिणें ?

श्री
मोर्त
व सुद

श्रीम्हाळसाकांत.

## लेखांक ३४४.

१७२२ पौष व॥ ८.

मशरुल अनाम देशमुख व देशपांडे, पो उत्राण यांसी

कासीराव होळकर सु॥ इहिदे मया तैन व अलफ राजश्री त्रिंबकराव चिंतामण यांनीं श्रीमंताचें पत्र छ ६ रजबचें आणिलें कीं प्रांत खानदेश येथील कानगोईचे वतन खंडोगंभीरराव व चिंतो विठल यांचे त्याची जप्ती पेशजी सरकारांत केली होती त्यास चिंतो विठल निधन पावले त्यांचे पुत्र त्रिंबकराव चिंतामण याजवर कृपाळू होऊन यांचे हिश्शाचे वतनाची मोकळीक केली आहे तरी तुह्माकडील मामलेदार व जमिनदार यांस ताकीद करून पुर्वी चिंतो विठल यांजकडे वतन चालत होतें त्याप्रों यांजकडे चालवणें म्हणोन त्यावरून हें पत्र सादर केलें आहे तरी तुम्ही सरकारसनदेप्रों परगणे मजकूर येथील कानगोईचे वतनाचा हक रुसूम व इनाम व घरें व मानपान कानू कायदे सुध्धां पेशजी चिंतो विठल यांजकडे सुदामत चालत आल्याप्रमाणें मशारनिलेकडे चालवणें व कागदपत्राचा [illegible] पुर्वी मोगलाई अमलांतील असेल त्या अन्वयें यांचे दप्तरीं देत जाणें जाणिजे छ २२ सावान मोर्तब सुद

मोर्तब
सुद

॥ श्री ॥
म्हाळसाकां
त चरणीं तत्प
र तुकोजीसुत
कासीराव हो
ळकर.

श्रीम्हाळसाकांत.

## लेखांक ३४५.

१७२२ पौष वद्य ८.

राजश्री आपाजीराव निंबाळकर का।दार पें॥ रावेर गोसावी यांसि

छ. अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य स्ने॥ कासीराव होळकर राम-राम विनंती उपरी राजश्री त्रिंबकराव चिंतामणयांनीं श्रीमंताचें पत्र छ ६ रजबचें आणिलें कीं प्रांतखानदेश येथील कानगोईचें वतन खंडोगंभीरराव व चिंतो विठ्ठल यांचे त्याची जफ्ती पेशजीसरकारांत केली होती त्यास चिंतो विठ्ठल निधन पावले. त्यांचे पुत्र त्रिंबकराव चिंतामणयांजवर कृपाळू होऊन यांचे वतनाची मोकळीक केली आहे तरी तुह्माकडील माहाला निहायचे मामलेदार व जमीनदार यांस ताकीद करून पुर्वी चिंतो विठ्ठल याजकडे वतन चालत होतें त्या णों यांजकडे चालवणें म्हणोन त्यावरून हें पत्र लिहिलें असे तरी तुम्हीं सरकारसनदेप्रमाणें पे॥ मार येथील कानगोईचे वतनाचा हक्करसूम व इनाम व घरें व मानपान कानु कायदे सुध्धां पेशजी चिंतो विठ्ठल यांजकडे सुदामत चालत आल्याप्रमाणें मशारनिल्हेकडे चालवणें व कागद पत्राचा सिरस्ता पुर्वी मोगलाई अमलांतील असेल त्या अन्वयें यांचे दफ्तरी देत जाण रा। छ २२ साबान इहिद्दे मया तैन व अलफ बहुत काय लिहिणें हे विनंती

मोर्तब सुद

श्री
म्हाळसाकां
तचरणीं तत्प
र तुकोजीसुत
कासीराव हो
ळकर

---

श्रीम्हाळसाकांत.

## लेखांक ३४६.

१७२२ पौष वद्य ८.

राजश्री केसो कृष्ण गुो व देशपांडे पा। गाळणा गोसावी यांसि

छ. अखंडितलक्ष्मीअलंकृतराजमान्य स्ने॥ कासीराव होळकर देशमुख पो। मा। दंडवत सु॥ इहीदे मया तैन व अलफ. राजश्री त्रिंबकराव चिंतामण यांनीं श्रीमंताचें पत्र छ ६ रजबचें आणिलें कीं प्रांत खानदेश येथील कानुगोईचें वतन खंडोगंभीरराव व चिंतो विठ्ठल यांचें त्याची जफ्ती पेशजी सरकारांत केली होती त्यास चिंतो विठ्ठल निधन पावले त्यांचे पुत्र त्रिंबकराव चिंतामण यांजवर कृपाळू होऊन त्यांचें हिश्शाचें वतनाची मोकळीक केली असे तरी तुह्मांकडील महालानिहायचे मामलेदार व जमीनदार यांस ताकीद करून पुर्वी चिंतो विठ्ठल यांजकडे वतन चालत होतें त्याप्रों यांजकडे चालवणें ह्मणोन त्यावरून हें पत्र सादर केलें असें तरी तुह्मीं सरकार-सनदे-

श्री
म्हाळसाकां
तचरणींतत्प
रतुकोजीसुत
कासीरावहो
ळकर

प्रो॥ मा। येथील कानगोईचें वतनाचा हक्क-रुसूम व इनाम व घरें व मान-पान कानू कायदे सुध्धा पेशजी चिंतो विठ्ठल यांज-कडे सुदामत चालत आल्याप्रो॥ मशार-निलेकडे चालवणें व कागद-पत्राचा सि-रस्ता पुर्वीं मोगलाई-अमलांतील असेल त्या अन्वयें यांचे दप्तरीं देत जाणें जाणिजे छ २२ साबान बहुत काय लिहिणें

| मोर्तब सुद |
|---|

वार

---

श्रीह्माळसाकांत.

## लेखांक ३४७.

१७२२ पौष वद्य ८.

| ॥ श्री ॥ ह्माळसाकांतचरणीतत्प रतुकोजीसुत कासीरावहो ळकर |
|---|

मशरुल अनाम देश-मुख व देशपांडे पो। रावेर यांसि कासीराव होळकर सु॥ इहिदे मया तैन व अलफ राजश्री त्रिंबकराव चिंतामण यानीं श्रीमंतांचें पत्र छ ६ रजबचे आणिलें कीं प्रांत खानदेश येथील कानगोईचे वतन खंडोगंभीरराव व चिंतो विठ्ठल यांचें त्याची जप्ती पेशजी सरकारांत केली होती त्यास चिंतो विठ्ठल निधन पावले त्यांचे पुत्र त्रिंबकराव चिंतामण यांजवर कृपाळू होऊन यांचे हिश्शांचे वतनाची मोकळीक आसे तरी तुम्हाकडील महाला-निहायचे मामलेदार व जमिनदार यांस ताकीद करून पुर्वीं चिंतो विठ्ठल यांजकडे वतन चालत होतें त्याप्रमाणें यांजकडे चालवणें म्हणोन त्यावरून हें पत्र सादर केलें असे तरी तुम्हीं सरकारसनदे-प्रो॥ पा॥-मजकूर येथील कानगोईचें वतनाचा हक्क रुसूम व इनाम वगैरे व पानपान कानू-कायदेसुध्धा पेशजी चिंतो विठ्ठल याजकडे सुदामत चालत आल्या प्रो॥ मशार-निलेकडे चालवणें व कागद-पत्राचा शिरस्ता पुर्वीं मोगलाई अमलांतील असेल त्या अन्वयें यांचे दप्तरीं देत जाणें जाणिजे छ २२ साबान मोर्तब सुद

| मोर्तब सुद |
|---|

वार

---

श्री.

## लेखांक ३४८.

यादी श्रीमंत यांस मेजमानीस पोषाख

श्रीमंत खासे.

१ तिवट.
१ दुपट्टा.
२ महमुद्या.
॥॰ किनखाप.

---

४॥ २५०

श्रीमंत अप्पासाहेब.

१ तिवट.
१ दुपट्टा.
२ महमुद्या.
॥॰ किनखाप.

---

४॥ १५०

४००

३० मालि. ५७२

९७२

| | |
|---|---|
| भोजनखर्च | १०० |
| देहनगीखर्च. | १०० |
| | ११७२ |

श्रीमंताबरोबर गृहस्थ मंडळी.
मेजमानीस येणार.

| | |
|---|---|
| १ बाळशास्त्री. | ५० |
| १ गोपिनाथभटबावा. | २० |
| १ वैजनाथ भट भागवत. | २५ |
| १ बाळाजीपंत पटवर्धन. | २५ |
| १ आप्पाजीपंत सहस्त्रबुद्धे. | २० |
| १ आबा काळे. | २५ |
| १ मोरोबा दादा फडणीस. | १०० |
| २ रामचंद्र गोसावी. | ५० |
| १ सदाशिव माणकेश्वर. | ४० |
| १ गोपाळराव मुनशी. | २५ |
| १ बाळोजी कुंजर. | ५० |
| १ शिवाजी बल्लाळ. | १५ |
| १ गोविंदपंत. | १५ |
| १ नारोबा आवटी. | १२ |
| ५ पोशाख दर १० प्र॥ | ५० |
| १० पागोटीं १० दर ५ प्र॥ | ५० |
| ३० | ५७२ |

श्री.

## लेखांक २४९.

१७२३ श्रावण वद्य ११.

विज्ञापना—

सेवेसी विज्ञापना. तागाईत छ २३ रबिलाखर रोज गुरुवार सायंकालपर्यंत वर्तमान तर राजश्रीकडील दरगदार यांणीं किल्याचा झाडा वगैरे कागदपत्र झाडे आणून दाखविले. रा माधवराव रास्ते यांणीं पाहून ठेविले कंपूचें धरणें आज उठोन लस्करांत गेले. वरकड बंदोबस्त रास्ते करीत आहेत. खर्चास आम्हांस नाहीं. याची आज्ञा असावी. सेवेसी श्रुत होय विज्ञापना.

साहित्यपत्र.

श्री.

## लेखांक २५०.

१७२३ पौष वद्य ९.

राजश्री सखाराम घाटगे सर्जेराव गोसावी यांसिः—

आसीर्वाद उपरी. उदाजी जाधव कुरग्या का खेड नि॥ तोफखाना याचा व तुलसाजी साडभर या उभयताचा का मजकुरीं सेताचा व घराचा ××× कजीया होता त्याची पंचाईत सरकारातून नेमून देऊन पंचाईत मतें फडशा होऊन ×× जामीन घेऊन फारखत्या हरदु जणाच्या × ल्या त्याजला सात आठ वर्षे जाहालीं असें असतां हाली तुम्हाकडील बहिरजी सिंदे याजला साडभऱ्यानें गैरवाका समजाऊन जाधवापाशीं सरकारचे गवत कापणावळीचा ऐवज होता त्यापैकीं मसाला वगैरे दोनशें रुपये घेऊन कुरण्यास खेडाहून पुण्यास आणिल्यावर साडभराचे सांगितल्यावरून तुम्हाकडील कारखान्याचे बैल कुरणांत जाऊन गवताची तसनस केली ह्मणोन विदित जाहालें तरी तुम्ही राजश्री दौलतराव सिंदे अलीजा बहादूर यास सांगोन बहिरजी सिंदे यास ताकीद करऊन मसाला वगैरे दोनशे रुपये घेतले आहेत ते माघारा देवऊन तुळसाजी साडभर यास हुजूर पाठवून देणें. जाणिजे छ १२ रमजान. बहुत काय लिहिणें ?



श्री.

## लेखांक ३५१.

१७२४ श्रावण शुद्ध ९.

श्रीमंत राजश्री रावसाहेब स्वामींचे सेवेसी.

विनंति सेवक कृष्णाजी बाबूराव कृतानेक साष्टांग नमस्कार विनंति विज्ञापना येथील कुशल ता। श्रावण शु॥ ९ नवमी रोज रविवार पावेतों मुक्काम शहर बऱ्हाणपूर येथें वर्तमान यथास्थित असे विशेष स्वामींनी कृपा करून आषाढ वद्य ५ चें पत्र पाठविलें तें श्रावण शु॥ ५ अस्तमानीं पावलें लिहिला मजकूर कळला पत्रीं आज्ञा जे राजश्री गणेश शिवराम वकील राजेबहादार यांचे पत्र लष्करांतून आलें जे वतन-ममंधीं ताकीद-पत्रें व सोड-चिठीची सरकाराची आज्ञा जाली आहे राजश्री बापू चिटणीस यांजकडे परवानगी जाली आहे तर मागाहून लवकरच ताकीद-पत्रें व सोड-चिठी पाठवून देतों. ठराव जाला आहे त्याचे ऐवजाची तजवीज करणे ऐसें पत्र आषाढ वद्य त्रितीयेस आलें पुर्वी हजार रुपयांचा करार जाला होता हालीं चार रुपये कमजास्ती पडतील तरी मोतीराम वगैरे यांसी ताकीद करून ठेवणें पत्रें दाखल जाहालीं म्हणजे ऐवज देणें लागेल सोडचिठी येऊन काम सुरळीत चालू जालें म्हणजे खामा स्वारीसमंधीं हजार दीड हजार रुपये खर्च पडेल तरी याची तरतुद करणें व पालखीचा सरंजाम करावयाचा आहे तें लिहून पाठवू त्याप्रमाणें करणें अवीच तीन हजार रुपये लागतील याची तजवीज करणें ऐसी पत्रीं आज्ञा सुचवली त्यासी एक बऱ्हाणपुरचा आकार जालाबाद पांच साहासे रुपये त्यांत महाल मजकूर खर्च जाऊन बाकी दीड दोनशें रुपये राहातात ते जप्तीवाला नेतो यास्तव इतके ऐवजाची सोय येथें होणार नाहीं सोड-चिठी आलियावर कोणाचे माथा काम मागिलें तरी हजार बाराशे रुपये देईल त्यासी स्वामींचें अभय-पत्र लागेल आमचा विश्वास तरी कोणास नाहीं पुर्वी राजश्री अमृतरावजींनी कारभार केला त्याचे फडशा अद्याप जाले नाहींत याजकरितां सावकारमंडळी अनमान करितात हालीं कामावर हर-कोणी रुपये स्वामींचे खातरेवर देईल चिंता नाहीं गुमास्ते मंडळीचा भ्रममात्र आहे घरांत पाहावे तर नकार-घंटाच आहे बाहिर पाहावे तरी श्रीमंतांचे पदरचे कारकून यास्तव यजमानाचे नांवा-सारिखें रहावें लागतें गुमास्ते-मंडळींत तरी चांगला माणूस कोणी राहिला नाहीं कीं तोडजोड करील हालीं सरकारची आज्ञा त्यासी तेही आपले आज्ञेखेरीज नाहींत त्यांचे शक्ती-प्रमाणें आज्ञा जालियास हाजर आहेत परंतु वरकड माहालपाकार्यास सामल जाले पाहिजेत त्याची तजविज स्वामींची स्वारी इकडे आली म्हणजे सहजांत होऊन येईल भुसकुटे यांसी विचारलें त्यांनीं उत्तर केलें कीं तुर्त आम्हीं आपले घोरांत असों आम्हांकडे ऐवज मिळणार नाहीं हालीं त्यांजकडील मामलती निघाल्या आहेत आपल्याकडील काम कबूल करीत नाहींत आम्ही आज्ञवरून मशार-निल्हेस दारा पांच वेळां विचारलें त्यांचे मर्जीस येत नाहीं दुसरियांस बोलावें तरी ऐवजाशिवाय पैसा देत नाहीं यास्तव खानदेश-कृष्णा ऐवजाची तजविज होईल स्वामींची स्वारी या प्रांतीं आलियावर गुंता पडणार नाहीं पालखीचा सरंजाम करावयासी आज्ञा त्यासी लिहून

याद येईल त्याप्रमाणें केला जाईल व लष्करांत काय खर्च पडेल त्याची व पालखीचे सरंजामाची येथें सरकारांकडील सियाकडील माहालावर होईल चिंता नाहीं वरकड स्वारीचा खर्च खानदेश-प्रांतीं महालानिहाय गुमास्ते-मंडळीस पत्र दाखविलें त्यामी सेवेसी विनंति-पत्र लिहिलें आहे त्यावरून कळों येईल श्रावण शु॥ १ प्रतिपदेची विनंति-पत्र डांकेस-मागमें पाठविलीं आहे तें पावलें असेल लष्करांत मशारनिल्हेकडे पत्र रवाना करून सत्वर बंदोबस्त होय तें जालें पाहिजे येथें खंडेराव मोरेश्वराकडील कारकून जमीवर आहे यामही परभारें वर्तमान कळलें त्याम मशारनिल्हेचे बोलणे जे खंडेराव मोरेश्वर यांची सोड-चिठी आल्याशिवाय काम सोडणार नाहीं. तरी मोरो हरीचें पत्र खंडेराव यास आणवावें याउपर जमीवाल्याकडील वसूल नजाय तें जालें पाहिजे सियाकडील माहाल यांची याद पाठविली आहे ते पावेल लष्करांत पत्रें परभारें रवाना करावी आणि इकडेही लष्करांत पाठवावयास दीक्षितांचे नांवें व गणपतरावजीचे नांवें ऐसीं दोन पत्रें पाठविलीं पाहिजेत म्हणजे येथून लष्करांत पाठऊं उत्तर आणवून सेवेसी पाठवून देऊं बहुत काय लिहिणें लोभ करावा हे विज्ञापना.

---

श्री.

## लेखांक ३५२.

१७२८ आश्विन वद्य २.

पौ छ १६ जमादिलाखर सु॥ सलास मयातैन व अलफ.

शेवेसी विनंती शेवक गोपाल हरी पटवर्धन चरणावरी मस्तक ठेऊन शिर-साष्टांग नमस्कार विज्ञापना. तागाईत छ १५ जा॥खरपावेतों शेवकार्चें वर्तमान यथास्तीत असे. विशेष. आपण पत्र पाठविलें तें पावलें. लिहिला मजकूर सविस्तर कळला. दंगियामुळें आपण मुलामाणसांसुध्धां इकडे येणार. समागमें श्रीमंताकडील येक दोन शास्त्र्यांचीं कुटुंबें येतील त्यांचीं बरदास्त व्हावी म्हणोन आज्ञा. त्यास गवजी ! आज्ञेप्रमाणें बरखास्त थोडी बहुत होईल. चिंता नाहीं. परंतु पुणियांतील पलणकरी आले आहेत. त्यांणीं दाटी फार च केली ती आपलेकडून बापोजीपंत दाजी आले त्यांणीं पाहिली च आहे. तशांत आपलें व शास्त्रीबावाचें येणें जाल्यास जाग्याची सोय थोडी बहुत होईल. कळावें. बहुत काय लिहिणें ? कृपालोभ असो दीजे. हे विज्ञाप्ती.

---

श्री.

## लेखांक ३५३.

नकल.

१७२८ फाल्गुन वद्य ७.

राजमान्य राजश्री गोपाळ हरी पंत सचीव गोसावी यांसिः—

सेवक अमृतराव रघुनाथ नमस्कार. सु॥ सलास मया तैन व अलफ. मौजे कळंबोली त॥ पौन मावळ हा गांव राजश्री त्रिंबकराव चिंतामण यांजकडे सरकारांतून इनाम आहे तेथें तुमचा संबंध नसतां एक साल ऐवज द्यावा म्हणोन पाटलास व याचे प्यायास व गांवचे बायकास मारहाण करून धरून किल्ले तिकोणा येथें नेलें आहे. म्हणून हुजूर विदित जालें त्याजवरून हें पत्र सादर केलें असे. तरी मौजे

म॥रचे पाटील व बायका व मारनिले-कडील प्यादा धरून नेला आहे ते सोडून देऊन या उपर मारानिलेचे गावांस कोणे-विशीं उपद्रव न करणें. जाणिजे. छ २० जिलकाद. आज्ञा प्रमाण मोर्तब.

---

श्री.

## लेखांक ३५४.

१७२५ वैशाख शुद्ध १५.

राजमान्य राजश्री राघो नारायण दि॥ पंतसचीव गोसावी यासिः—

सेवक बाजीराव रघुनाथ प्रधान नमस्कार. सु॥ सलास मयातैन व अलफ मौजे अंबवली त॥ मुठेखोरें हा गांव रो त्रिंबकराव चिंता-मण याजकडे इनाम आहे तेथें फौजेचे दंग्यानें लूट होऊन गाव बेचीराख रयत उठून गेली. त्यास हाली मारानिलेनीं कौल व तगाई देऊन गावांत रयत आणून वस्ती करवून लावणी संचणी करितात ऐसें असतां तुम्ही राजगड तोरणा व किल्ले तिकोना येथून व भोराहून मन माने तसे रोखे करून वस्ती होऊं देत नाहीं. तुमचा संमंध कांहीं च नसतां उपद्रव करितां म्हणून हुजूर विदित जहालें त्याजवरून हें पत्र सादर केलें असे. तरी तुम्हीं कोण्हे-विसीं मौजे मजकुरास उपद्रव येकंदर न करणें. रोखे केले असतील ते मना करणें. फिरून बोभाट येऊं न देणें. जाणिजे. छ १४ मोहरम. आज्ञाप्रमाण. लेखनसीमा.

---

श्री.

## लेखांक ३५५.

१७२८ ज्येष्ठ.

यादी माधवराव मल्हार यांसी तैनात सुहूर—सन सब्बा मया तैन व अलफ रुपये ५०० एकूण जातीस पाचशे रुपये तैनात सरकारांतून सरदारीचीं वर्से आले-यावर येणेंप्रों करार

शिवाय कलमें येणेप्रो

| घोडें व तट्टू सरकार पैकीं निसबतीस येणेप्रों करार | विजयादशमीस वर्से पोशाख सनग २ किमत रुपये ५० येणप्रो करार |
|---|---|

---

श्री.

## लेखांक ३५६.

नकल.

१६३० आषाढ शुद्ध ५.

मुख्यमुद्रा.

स्वस्तिश्री राज्याभिशेक-शके ३५ सर्व-धारी संवत्छरे आषाढ बहुल पंचमी रवि-वासरे क्षत्रियकुळावंतसश्री-राजाशाहूछत्र-पती स्वामी यांणीं म॥ बापूजी सोनाजी परभू

| शिका पेशवे |
|---|

उपनाम दिघे देश-कुलकर्णी व गांव-कुलकर्णी त॥ मुठेखोरें सुभा प्रांत मावळ यांसी इनामपत्र ऐसेजे स्वामी परराष्ट्रांतून स्वराज्यांत आले त्याप्रसंगीं तुम्हीं राजश्री परसोजी भोसले यांची जमि-नीशी करून असतां त्यांचे तर्फेनें स्वामींचें दर्शनास येऊन लांबकानीचे मुकामीं दर्शन घेतलें स्वामीचे आज्ञेवरून राजश्री पर-सोजी भोसले यांस फौजेनिशी स्वामींचें दर्शनास आणिलें ते प्रसंगीं तुम्हीं सेवा बहुत एक-निष्ठेनें केली व पुढें हि निष्ठेनें वर्तणूक करिता तुमचें उर्जित करून वंश-परंपरेनें चालवणें हें स्वामीस अवश्यक याजकरितां तुम्हीं विनंति केली कीं आम्ही स्वामींचें राज्यांतील वतनदार सेवक आहों जें उर्जित करणें तें वतनसंमंधावरी केलि-यानें परंपरागत चालेल त्यावरून स्वामी

तुम्हांवरी रुपाळू होऊन नूतन इनाम देह ता मुठेखोरें पो २

मौजे भवली १ मौजे टेमघर १

ऐशीं दोनीगावें इनाम कुलबावकुलकानू खेरीज हक्कदार व इनामदार करून चतुःसीमा भूमी पूर्व मर्यादेप्रमाणें देखील जलतरु-पाषाण-झाडझाडोरा निधिनिक्षेप सहित इनाम आजरामरामत करून दिल्हा असे तरी सदरहू दोहीगांवचा इनाम उपभोग तुम्हीं व तुमचे बाप भाऊं जनाजीराम देश-कुलकर्णी पुत्र-पौत्रादि-वंशपरंपरेनें अनभऊन सुखरूप असणें स्वामी व स्वामीचे वंशपरंपरेनें तुम्हांस इनाम दोनीगांव चालवितील जाणिजे निदेश समक्ष मोर्तब आहे.

अस्सल पत्र जाडेबंद आहेत. मोर्तब सुद बार सुरु सुद बार.

तारीख छ १९ रविलावर सु॥ तिसा मया.

---

श्रीनाथसाह्य.

## लेखांक ३५७.

१७३१ भाद्रपद शुद्ध १.

| श्री जोतिस्वरूपचरणी तत्पर माहादजी सुत दवलतराव शिंदे निरंतर |
|---|

अजसुभा राजश्री दौलतराव शिंदे ता मोकदम मौजे बिडकीन-गांव पो पैठण सु॥ अशर मया तैन व अलफ चिंतो विठ्ठल याणीं मौजे मजकूरचे पेठेचे शेटे यांसी ऐवज देऊन त्यांचे शेटेपणाचे वतना-पैकीं निमे वतन खरेदी करून महजर करून घेतला नंतर मशारनिलेचा काळ जाला हालीं त्यांचे पुत्र राजश्री त्र्यंबकराव चिंतामण यांनीं शेटेपणाचे निमे वतनाचे वहिवाटीस मौजे मजकुरास कारकून पाठविला त्यास तेथील शेटे यांनीं दिक्कत केली आहे. म्हणोन विदित जालें त्यांजवरून ही ताकीद सादर केली असे तरी तुम्हीं शेट्यास निक्षून ताकीद करून त्यांनीं चिंतो विठ्ठल यांसी महजर करून दिल्हा असेल त्याप्रमाणें त्रिंबकराव चिंतामण यांजकडील हालीं कारकुन मौजे मजकूरास निमे शेटेपणाचे वतनाचे वहिवाटीस आला आहे त्यांजकडे वतनाची वहिवाट सुरळींत चाले असें करवणें जाणिजे छ २९ रजब मोर्तब सुद.

| मोर्तब सुद |
|---|

---

श्रीनाथ साह्य.

## लेखांक ३५८.

नकल

१७३१ भाद्रपद शुद्ध १.

राजश्री जनार्दन बल्लाळ ठाणें जामगांव गोसावी यांसिः--

छ. अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य स्नो दौलतराव सिंदे दंडवत.

अशर मया तैन व अलफ मौजे बीडकीनगांव प्रो पैठण येथील पेठेचे शेटे यांनीं आपलें निमें वतन शेटेपणाचें चिंतो विठ्ठल याजपासून ऐवज घेऊन त्यास खरीदी पत्रें करून पेशजी दिल्हें. नंतर त्यांचा काळ जाला. हालीं मा॥रनिलेचे चिरंजीव त्र्यंबकराव चिंतामण यांनीं शेटे-

पणाचें वतनाचे वहिवाटीस मौजें मारास कारकून पाठविला असतां त्यास तेथील सेख्यांनीं दिक्कत केली आहे म्हणोन विदित जालें. त्याजवरून हें पत्र तुम्हांस लिहिलें आहे. तरी तुम्हीं मौजे मारचे शेटे यांसी निक्षू (न) ताकीद करून शिका पेशजी चिंतो विठ्ठल यांसी खरीदी पत्र करून दिल्हें असेल त्याप्रों त्र्यंबकराव चिंतामण यांजकडील कारकून मौजे मारीं आला असेल त्याजकडे तेथील निमे शेटेपणाचे वतनाची वहिवाट सुरळीत चाले ऐसें करवणें. जाणिजे. छ २९ रजब. बहुत काय लिहिणें? हे विनंति.

मो॥

---

श्रीपांडुरंग.

## लेखांक ३५९.

१७३१ फाल्गुन वद्य ८.

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री त्रिंबकरावजी स्वामीचे शेवेसी.

पो॥ श्रीधर कृष्ण सां॥ नमस्कार विनंती. येथील कुशल ता॥ छ २२ सफरपावेतों श्रीकृपेकरून वर्तमान येथास्थीत जाणोन स्वकीये कुशल लिहीत असिलें पाहिजे. विशेष. आम्हीं पुणियाहून क्षेत्र पंढरीस आल्याता॥ पत्र येऊन वर्तमान कळत नाहीं. तर सविस्तर लिहीत असिलें पाहिजे. यानंतर राजश्री विठोबा नाईक तांववेकर याजकडे श्रीमंत नाना फडणीस याचे दरबारखर्चाप्रों बाकी येणें म्हणोन कोणी आकसांमुळें गैरवाका समजाविल्यावरून हुजरे वगैरे आपल्या नियमानें बसोन आम्हाकडील कारकून कृष्णाजी रघुनाथ तेथें आहे त्यास व घरीं बायकास वगैरे उपद्रव बहुत जाला. व आद्यापि हि होत आहे त्याकरितां आम्हीं यावें, त्यास पेशजी तेथें नेहमीं असतां सिंदे याजकडील घाटगे याजकडून वगैरे दररोज तांबेकर यांचें देण्याचें धणी वगैरे फिर्याद जाऊन मनस्वी उपद्रव परिणामीं तेथें कांहीं उत्पन्न व्हावें असी बाकी राहिली नाहीं दिनचर्यींसुधां कठीण ऐसी खातरजमा होऊन बहुत श्रमाअंतीं परिहार व्हावा व श्रीमंत राजश्री रावसाहेब यांणीं समक्ष समजोन देऊन कृपा करून युक्तीचे वाटें परिहार करीत आले तत्राप नेहमीं उपद्रव कोठवर व चिरंजिवाचा व्रतबंध हि करणें जरूर जाणोन क्षेत्रीं घरास आलों तों येथें हि घाटगे याजकडील आंमल आजपावेतों पुरविला होता. निवळपणें कामकाज सरकारांतून वगैरे समजोन व्हावे, असे स्वस्ततेचे दिवस आद्याप तेथें नाहींत. ना शरीरप्रकृत हि ठीक नाहीं जाणून राहिलों इतकियावर मार्गाची व तेथील सुपथेचें उत्तर आपलें आलियावर येतों त्यास तांबेकर याजकडे तगादा बसोन फल नाहीं व तगादा करावयाजोगा जावसाल हि नाहीं येविसीं पत्रीं तपसील कोठवरी लिहावा? समजणारांनीं आपल्यास समजाविलें त्यांतील कारण व आकस आम्हां प्रसंगीं नाहीं जाणून उगवावा तें किमर्थ हें समक्षतेअंतीं कागदपत्रसुधां पक्की खातरजमा होईल येविसीं संव्रशय पडणार नाहीं. तूर्त अनुमानें ध्यानीं आणावें. जेमा प्रतदिनचर्येसुधां विच्यार कठीण. परंतु कैलासवासी सदासिव नाईक तांबवेकर याचे वेळेस मख्तातेत नजरा वगैरे पडोन खराबी होऊन दुकानें बंद जालें तत्राप यांतुन कांहीं काढ वग होता ऐसें असोन नानाचे सावकारांचा ऐवज देणार घेणार समक्ष असतां नातवा-

जोगा असोन आज दाहा बारा वर्षे बाकी राहील न राहेल हें ध्यानीं आणावें. पूर्वीं च आपण या कामांत इतकें नांव मात्र ऐकिलें परंतु वलखपूर्वक समजले नव्हते. हालीं लिहिल्यांत येऊन कळलें त्यास आपले वडिलांचा व तांबवेकर याचा घरोवा व देवघेव व बाकीसाकी आयाए काय हें आम्ही लिहावें तर आम्हांपेक्षां आपले ध्यानीं सर्व आहे. परिणामीं तांबवेकर याचें उणें तें तुमचें. आपला आमचा त्याचा दुसरा विचार नाहीं जाणून लि॥ आहे तर आपण प्रसंगीं असतां इतके दिवस लांबले हे च अधीक तर इतःपर तगादा उठऊन कारकून आमचा आहे तो च आपला ऐसें जाणून त्याजवर तांबवेकर याचे वायकामुलावर वडिलार्जित ममता तें ध्यानीं येऊन हरयेकविसीं दिनचर्या चालावी येविसीं वगैरे साहित्य जाहालियाचें उत्तर येऊन संतोष होय ऐसें करणें आपल्याकडे आहे इतकियावर हरतऱ्हेनें गैरवाका आणखी समजावितील त्यांतून समक्षतेअंतीं येक हि जावसालास ठरणार नाहींत व त्याजकडे गुंते त्यामुळें आकस धरून समजावणेचें कारण काय तें समक्ष प्रत्ययासी येईल तर पुढें त्याचें ध्यानीं न घेतां मागें समजाऊन खरावी केली ते मात्र गैरवाका आकसामुळें असें ठरलें असतां भरून यावी येविसीं खातरजमा तिराइतांची मागावी. यथाज्ञानें विस्तारपूर्वक लेखन केलें. इतकियावर वडिलार्जित स्नेह व याचे देहप्रारब्धानरूप मर्जीस येईल तैसें व्हावें. बहुत काय लिहीणें ? कृपा लोभ असो दीजे हे विनंती.

---

श्रीनाथ स॥

## लेखांक ३६०.

१७३२ चैत्र शुद्ध १५.

| श्री<br>जोतिस्वरूपच<br>रणी तत्पर माहाद<br>जी सुत दवलतरा<br>व शिंदे निरंत<br>र |
|---|

अजमुभा राजश्री दौलतराव सिंदे त॥ हरीवलद पुंजाजी व नारायेण वलद लोवजी ब्राह्मण-जाई सेटे कसबे बीडकीनगाव सु॥ अशर मया तैन व अलफ. तुम्हीं आपले सेटेपणाचे निमे वतन आपले हिशाचे रा॥ त्र्यंबकराव चितामण यांचे तिर्थरूपास मोख्त करून देऊन खरीदखत लेहून दिल्हें. त्याचे वहिवाटीवर मारनिलें यांणीं आपले तर्फेनें कारकून पाठविला असतां दंडेली करून वहिवाट चालूं देत नाहीं म्हणोन विदित जालें त्याजवरून हे ताकीद सादर केली असे तरी तुम्ही खरीदखत दिल्हाप्रों मुसावर शेकडा बैलावर सिरस्ता दोन रुपये व किराणा दर सद्दे बैलास च्यार रुपये व मीठ तांदूळ वगैरे व नकाशांत हक्कविकरी दरबैलास पक्का पैसा व बाटीक घोड्या व गाड्यास दर रुपयेस पक्का पैशाप्रों व साळ्याचे मागास सालिना येक सेला व सणगराकडून सालिना येक चवाळे येक व कडबा वगैरे विकरीस गाड्यागमें पैसे पक्के दोन व जमीन मळे बिघे बारा त्यांत विहीरी सुमार च्यार सुध्धां व खंडेरायाची माळ जमीन बिघे पाऊणशे व निमे घर येणेंप्रों तुम्हीं लिहून त्याप्रों

चालूं देणें. वहिवाटीस तुम्हीं व तुमचे भाऊबंद तक्षीमदारांनीं हरकत केलियास कार्यास येणार नाहीं जाणिजे छ १४ रा।-बल मोर्तब सुद.

मोर्तब सुद.

---

श्री नाथ स॥

**लेखांक ३६१.**

१७३२ चैत्र शुद्ध १५.

राजश्री बाळाजी सखदेव गोसावी यांसिः-

छ॰ अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य स्ने॥ दौलतराव शिंदे दंडवत. विनंति. उपरि त्र्यंबकराव चितामण यांचे तीर्थरूपास हरी वल्लद पुंजाजी व नारायण वल्लद लोवजी ब्राह्मण जा-ई से-टे कसबें बिडकीणगांव यांनीं आपले शेटेपणाचें निम्में वतन प्रोक्त करून दिल्हें त्याचा हक भुसा-व-र द-र-स-दे बैलास रुपये दोन व किराणा दर शेंकडा बैलास च्यार रुपये व मीठ व तांदूळ वगैरे व नकाशांत हक विकरी दर बैलास पैसा पक्का व बटीक व घोडीं व [illegible] दर रुपये ७ पक्का पैशाप्रे॥ व मा[illegible]स येक सेला व चवाळें एक व कडबा वगैरे विकरीस गाड्यामागें पैसे पक्के दोन व जमीन मळे चिवे बारा त्यांत विहिरी सुमार चार सुद्धां व खंडेरायाचा माल जमीन चिवे पाउणशें व निम्में घर येणें प्रों दिल्हें. त्याचे वहिवाटीस कारकून त्र्यंबकराव चितामण यांनीं पाठविला असतांशेटेमार यांनीं आपले खरीदखताप्रों निम्में वतनाचा

श्री
जो ति स्वरुप च
रणी ततर माहाद
जी सुत दवलत रा
व शिंदे निरंत
र

दाखला न देतां दंडेली करितात म्हणोन विदित जाले त्याजवरून हें पत्र तुम्हांस लिहिले असे तरी हरी व नारायण शेटे व यांचे भाऊबंदास निक्षून ताकीद करून खरीदखताप्रों। निमे वतनाची वहिवाट हक्क-दक्क व जमीनविहिरी व घरा सुद्धां त्र्यंबकराव चितामण यांचे कारकुनास सोंपून देऊन निम्मे वतनाची वहिवाट घेत जाणें. येविशींचा फिरोन बोभाट येऊं न देणें. रा। छ १४ रावल सु॥ अशर मया तैन व अलफ. बहुत काय लिहिणें ? हे विनंति.

मोर्तब सुद

---

श्रीनाथस॥

**लेखांक ३६२.**

नकल.

१७३२ चैत्रशुद्ध १५.

रा॥ बाळाजी सखदेव गोसावी यांसिः---

छ॰ अखंडित-लक्ष्मी-अलंकृत-राजमान्य श्री॥ दौलतराव सिंदे दंडवत विनंति उपरी त्रिंबकराव चितामण यांचे तीर्थरूपास हरी वल्लद पुंजाजी व नारायण वल्लद लोवजी ब्राह्मणजाई शेटे कसबे बिडकीणगांव यांनीं आपले शेटे-पणाचें निमें वतन फुरोक्त करून दिल्हे त्याचा हक भुसांवर दर शेंक-डा बैलास चार रुपये व मिठ व तांदूळ वगैरे नकाशांत हकविकरी दर बैलास पैसा पक्का बहिवाटीला व घोडा व गा-ड्यास दर रुपायास पक्का पैशा प्रमाणे मागास येक शेला व चवळें येक व कडबा वगैरे विकरीस गाड्या-मागें पैसे पक्के दोन व जमीन मळे चिवे बारा त्यांत विहिरी

(सिका) सुमार च्यार सुध्धां व खंडेरायाचा माळ जमिन बिघे पाउणशें व निमे घर येणें प्रमाणें दिल्हें त्याचे वहिवाटीस कारकून त्रिंबकराव चिंतामण यानीं पाठविला असतां शेटे-मजकूर यांनीं आपले खरीदखताप्रमाणें निमे वतनाचा दाखला न देतां दंडेली करितात म्हणोन विदित जालें त्याजवरून हें पत्र तुम्हांस लिहिलें असे तर हरी व नारायण शेटे यांचे भाऊबंदास निक्षून ताकीद करून-खरीद-खता-प्रमाणें निम्में वतनाची वहिवाट हकदक व जमिन विहीरी व घरा सुध्धां त्रिंबकराव चिंतामण यांचे कारकुनास सोपून देवऊन निमें वतनाची वहिवाट घेत जाणें येविषयींचा फीरोन बोभाट येऊं न देणें रा। छ १४ रबिलावल सु॥ अशर मया तैन व अलफ बहुत काय लिहिणें हे विनंति मोर्तब.

---

श्रीनाथस॥.

## लेखांक ३६३.

१७३२ चैत्रशुद्ध १५.

राजश्री जनार्दन बल्लाळ गोसावी यांसि छ. अखंडित-लक्ष्मी-अलंकृत-राजमान्य श्रो दौलतराव शिंदे दंडवत सु॥ अशर मया तैन व अलफ रा। त्र्यंबकराव चिंतामण यांचे तीर्थरुपापासून रुपये घेऊन केसो शामराज व बाबूजी मल्हार व नारो केशव जोशी कुळकर्णी मौजे साकेगांव प॥ शेवगांव यांनीं आपल्याले हिश्शाचे वतन गाहाण ठेऊन गाहणखत लिहून दिल्हें त्यांत करार कीं ऐवज मुदतीस न दिल्हास वतन डुलेल तुम्हीं अनभव करावा याप्रमाणें आपले कुलदैवतांचे शफतपूर्वक व कसबे तिसगांव पा। मजकूर येथील कुलकर्णपण चिमणाजी सदाशिव व आत्माराम सदाशिव कुलकर्णी यानीं आपल्याले वतन गाहणखत साके-गांवकरां-प्रमाणें करार लिहून दिल्हें त्याजवरून मुदती भरून गेल्या यांजकरीतां त्र्यंबकराव चिंतामण

| श्री<br>जोतिस्वरूपच<br>रणीतत्परमाहद<br>जी सुत दवलतरा<br>व शिंदे निरंत<br>र |
|---|

यांणीं आपले तर्फेनें वतनाचे वहिवाटीवर कारकून पाठविले असतां वतनाचे हकदस्तूर व वतन-बाब मानपान त्यांस सोपून न देतां दंडेली करितात पत्र म्हणोन विदित जालें त्यांजवरून हे पत्र तुम्हांस लिहिलें असें तरी तुम्हीं हरदो गांवकरी यांसी बोलाऊन आणून त्र्यंबकराव चिंतामण यांजपासी खतें पत्रें आहेत तीं आणवून पांच मेळवून उभयतांचे लेखाची चौकसी करून वाजबी पत्र व करारा-अन्वयें वतनाची वहिवाट दोनी गांवची त्र्यंबकराव चिंतामण यांजकडे सुरळीत चालेतें करणें लेखपत्र असतां पडली करीत असल्यास निक्षून ताकीद करून वहिवाटीस दिकत न पडेतें करणें जाणिजे छ १४ रबिलावल बहुत काय लिहिणें हे विनंती.

| मोर्तब<br>सुद |
|---|

---

श्रीनाथस॥

## लेखांक ३६४.

नक्कल.

१७३२ चैत्रशुद्ध १५.

राजश्री ... गोसावी यांसिः—

छ अखंडित—लक्ष्मी–अलंकृत–राज–मान्य श्री। दौलतराव सिंदे दंडवत सु॥ अशर मया तैन व अलफ राजश्री त्रिवक-राव चिंतामण यांचे तिर्थरुपापासून रुपये घेऊन केसो शामराज व बाबूजी मल्हार व नारो केशव जोशी कुलकर्णी मौजे साके–गांव पो। सेवगांव यांनीं आपल्याले हिशाचे वतन गाहाण ठेऊन गाहण खत लिहून दिल्हे त्यांत करार कीं ऐवज मुदतीस न दिल्यास वतन डुलेल अनभव करावा या प्रमाणें आपलें कुलदैवताचे शफथपूर्वक व कसबे तिसगांव पा। मजकूर येथील कुलकर्णपण चिमणाजी सदाशिव व आत्माराम सदाशिव कुळकर्णी यांनीं आपल्याले वतन गाहणखत साकेगांवकराप्रमाणें करार लिहून दिल्हे त्याजवरून मुदती भरून गेल्या यांजकरीतां त्र्यंबकराव चिंतामण यांनीं आपले तर्फेनें वतनाचे वहिवाटीवर कारकून पाठविले. असतां वतनाचे हक्कदस्तूर व वतन–वात्र मान-पान त्यास सोपून न देतां दंडेली करी-तात म्हणोन विदित जालें त्याजवरून हें पत्र तुम्हांस लिहिलें असें तरी तुम्ही हरदो गांवकरी यांसि बोलावून आणून त्र्यंवकराव चिंतामण यांजपासी खतें पत्रें आहेत तीं आणवून पांच मेलवून उभयतांचे लेखाची चौकसी करून वाजवी पत्र व करार अन्वयें वतनाची (सिका) वहिवाट दो दोन गांवची त्र्यंवकराव चिंतामण यांजकडे सुरळींत चोलतें करणें लेखपत्र असतां दंडेली करीत असल्यास निक्षून ताकीद करून वहिवाटीस दिकत न पडेतें करणें जाणिजे छ १४ रबिलावल बहुत काय लिहिणें हे विनंती मोर्तब.

श्रीनाथस॥

## लेखांक ३६५.

१७३२ चैत्र शुद्ध १५.

राजश्री केसो शामराज व बाबूजी मल्हार व नारो केशव जोसी कुलकर्णी मौजे साकेगांव पो। सेवगांव.

छ श्री। दौलतराव सिंदे दंडवत सु॥ अशर मया तैन व अलफ तुम्हीं आपले जोसी–कुलकर्णपणाचें वतन साहा गांवचें आपल्याले हिशाचे गाहण ठेऊन राजश्री त्र्यंबकराव चिंतामण यांचें तिर्थरुपापासून ऐवज घेतला त्याचें खत लेहून दिल्हे त्यांत करार लिहून दिल्हा कीं मुदतीस ऐव-जाचा फडशा करून देऊं न करूं तर आमचें वतन तुम्हांस डुलेल विलकुल वत-नाची वहिवाट तुम्हीं करावी यांस तफावत अगर नवदीगर करूं तर आपले कुलस्वा-मीची शफत असें असतां मशारनिलेनीं वहिवाटीवर कारकून पाठविले त्यांस वहि-वाट चालों न देता दिकत करिता म्हणोन हुजूर विदित जालें त्याजवरून हे ताकीद सादर केली असे तरी तुम्हीं गाहण लेहून खत लिहून दिल्हे त्यांत करार असतां दंडेली करणें कामाची नाहीं तर देखत पत्र तुम्हे–

श्री
जोतिस्वरूपच
रणी तत्तर माहद
जी मुतदवलर
व शिंदे निरंत
र

लेखा–प्रमाणें वतनाची वहिवाट त्र्यंबकराव चिंतामण यांचे कारकुनाकडे सुरळींत चालों देणें या उपरी बोभाट आलियांस कामास

येणार नाहीं जाणिजे छ १४ रबिलावल बहुत काय लिहिणें.

मोर्तब
सुद

श्री.

## लेखांक ३६६.

१७३२ आषाढ शुद्ध १०.

पैवस्ती श्रावण व॥ १ शके १७३२ सु॥ इ॥ अशर.

राजश्रियाविराजितराजमान्यराजश्री त्रिंबक रावजी स्वामीचे शेवेसीः—

पोष्य गणेश उमाजी कृतानेक स॥ नमस्कार विनंति येथील कुशल ता॥ आषाढ शुद्ध १० मुक्काम लष्कर नजीक सोपार येथ सुखरूप असो विशेष. श्रीमंत राजेबहाद्दर याचे प्रकणांत आपण वागतां. आम्हीं लष्करांत आहोंत उभयपक्षीं स्नेह असावा म्हणोन राजश्री कुशावा जवळ बोलण्यांत त्रिवर्गांनीं आणिलें त्याजवरून मारनिलेनीं आम्हांस लिहिलें त्यास आपण व आम्हीं दोन नाहींत. एक मानोन उभयपक्षीं स्नेहाची वृद्धिंगत चालवावी. परस्परें कामकाजाची पैरवी राजेबाहादरप्रकर्णीं वगैरे राखीत जावी. वरकड मार कुशावाचे पत्रीं लिहिला आहे. त्याजवरून कळेल. बहुत काय लिहिणें ? हे विनंति. + + + + पंधराचा आहे. लोभ कीजे हे विनंति.

श्री.

## लेखांक ३६७.

नकल.

१७३२ भाद्रपद व॥ ११.

राजश्री बनाजी बावाजी गोसावी यासि

छ अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य स्नो॥ मनोहरगीर सुभेदार ता॥ त्रिंबक वगैरे नारायण सु॥ इसने अशर मयातैन व अलफ. राजश्री त्रिंबकराव चिंतामण यांणीं पुण्याचे मुकामीं समजाविलें कीं संवस्थान पेठ व पो॥ हरसुल येथील कानगोईचे वतन आमचे तीर्थरूप चिंतो विठ्ठल यांणीं खंडो गंभीरराव याजपासून खरीद घेतलें त्याची जती पेशजी सरकारांतून जाहाली होती त्याची मोकळीक होऊन आम्हांकडे चालवावयासि सरकारची सनद गोविंदराव सदाशीव सुभे प्रांत बागलाण वगैरे यांचें नांवे छ ४ रजब सन इहीदेमयातैनांत सादर जाली परंतु हालीमाजी वगैरे दंग्यामुळें वहीवाटीस माहाली आम्हाकडून कारकून गेला नाहीं. त्यास सरकार सनदेअन्वयें संवस्थान व पो॥ मजकूर येथील कानगोईचे वतन आमचें आम्हाकडे चालविलें पाहिजे म्हणून त्याजवरून अलाहिदा सरकारच्या सनदा सनसीतसीतैन व स इहिदे मयातैनचे सालीं जाहल्या आहेत त्या पाहून सदरहू वतन मारनिलेकडे चालतें करून हे सनद तुम्हास सादर केली असे तरी संवस्थान पेठ व पो॥ हरसूल येथील कानगोई वतनाचा हकरुसूम व इनाम व पानमान कानूकायदेसुध्धां चिंतो विठ्ठल याजकडे पेशजी सुदामत चालत आल्याप्रो॥ त्यांचे पुत्र त्रिंबकराव चिंतामण याजकडे सुरळीत देवऊन कानगोईचा सिरस्ता कागदपत्र मोगलाई

अमलातील असेल त्याशी मारानिलेकडे चालवणें. रा छ २४ शावान बहुत काय लिहीणें ? मोर्तब.

---

श्रीसिद्धेश्वर.

## लेखांक ३६८.

१७२६ अधिकभाद्रपद वद्य ३.

अजस्वरीं राजश्री बाळशास्त्री दीक्षित ताा मोकदम मौजे जिन्हाळें पाो संगमनेर सु॥ खमस अशर मयातैन व अलफ. मौजे मजकूरचे कुळकर्ण कैलासवासी त्रिंबकराव चिंतामण यांचें तें आपले तर्फेचे गुमास्ता ठेवून वहिवाट करीत असतां, साल गुदस्तांपासून तालुके पट्टा येथील मामलेदार गुमास्त्याचे हातून वहिवाट घेत नाहींत. तरी गुमास्त्याचे हातून वहिवाट घेण्याविसीं मामलेदार व मोकदम यांस ताकीद जाली पाहिजे; म्हणोन माधवराव त्रिंबक यांनीं समजाविलें. त्याजवरून हें पत्र तुम्हांस सादर केलें असे. तरी मौजेमजकूर येथील कुळकर्णाची वहिवाट त्रिंबकराव याचे कारकीर्दीत गुमास्ता करीत असेल, त्याप्रमाणें हालीं माधवराव त्रिंबक आपला गुमास्ता गांवीं ठेवितील, त्याचे हातून कुळकर्णाचें कामकाज घेणे. दिक्कत न करणें. येविसीचा फिरोन बोभाट येऊं न देणें. जाणिजे. छ १७ रमजान. मोर्तब सुद.

| मोर्तब सुद |
|---|

---

श्री.

## लेखांक ३६९.

राजश्री बाबासाहे पेंडसे स्वा.

सा. नमस्कार विनंति विशेष रानगुाचे रुाो ४०० चारशें जरूर आतांच पाहिजेत सबब विठूस पाला आहे व त्याजपाशीं यावें. कळावें. बहुत काय लिहिणें ? हे विनंति.

केशव खंडेराव.

२७॥ भार

पौ वजा दर रुपयास ७॥ प्राो मासे १३॥। तोले १८१॥।· बाकी तोळे २६।१॥। वजाजती एक गुंजेची कमर ·।· मासे २

एकंदर वजन तोळे २६॥१॥। याजवर सु॥. शिरस्तेप्रो रु. ३८० पाा आहेत.

---

श्री.

## लेखांक ३७०.

१७४० ज्येष्ट वद्य ५.

राजश्री भिकाजी मोरेश्वर पाा मोकदम मौजे अनंदवल्ली पाो नासिक

कबुलात बेशमी काशी हेगडा मौजे मसमुलाबाद पाो दिंडोरी सन १२२८ कारणें कबुलात लिहून दिली ऐसी जे. तुमचा इनाम मजरे गंधारवाडी मोजे मजकूर येथील आहे. त्याप्रमाणें सेताची लावणी आम्हीं केली त्याचा सारा दर बिघा रु॥ एक प्राो देऊं. खेरीज पाा कुलकर्णी यांचे हकदारांचे दाणे देत जाऊं. मि॥ शके १७४० बहुधान्य नाम संवत्सरे माहे जेष्ट व॥ ५.

नि॥ नांगर

रामचंद्र गोविंद कुलकर्णी.

---

## लेखांक ३७१.

| भागापे | यासी ताळा पाहावयासी |
|---|---|
| ६०० | ६०० मुद्दल रुपये. |
| ६०० | १२ व्याज रुपये. |
| ३६०००० | ६१२ |

भाग बेरीज

५८८८≈॥

व्याज बारा रुपये यावें घ्यावें णेयें प्रमाणें करावें कलम १

हिशेब तैनात.

सूर्याजी गायकवाड चाकर दरमहा रुपये ५ प्रो चाकरी रोज.

तैनात ५

चाकरी रोज ८॥

गुणाकार ४० किता.

२॥ कित्ता.

४२॥

सदरहूस तिसाप्रों भागावें १८~॥।·

सदरहू सरासरी येक रुपया पावणेदोन आणे घ्यावे ऐकूम कलम १

हिशेब व रून मोजणी.



समूळ व्यास सुमार व देखील भिंत रुंदी व-रावर्दमुळें

| समूळ क्षेत्र | आंतील क्षेत्र | बंदीस्त इमारत | २४० बंदीस्त |
| --- | --- | --- | --- |
| १० व्यास | | ३० | इमारत चिरेबंदी. |
| ३ त्रिगूण तिपट | तिपट | १८ | |
| ३० | १८ | ४८ | |
| ×××× | | | |
| थाई | चवथाई | निमे | १३५ पोकळ इमारत |
| ७॥ | ४॥ | २४ | ३१५ |
| १० साडेसातांनी गुणिलें. | ६ गुणिले फिरोन व्यास. | २ रुंदी भिंत २ यांणीं गुणिलें | |
| ७५ | २७ | ४८ | |
| | | ५ उंची गज | |
| ३७५ | १३५ | २४० | |

सदरहु येणेंप्रमाणें करावें. करून बंदिस्त इमारती चिरयाची आले तीस मग दर गजी पैका करार खंडून जो पैका हिसेचीं होईल तो द्यावा. व याजखेरीज पोकळ इमारतीची पोकळ भरणीची असेल तिचा पैका निराळा खंडून दरगजी बसऊन जो होईल तो द्यावा. कलम १.

हिसेब गुणाकार कपटसिंधु.

| १ | २ | ३ | ४ | १ | |
| --- | --- | --- | --- | --- | --- |
| ०/१ | ०/२ | ०/३ | ०/४ | ०/१ | १ |
| ०/१ | ०/२ | ०/३ | ०/४ | ०/१ | १ |
| ०/१ | ०/२ | ०/३ | ०/४ | ०/१ | १ |

— बेरीज — रुपये.

१३६६८५१.

कलम १.

हिशेब गुणाकार साधा ताळा पाहावयासी भावरा.
मोत्याचे दोण सर. १२३४१
दरमोत्यास रुपये. १११

१२३४१
१२३४१
१२३४१

बेरीज.
१३६९८५१.

कलम १

हिशेब आंता हुंडणावळ करार चोली रुपये १०००० दाहा हजार यासी दर स. दे. हुंडणावळ चोली रुपये ५ प्रमाणें सो ५०० पांचशें जाहाले. साडे दहाहजार रुपये यावे तेव्हां दाहाहजार रुपये हुंडणावळ देऊन बाकी रुपये याची चीठी यावी.

रुपये गुणिले
पंच्याणवसें पावण चोवीस एक आणा हुंडणावळ इतकया १००००
रुपयाची चिठी यावी. सावकारास रुपये. १००००

१०००००००

यासी कारण मुदल मुदल गुणावें वर हुंडणावळ. व मुदल मिळऊन भाग यावा. जो भाग येतील तितके रुपयाची चिठीस व मुदलास जितकी बाकी राहील म्हणजे मुदलाचे भरीस जे रुपये हूंडमध्यें मावतील तितके हुंडणावळ रुपया यावें. एकूण कलम १

बेरीज
९५२३।।।-
४७६८
बेरीज.

१००००

हिशेब दामाशाही खरेदीचाटणी येणेंप्रमाणें. रुपये.

| केसर वजन. | तोळे | रुपये |
|---|---|---|
| | ६० | २५६ |
| पैकीं वजा घेतले तोळे | ३० | घेतले तोळ्यासी गुणले रुपये. |
| | | ३० |

करार यावें रुपये येकूण गुणाकारें बेरीज.
१२८

जमा तोळे. जमा सो

रागुराज

## लेखांक ३७२.

गुलाम मोहिदीनखान दाम-महबत-हूं छ. शाहामत व अवालीमर्तबत रफाअत व मा-अलमं-जिलत बा-आद्ज पौक ओंकी भिकाजी मोरेश्वर यांणीं जाहीर केलें कीं मौजे मखमलाबाद पो दिंडोरी येथें सरकारांतून आम्हास इनाम जमीन आहे त्यास येशवंतराव सिवाजी व पठाण यांणीं दंगा करून खंडणी घेतली त्याची पटी जाहागिरिचे कमावीसदार यांणीं करून ईनामाची जप्ती केली आहे येविसी आज्ञा जाली पाहिजे म्हणोन त्याज तुम्हास कलमीं असे भिकाजी मोरेश्वर सरकारचे पदरचे याची ईनाम जमीन तुम्हाकडील कमावीसदार यांणीं जप्त केली आहे त्यास ताकीद करून ऐवज न घेतां जमीनीची जपती मोकळी करवणें. जमीन मोकळी होऊन यांची याजकडे सुदामत चालत आली आहे त्याप्रो चाले तें करावें.

---

श्री.

## लेखांक ३७३.

तीर्थस्वरूप राजश्री तात्या स्वामीचे सेवेसीः—

अपत्य रघुपतराव याचे कृतानेक सां। नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल जाणोन स्वकीय कुशल लिहीत असावें. विशेष. रो बाबूराव अनंत आले. सर्व वर्तमान निवेदन केलें. इकडील वर्तमान पत्रावरून ध्यानास येईल. सारांष येथील बंदोबस्ताविशई श्रीमंत बापूस विनंती करून आपण येथील बंदोबस्त करावा. येथील वर्तणूक आपले आज्ञेविरहीत नाहीं. दरबारसंमंधी ठराव करून बंदोबस्त करावा. आपण तेथील फडशा करितील त्या अन्वयें निभावणी होईल. आतां आपण संवशय न धरावा येथील लक्ष आपल्या पायांसी. अथपर दुसरें नाहीं. आपण उपेक्षा केल्यास परिणाम नाहीं. सर्व भरवसा आपला आहे. बहुत काय लिहिणें ? लोभ करावा हे विनंती. माहालचे प्रगणियाचे वर्तमान रो राजाराम सांगतील × × × ×.
( पुढील बंद गहाळ )

---

श्री.

## लेखांक ३७४.

नकल.

राजाश्रियाविराजीत राजमान्य राजश्री परशराम भाऊ स्वामीचे शेवेसीः—

पोष्य हरी बल्लाळ साष्टांग नमस्कार विनंती उपरी येथील कुशल ता। छ १६ सफर जाणोन स्वकीय कुशल लिहीत असिलें पाहिजे. विशेष. रो आबाजी नाईक कावरस याजकडे मौजे कारजगे हा गांव करवीरकराकडून आपाजी शामराज याचे विद्यमानें इनाम आहे. त्याप्रो सरकारांतून करार आहे. त्याचा वसूल आपणाकडे गुदस्तापासून चिकोडीचे जप्तीमुळें आला असेल तो ऐवज देवऊन पुढें नाईकाकडे गांव सुरळीत चालता केला पाहिजे. सरकारांतून गांव चालवावयाचा करार जाला आहे. त्याप्रो नाईकाचे आगत्य धरून चालवावा. याचा ऐवज घेतला असेल तो यावा. ता। छ १७ सफर. बहुत काय लिहिणें ? कृपा लोभ असो दीजे हे विनंती.

---

श्री.

## लेखांक ३७५

श्री
मोर्तब
सुद

साहेब मेहेरबान अनपावा साहेब व व बाबा साहेब मेहेरबान सलामत हूं.

साहेब मुष्फक मेहेरबान अजी कमतरीन महमद जाफर व रजेबद्दीन व महमद इमान देसमुख पा पाटवदे दुवा सलाम महवद मकसूद आ की येथील खेर रला जाणोन साहेचीं आपली खेर अफीयत हमेशा कलमीं करीत जाणें दिगर आम्ही साहेबाची वाट पाहतों परंतु आपले येणें होत नाहीं तर आतां आपण यावें तुम्हीं आलियावांचून येथील बंदोबस्त होत नाहीं. कितेक वर्तमान जबानीं खंडोजी बायकर सांगता मालूम होईल. विस्तार काय त्याहावा ? रा॥ मल्हारजी नाईक यांनीं पत्र लि॥ आहे त्याजवरून सर्व विदित होईल आपण त्याजला पत्र एक लेहून पाठवावें, म्हणजे सर्व कामाचा बंदोबस्त होईल. ज्यादा काय लिहिणें ? हे कितावत.

गणराज गौरीसुत ।
लाल आंग मे बभुत ।
जिसके मुख पंच्यामृत ।
जमे दुत भागत ॥ १ ॥
नामा दरजी जुलाम ।
विठूराजका गुलाम ।
हुवा दुनियामे बदनाम ।
उने नाम डुबाया ॥ २ ॥
नामा माने नही । श्रीमार्गेश्वर वद्य ७.

---

श्रीभवानीशंकर.

## लेखांक ३७६.

राजाश्रिया विराजित राजमान्य राजश्री भास्करपंत स्वामी गोसावी यांसि:—

पोष्य दादो नरहर सां॥ नमस्कार विनंती उपरी येथील कुशल जाणून स्वकीय स्वानंदोद्भव लिहीत असिलें पाहिजे. विशेष. आपण स्मरणपूर्वक कृपापत्र पाठविलें तें प्रविष्ट होऊन लेखनार्थ अवगत जाला. ऐसेंच निरंतर पत्रीं संतोषवित असावें. यानंतर राजश्री संताजी अंबाल्याबद्दल बाकीचा मजकूर लिहिला त्यास अवघे गांवकरी मिळोन पट्टी करून दिधली. त्याजमध्यें संताजीवर दोनशें रुपये लिहिले. त्याजवरोन संताजी ह्मणों लागला कीं आपल्याकडे चौथा भावाबरोबर जमीन नाहीं. आपण इतका रुपया कोठून द्यावा. जमीन मोजून यावी चौथाभावाप्रमाणें जमीन असलिया पट्टीचा रुपया लिहिल्याप्रां देऊं मग करार ठरला कीं जमीनीची वाट जालिया अधिक उणें पाहून घेऊं. मग पट्टीपैकीं रुपये १५० दीडशें वसूल दिधला. बाकी रुपये ५० पन्नास त्याजकडे तैशीच राहिली पुढें जमिनीची समजावीस व्हावी. तों तितक्यामधें आपल्याकडून कामकाज निघालें. आतां तुम्हांकडे कामाचा अधिकार आहे. वाजवी गैरवाजवी ध्यानास आणून जैसें विल्हें लावायाचे असेल तैसें लावावें. तुमची हि शुक्रगुजरी नेकी गांवकरी यांणी फार सांगितली. आणि परस्परें ही ऐकिल्यांत आली. त्यास राहतां हेंच राहेल. वरकड कामकाज बरें वाईट होतच आहे. सदाप्रती विशेष काय लिहिणें ? लोभ असो दीजे .

श्री.

## लेखांक २७७.

अजम राजश्री सेख हसन शेख इसमाईल सुभेदार मुा बाणकोट यांसिः-

छ मोईवान मुखालिशान—दस्तगा अज दिल एकलास—रामभट आगाशे खोत कुलकर्णी मौजे राहाटगर हालीं वस्ती पुर्णे दुवा आं की येथील खुशी जाणून आपले कडील हकीकत लिहीत जावी. दिगर तुम्हीं पत्र पाठविलें पावलें व हयात खान जमातदार यांनीं सांगितले वरून सर्व अर्थ कळला. व आपण पत्र पाठविलें तेंच वाजिब्नस श्रीमंत राजश्री नानास दाखविलेंवरून श्रीमंत संतोप जाहाले. इकडील मजकूर तुम्हांस कळावा या अर्थें हयातखान जमातदार यांस पाठविले आहेत. हे खुद जबानीं सांगतील त्याजवरून कळों येईल. राजहंसाचा मेळा पाहून आम्हीं मुरंबीपणा केला ते पक्षीं मोत्याचा च चारा खात आहेत. जमेदारीचे रीतीनें कांहीं खिजमत घ्यावयाची असलिया-लिहीत जाणें म्हणून लिा. त्यास इकडील जमीदारीचें आम्हांकडे आहे च. आपले तर्फेची इनाम जाहाल्यास आपल्याकडील ही जमीदारी होईल. दोस्तीचे जागा ज्यादा काय लिहिणें ? लोभ करावा. बारीक मोठ्या गोष्टी कित्तेक तुमच्या मनांत असतील त्याच आमच्या मनांत आहेत. त्या अन्वयें सूचना मात्र आम्हांस करावी. श्रीमंतांच्या कानावर घालून बंदोबस्त केला जाईल. आपण इनाम आम्हांस करून देविणार, म्हणून हयातखान यांनीं सांगितलें त्यास कुटुंबाचा योगक्षेम चाले असें करून देविल्या फार उत्तम आहे.

---

श्री.

## लेखांक २७८.

आशीर्वाद विनंति उपरि. आपण मजला येण्याविशीं च्यार पत्रें पाठविलीं त्यास मी पत्राची वाट न पाहावी. निरोपाबरोबर आपली भेट घ्यावी. परंतु घरांत दोघी मुलींस समाधान फार नाहीं आ ती अवस्था राणुजी मातरे यांस पुसावी. ईश्वर कांहीं आरोग्य पडलें म्हणजे सेवेशीं येतों. कांहीं दुखण्याचें श्वेत कृष्ण जालें म्हणजे मजला कांहीं गुंता नाहीं. रागें न भरावें. मी आपला काय नाश केला असेल तो समक्ष विनंति करीन. मी कांहीं चोरी एक पैशाची केली नाहीं. चोरी ऐसी माझे आंगीं लागली, तरी मनास येईल तैसें पारपत्य योजावें आणि चोरी च केली ऐसें असतें तर मजला अन्नावखाची तांगंबळ कशास व्होती ? जितका गांवचा हिशेब मजला ठाऊक आहे तितका दाखवीन. कळावें. पत्रें आपलीं फार आलीं म्हणोन रागें न भरावें. फार काय लिहिणें ? लोभ करावा हे विनंति. रा माघ शुा ३.

---

श्री.

## लेखांक २७९.

विनंति उपरि. आपण मुलामाणसांत पाठवावयाचा निश्चय केला होता त्यांत कांहीं विपर्यास ऐकतो. त्यास चित्तांत विपर्यास काडीमात्र न आणितां मुलाणा मार्गस्थ करावीं. येथें आल्यावर दुसरा अर्थ किंवा किंत चित्तांत न आणावा. वारंवार काय ल्याहावें ? दुसरा अर्थ पडावयाचा नाहीं. बहुत काय लिहिणें ? लोभ कीजे हे विनंति.

श्रीरामचंद्र.

**लेखांक ३८०.**

राजश्रिया-विराजित-राजमान्य-राजश्री चिंतोपंत स्वामीं गोसावी यांसि

पो। सदाशिव चिमणाजी सचिव नमस्कार विनंती उपरी येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहित जावें विशेष पत्र पाठविलें तें प्रविष्ट जालें. किल्ले राजगड येथील असामीच्या वेतना-विशीं लिहिलें त्यास सालगुदस्ताचें किल्ले-मजकुरचे देणेंच राहिले आहे या अन्वयें हेही राहिलें साल-मारचा अर्थ तरी हा कालपर्यंत किल्ले-मारचा तहबंद जाला नाहीं ठराव होऊन तह-बंद जाला म्हणजे निमेसिमे ऐवज पावावयाचा तो पावल *रा। छ २२ रविलाखर बहुत काय लिहिणें हे विनंती.

---

* येथून हस्ताक्षर त्यांचें.

